संपादक—
विठ्ठलभाई के. झवेरी
सोली एस्. बाटलीवाला
अनुवादक—
पां. वा. गाडगीळ

प्रकाशक :
जन्मभूमि प्रकाशन मंदिर
मुंबई १

डिसेंबर १९४५

किं. रु. ३

श्री. अमृतलाल प्रभाशंकर साता यांनी दि स्टेट्स् पीपल् प्रेस,
१३८, मेडोज् स्ट्रीट फोर्ट, मुंबई, येथें छापून तेथेंच प्रसिद्ध केलें.

# प्रस्तावना

ब्रह्मदेश व सयाम यांस मी नुकतीच भेट दिली त्यावेळी फक्त सुभाषचंद्र बोस यांच्या आझाद हिंद सरकारशीं संबंध आलेली जी माणसें त्यांच्याशींच माझा संबंध आला असें नव्हे तर मी स्वदेशीं परत आल्यानंतर इतरहि अनेकांचें माझ्याकडे विशेष लक्ष वेधलें. म्हणून या प्रवासांतून साहित्य मला मिळू शकलें हा ग्रंथ प्रसिद्ध होणें अतिशय अवश्य असून तसा तो प्रसिद्ध होत आहे याबद्दल मला फार आनंद वाटतो.

इतिहास लिहिणें हें अनेक प्रकारच्या साहित्यापासून करावयाचें एक संशोधनकार्य आहे. ज्या साहित्याचें खरेंखोटेंपण इतिहासकार ठरवीत असतो त्या साहित्याशीं संबंध आलेल्या घटना अथवा माणसें यांच्याशीं इतिहासकाराचा संबंध आलेला नसतो रोजनिशी ही दररोज घडणाऱ्या घटनांची सामान्यत एक जंत्री असते जंत्रीलेखक जें स्वत पाहतो अथवा निरीक्षतो त्याची नोंद तो रोजनिशींत करीत असतो म्हणून रोजनिशी ही इतिहासकारानें लिहिलेल्या इतिहासापेक्षां अधिक सत्य म्हणून अधिक पवित्र असा इतिहास असतो म्हणून मला अशी खात्री वाटते, की ही रोजनिशी प्रसिद्ध झालेली पाहून लोकांना आनंद होईल

मी एक गोष्ट पुन्हा सांगू इच्छितों, कीं हें प्रकाशन म्हणजे केवळ घडलेल्या घटनांची जंत्री आहे ती जंत्री म्हणून लोकांपुढें मांडावी एवढाच आमचा हेतु आहे युद्ध यावेळीं चालू असतें तर ती प्रसिद्ध करू नका, कारण तें युद्धाच्या दृष्टीनें अपायकारक होईल असें प्रकाशकांना मीं सांगितलें असतें पण आता युद्ध संपून गेलें असल्यामुळें जिवंत माणसांच्या स्मृति पुसट होण्यापूर्वी व अतिशयोक्ति अथवा अतिगौरव यांचा शिरकाव त्यांत होण्यापूर्वीं ही जंत्री ताबडतोब प्रसिद्ध होणें हें योग्य आहे स्मृति पुसून जाणें अथवा अतिशयोक्ति अथवा अतिगौरव यांचा शिरकाव होणें या बाबी ही रोजनिशी ताबडतोब प्रसिद्ध होण्यानें आता टळल्या आहेत.

सुभाषबाबू आणि त्यांचें आझाद हिंद सरकार यांसंबधानें चार शब्द लिहितों सुभाषबाबूंनी हें सरकार स्थापणें वगैरे जीं कृत्यें केलीं तीं नापसंत असणारे लोक हिंदुस्थानांत आहेत तसें मत असण्याचा त्यांना हक्कहि आहे परंतु असे लोक आणि सुभाषबाबूंचे कट्टे विरोधक यांनादेखील न्यायबुद्धीनें सुभाषबाबूंच्या हेतूची थोरवी, ज्यानें इतिहासांत उच्च स्थान मिळविलें आहे असा सुभाषबाबूंनी पत्करलेला धोका आणि आझाद हिंद सरकारच्या स्थापनेच्या साहसांत त्यांनीं केलेला थोर स्वार्थत्याग हें सर्व स्पृहणीय मानावें लागेल

गेलीं दोनशें वर्षे आमच्या राज्यकर्त्यांनीं आम्हांला नि शस्त्र केलें आहे हत्यार चालविण्यास आमचें राष्ट्र भितें आम्ही हातीं शस्त्र धरून आमच्या स्वातंत्र्यासाठीं लढू शकणार नाहीं असें आम्हांला वाटतें सुभाषबाबूंनीं आम्हांला व जगाला सिद्ध करून दाखविलें, कीं आम्हांला वाटणारा हा भेदरटपणा क्षणिक आहे आम्ही, आमच्यातील व्यापारी व कारकून सुद्धां, आमच्यांतील मुलीसुद्धां हातीं शस्त्र घेतील आणि लढू शकतील सुभाषबाबूंनीं आमचा जातीय प्रश्न सोडविला, अन्नप्रश्न सोडविला, भाषेचा प्रश्न सोडविला—आणि काय करायचें बाकी ठेवलें आहे ? पूर्व आशियांत त्यांनीं केलेला प्रयोग हा आमच्या राष्ट्राला मार्गदर्शकत्वाची नवी खूणच आहे होय, पूर्व आशियांतील आझाद हिंद सरकारच्या प्रयोगानें आम्हांस अनेक गोष्टी शिकवल्या आहेत, आमचे डोळे उघडले आहेत आम्हांस आता वाटतें, कीं आम्ही अधिक टणक आहों, अधिक चांगले आहों स्वातंत्र्याची अधिक लायकी आमच्या ठिकाणीं आहे आमचें राष्ट्र सुभाषबाबूंचें ऋणी आहे हिंदुस्थानांत त्यांनीं जें केलें त्याबद्दल आम्ही ऋणी होतोंच, पण पूर्व आशियांत त्यांनीं ज्या गोष्टी केल्या त्याबद्दल त्यांचे आम्ही अधिक—फारच फार अधिक ऋणी आहोंत

**सुभाषबाबू झिंदाबाद! इन्किलाब झिंदाबाद! जय हिंद!**

२१ सप्टेंबर, १९४५

प्रिय भाई,

मी तुला आज बहुमोल वस्तु पाठवीत आहें. हिंदी स्वातंत्र्यलढ्यांतील आणीबाणीच्या काळांतील ही माझी रोजनिशी आहे. हिंदुस्तानच्या हितास ती उपयुक्त आहे असें तुला वाटलें तर तिचा तूं कांहींहि उपयोग करूं शकशील.

यांतील कांहीं भाग जर तूं प्रसिद्ध करूं इच्छिशील तर त्या भागाचें कसेंहि संपादन करण्यास तुला मोकळीक आहे.

मी एकच अट घालतें. आमच्या राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या कार्यांत त्यामुळें मदत व्हावी. एवढी हमी मिळाली म्हणजे, मी तुला हें जें साहित्य पाठवीत आहें त्याचा तूं पूर्ण मालक आहेस.

जय हिंद !

तुझी
एमू-भगिनी



*हिज एक्सलन्सी नेताजी*

सुभाषचंद्र बोस

*अर्झी हुकूमत इ-आझाद हिंद' या राज्याचे अधिपति*

*अध्यक्ष-आझाद हिंद संघ*

*आझाद हिंद फौजेचे सरसेनापति*

# कडकडणारी कढई

१ फेब्रुवारी, १९४२

माझ्याभोंवतीं भराभर घडणाऱ्या क्षोभजनक घटनांची नियमित रोजनिशी ठेवण्याचा मीं निश्चय केला आहे. रोजनिशी ठेवावी अशी इच्छा मला नेहमीं होई, पण हा सुनिश्चय कांहीं आठवडे चाले आणि पुन्हां त्याचा विसर पडे.

युरोपांत चाललेलें प्रचंड महायुद्ध फार दूर चाललें आहे असें वाटतें. तें हजारों मैल दूर आहेच आणि आम्हांस तें त्याहीपेक्षां दूर वाटतें. पण त्यानें अगदीं एका झेपेसरशीं पूर्व आशियालाहि ग्रासलें आहे. ब्रिटिशांचें बलाढ्य आरमार पॅसिफिकमधील आमच्या या समुद्रविभागांतून आतां बहुतेक पळालेलें आहे. हा पूर्वेकडील मुलूख त्याच्या हातचा गेल्यात. ब्रिटिशांचा सूर्य कधींच मावळत नसे असें मानलें जाई, पण आतां त्याला उगवायलाच जागा मिळणार नाहीं. म्हणून तो स्वाभाविक पुढें कायमचा मावळलेला राहील !

प्रत्येकाच्या आतां हें लक्षांत येत आहे, कीं ब्रिटिश साम्राज्य कांहीं दुर्भेद्य नाहीं, पराभव आणि अपमान यांचा चिखल ब्रिटिशांच्या निशाणावर उडूं लागेल. गेल्या वर्षी ७ डिसेंबरला पर्ल हार्बरवर जपान्यांनीं पहिला हल्ला चढवला. स्याम १३ तारखेस पडलें, वेक बेट २२ तारखेस, हाँगकाँग बेट २५ तारखेस आणि मॅनिला शहर २ जानेवारीला पडलें. २० डिसेंबरपासून पेनँग जपान्यांच्या हातीं आहे. जस्ताचे कारखाने असलेलें मुख्य ठाणें इपोह २९ डिसेंबर रोजीं जपान्यांनीं घेतलें. अजिंक्य मानले गेलेले ब्रिटिश साम्राज्यवादी आतां पळत सुटले आहेत. विमानतळ व वैमानिक रस्ते आणि समुद्रमार्ग यावर अस्ताव्यस्त-पणें पळून जाणाऱ्या लोकांची गर्दी होऊन त्यांचा जणुं घुसमटा आहे. आतां हीं माणसं सिंहाचे शूर बच्चे असें वाटत नाहींत. घाबरून पळणाऱ्या मेंढ्यांच्या कळप-सारखीं तीं वाटतात. जपानी लोक त्यांच्या पाठोपाठ त्यांचा पाठलाग करीत आहेत. अत्याचाराच्या अफवा आणि कथा एकसारख्या ऐकू येतात. माझ्या-भोंवतालीं पसरलेल्या भीतीच्या आणि घबराटीच्या वातावरणानें मनहि भारलें आहे. मलाहि पळून जावसं वाटतें.

पण पळून जायचें कुठें ? कुणाकडे जायचें ? आणि जायचें कसें ? नाहीं, मी पळून जाणार नाहीं मी आहें इथेंच रहाणार. माझा पति परत आल्यानंतर मी निघून गेलें असे त्याला आढळता कामा नये. त्याला संकटात सोडून देऊन मी माझ्या बचावासाठीं पळून गेलें असें त्यास वाटता कामा नये 'सिंगापुरात तुला भेटेन' असें त्यानें मला सांगितलें होतें. आकाश कोसळलें तरीहि सिंगापुरातच मी त्याच्यासाठीं वाट पाहीन.

मी पोटॅशियम सिनाइडची एक ल्हानशी कुपी आधींच मिळवून ठेवली आहे जपानी लोक माझ्या शरीराला उपद्रव देण्याचा प्रयत्न करतील तर मी काहीं त्यावेळीं हताश होणार नाहीं पण सख्या, तू कोठे आहेस ? तुला माझा आवाज ऐकू येत असेल तर, प्रियकरा, मी तुला सांगतें कीं कितीहि निर्दय छळवादी माझ्यासमोर आला तरी मी घाबरणार नाहीं. तुझ्या घराण्याची अब्रु आणि नाव मीं निष्कलंक ठेवीन.

सिंगापूर दिवसानुदिवस खरोखर फार महागडें होऊं लागलें आहे. बाजारभाव फार भरमसाट वाढले आहेत. प्रत्येक वस्तु फार महाग झाली आहे. मजजवळ पैसा थोडा, त्यातला पुष्कळसा पैसा अन्नद्रव्यावरच खर्च होत आहे. मला आतां रोजगार मिळविला पाहिजे. पण ज्या भुईवर आपण उभे आहों ती भुई, होऊं घातलेल्या धरणीकंपानें, थरथर कापू लागली आहे. अशा वेळीं रोजगार तरी कुठला मिळणार !

*२ फेब्रुवारी, १९४२*

सयामच्या बाजूनें जपानी ब्रह्मदेशात शिरू लागले आहेत. मर्गुई, टेव्हॉय आणि मौल्मीन यावर भडिमार सुरू झाला आहे. मौल्मीन जपान्यांच्या हातीं पडलेंच आहे. मार्तावान शौर्यानें प्रतिकार करीत आहे, पण तोहि व्यर्थच जाणार काय !

लोक पळत सुटले आहेत. मलायारूपी जहाज बुडत आहे असें पाहून त्याला त्याग करून ते पळत सुटले आहेत. विजयी जपान्यांना अगदीं सहज प्रवेश मिळत आहे. ब्रिटिश अधिकारी, त्यांच्या बायका त्यांचीं मुलें हीं सर्व

पळन आहेत किंवा पळून गेलीं आहेत. वाट्ट पाहाट, क्लुग आणि मर्सिंग अशा तीन बाजूंनीं आमच्या शहरावर हल्ला सुरू असून आमची कोंडी करून मलायाच्या बाकीच्या विभागातून आम्हास तोंडण्यात येत आहे. हें शहर त्याना घेऊ न देणें आम्हास शक्य होईल काय? ब्रह्मदेशातील पेगू आणि सिताग सोरें हा मुलुख जपान्यानीं व्यापलेलाच आहे.

अधिकारी म्हणतात, सिंगापूर 'अभेद्य' आहे. त्याच्यावर कोणीहि विश्वास ठेवीत नाहीं. त्याची इभ्रत धुळीला मिळाली आहे. पण मलायन आणि हिंदी लोक याच्याविरुद्ध असणारे त्याचे उर्मट वर्तन थोडेहि कमी झालेलें नाहीं.

'गाव सोडून चला', पळा, यासेरीज दुसरा शब्द पळून जाणाऱ्याच्या तोंडून निघत नाहीं. अमूक ठिकाणाकडे पळून जायचें हा विचारच कोणी करीत नाहीं. कोणीकडून जपान्याच्या हातून निसटा म्हणजे झाले

जपान्यानीं सिंगापूर घेण्यापूर्वीं अर्धे अधिक भारतीय मलाया सोडून गेलेले असतील. ब्रिटिशाच्या गुलामगिरीच्या जोखडाखालीं आम्हीं किती शेळपट मेंढरें झालों आहों!

## १५ फेब्रुवारी, १९४२

गेल्या थोड्या दिवसात मला रोजनिशी लिहायला वेळच मिळाला नाहीं. जे अपरिहार्य होतें तें आता घडून चुकलें आहे. 'अभेद्य कवचाला' तडा गेला. आता सिंगापूर हा काहीं ब्रिटिशाचा ल्ढाऊ तळ राहिलेला नाहीं. सिंगापूरचा आरमारी तळ बाधण्याला तीन कोटी पौंड खर्च आला आता जपानी सैनिकानीं सिंगापूर बदर ताब्यात घेतलें आहे. १५,००० ब्रिटिश, १३,००० ऑस्ट्रेलियन आणि ३२,००० हिंदी सैन्य आज शरण गेलें. ५० लाख लोकसंख्या आणि मलायाचा सुदर प्रदेश अशा रीतीने जपान्याच्या हातीं गेला!

लोक घाबरून गेले आहेत. परतु रस्त्यामध्ये मला सहासात माणसें भेटलीं. आम्हीं कुशल प्रश्न केले जपानी सैनिक अजून दुर्वर्तन करू लागलेले नाहींत याबद्दल त्यानीं समाधान व्यक्त केलें, जस्त आणि रबर याचें जगात जास्तींत

जास्त उत्पन्न मलायात होतें. जगातील ३८% जस्त आणि ४३% रबर हे मलायात होत असून तें आता जपानच्या हातीं आहे.

एकदर परिस्थिति सध्या कशी आहे याची नोंद मीं येथें केली पाहिजे. जपान्याचा विजय झाला याबद्दल मला खरोखर आनंद वाटत आहे का? प्रामाणिकपणें सांगायचें तर मला 'होय' म्हणता येणार नाहीं. मि जे—ला आनंद झाला. हा आनंद आपणास का झाला याचीं कारणें जे—सांगत होता माझी भूमिका डळमळीत होती. त्याची स्पष्ट आनंदाची होती कदाचित मला अजून साशंक रहाणे आणि मलायाच्या या आवरणात शिरलेले हे नवे देवूण कसे वागतात यावर पाळत ठेवणं अवश्य वाटत असावें.

मि जे—म्हणाला, "मी माझ्या स्वत च्या माहितीवरून बोलतो आहे." उत्तरेकडील ब्रिटिशाच्या इस्टेटींतील मजुरावर अलिकडे झालेल्या गोळीबाराची हकिगत त्यानें मला सांगितली त्या मजुराचा अपराध एवढाच, कीं बाजारभाव वाढलेले असल्याने त्या प्रमाणात खर्च भागविण्यासाठीं त्यानीं मजुरींत वाढ मागितली ब्रिटिशाचीं वृत्तपत्रे अगदीं अनिर्बंध असतात. भारतीयाच्या मालकीच्या वृत्तपत्रावर मात्र प्रसिद्धिपूर्व नियंत्रण घातले गेलें याची मि. जे—ला चीड आली होती.

वर्णविषयक बधनें आमच्या काळजात कशीं सलत आहेत, याची मला अनेक उदाहरणें माहीत होतीं सिंगापूरचा पोहण्याचा क्लब हा खास युरोपियना साठीं राखून ठेवण्यात आला होता, तेथें हिंदी लोकांना परवानगी नसे. हिंदी अधिकाऱ्यानीं तक्रारी केल्या, असंतोष दाखविला, तो एवढ्या मोठ्या प्रमाणात दाखविला कीं शेवटीं त्याना त्या पोहण्याच्या क्लबात प्रवेश मिळाला, पण पोहण्याच्या तलावात प्रवेश करण्याचा बदी होतीच. खरोखर, एकाच तलावात हिंदी आणि ब्रिटिश लोक पोहतील तर काय बिघडेल? पोम्फळ ऐटबाजी!

प्रिय पी—तू सुरक्षित असशील का? मी कबूल करतें कीं तुझ्या सुरक्षिततेबद्दल मला भीति वाटत आहे. काहींतरी सकट तुझ्यावर आलें असावे अशी भीति वाटते. एक क्षणभरहि डोळ्याला डोळा लागत नाहीं अथवा स्वस्थ बसवत नाहीं. तू कोणत्या स्थितींत आहेस, कुठे आहेस हें मला कळलें पाहिजे, कळलें पाहिजेच!

# आणि आतां पेटलेली शेगडी

१७ फेब्रुवारी, १९४२

सर्व हिंदी जमात क्षुब्ध आणि जागृत झाली आहे. जेथे जावें तेथें निरनिराळ्या मुद्यावर जोर देऊन सतत वाद घालण्यात येतात. टेबलावर मुठी आपटण्यात येतात. आवेशानें हातवारे केलेले दिसून येतात. या सर्व प्रकाराचें कारण जर ठाऊक नसतें तर सर्व समाजाचेच माथें भडकलें आहे का काय असे एखाद्यास वाटलें असतें !

जपानच्या मुख्य लष्करी कचेरींतून मेजर फुजिवारा यानें कांहीं प्रमुख हिंदी लोकांना बोलावणे पाठवलें. हे लोक फुजिवाराला भेटून परत आले त्यावेळीं दिवाणखान्यात लोकांचा जमाव खूप जमला होता. फुजिवाराशीं घडलेल्या मुलाखतीची हकिगत त्यांनीं सांगितली त्यावेळीं टांचणी पडलेलीहि ऐकू यावी इतकी शांतता तेथ होती. ते म्हणाले, फुजिवारा हा कृपाळूपणाची मूर्तीच दिसतो. फुजिवारानें सभ्यपणानें सांगितलें कीं ब्रिटिशांच्या लष्करी शक्तीला प्राणघातक टोला हाणण्यात आला असून हिंदी लोकांनीं उठावणी करावी व ,आपल्या स्वातंत्र्यासाठीं ब्रिटिश सत्तेवर घाव घालावा, याला ही वेळ अत्युत्कृष्ट आहे. जपान सर्व बाजूंनीं हिंदी लोकांना मदत करील. हिंदी लोक ब्रिटिश नागरिक आहेत व या दृष्टीनें कायद्याप्रमाणें ते जपानचे शत्रु आहेत हें जरी खरें असले तरी हिंदी लोक हे कांहीं राजीखुषीनें ब्रिटिशांचे नागरिक नाहींत हें जपानला माहीत आहे. जपानी सैन्याधिकारी हिंदी लोकांना शत्रु म्हणून वागविणार नाहींत, मित्र म्हणून वागविण्यास तयार आहेत, मात्र हिंदी लोकांनीं ब्रिटिशांचें प्रजाजनत्व सोडलें पाहिजे एवढी त्याची अट आहे. फुजिवारानें अशी सूचना केली, कीं "हिंदी लोक जर इंडिपेण्डन्स लीग स्थापन करतील तर त्यांना सर्व प्रकारच्या सवलती माझ्याकडून मिळतील."

फुजिवाराच्या भेटीस गेलेल्या पुढाऱ्यांचें एकमत झालेलें नाहीं. अनेकांना जपानच्या हेतूबद्दल संशय वाटला. म्हणून त्यांनीं उत्तर दिलें, कीं "मदतीच्या

या सूचनेबद्दल आभारी आहों; पण या प्रश्नाची चर्चा आणखी केली पाहिजे. ती केल्यावर काहीं दिवसानीं आम्ही तुम्हास पुन्हा भेटूं."

सख्या, तुझी अजूनहि काहीं बातमी नाहीं. मी चर्येवर शौर्य दाखवीत आहे. हसतें, विनोद करतें, आणि चोहोंकडे चर्चा करताना जो उत्साह दिसून येतो त्याच उत्साहात मनाला गुंतवून ठेवतें. माझ्या मनास दुःखाची जी कोरणी आहे तिचा कोणाला संशयहि येत नाहीं. पण प्रत्येक क्षणीं तुझ्या नावाचे ठोके माझ्या हृदयात पडत आहेत. कधींहि न संपणारा असा जप तेथें चालू आहे. ईश्वरा, त्याला निरोगी आणि सुखी ठेव. त्याचें रक्षण कर.

## २१ फेब्रुवारी, १९४२

पुढाऱ्यांनीं मेजर फुजिवाराला सावधपणाचें उत्तर पाठविलें आहे. त्यांत ते म्हणतात, "प्रश्न इतका गंभीर आहे कीं त्यावर निर्णय ठरविण्यासाठीं सर्व मलायातील हिंदी जमातीचा सल्ला घेणें भाग आहे." सेंट्रल इंडियन असोसिएशन ऑफ मलाया नांवाची एक संस्था असून तिचे अध्यक्ष श्री. एन. राघवन् याना सल्लामसलतीसाठीं सिंगापूरला बोलवावें अशीहि फुजिवाराला पुढाऱ्यांनीं सूचना केली.

यामुळें पुढील महिन्याच्या पहिल्या आठवड्याच्या सुमारास मलायांतील सर्व हिंदी पुढाऱ्यामध्यें सल्लामसलत घडून येण्याचा संभव आहे. सिंगापुरातील लोकमत विभागलेलें आहे. मात्र बहुमत इंडियन इंडिपेन्डन्स लीग स्थापन करावी या मताचें असून जपाननें दिलेल्या वचनावर जपानची कसोटी पहावी असें त्याना वाटतें. हिंदुस्तानच्या स्वातंत्र्यासाठींच—फक्त त्यासाठींच—आम्ही प्रयत्न करू असें आम्हीं जपानला स्पष्टपणें सांगूं शकतों.

पण कांहींना वाटतें, कीं ब्रिटिश हे परत सिंगापूर जिंकून घेतील. तेव्हां 'धार पाहात पाळतीवर असावें', निदान एकदोन महिने तरी ही भूमिका घ्यावी असें त्याचें म्हणणें. काय पण सावधगिरी !

## आणि आतां पेटलेली शेगडी

**२३ फेब्रुवारी, १९४२**

जपाननें 'अभेद्य' सिंगापूर कसें घेतलें त्याची कथा मीं नुकतीच ऐकली. श्री. के—यानें त्याला युद्धकैद्याच्या छावणींत भेटलेल्या हिंदी लष्करी अधिकाऱ्यांकडून ती कथा ऐकली.

सिंगापूर—म्हणजे आमचें सिंहपूर—याच्या तटबंदीला बगल देऊन जपान्यांनीं तें जिंकलें. समुद्राच्या बाजूनीं तें खरोखरच अभेद्य होतें; पण जमिनीच्या बाजूनें तें घेणें हा पोरखेळ होता.

जनरल बेनेटच्या ऑस्ट्रेलियन सैनिकांनीं जोहोरचा बचाव करावयाचा होता; पण ते सिंगापूरकडे मागें हटले.

सिंगापूरला पाण्याचा पुरवठा जोहोरमधून येतो. जपान्यांनीं हा पाण्याचा पुरवठा तोडला तेव्हां शरण जाण्याखेरीज गत्यंतरच उरलें नाहीं.

'लष्करी दृष्ट्या कुचकामाचें'—या शब्दात सिंगापूर अभेद्य म्हणणाऱ्या अधिकाऱ्याचे वर्णन हिंदी अधिकाऱ्यांनीं केलें. श्री. के—म्हणाला, जपान्यांनीं ब्रिटिश सेनापतींना सपशेल चकविलें यात मुळींच शंका नाहीं. ब्रिटिशांना आधुनिक रणनीति माहीतच नाहीं. सयाम हाच मलायाला जाण्याचा मुख्य रस्ता आहे याची विस्मृति ब्रिटिशांना पडावी हा केवढा मूर्खपणा! एखादें पोरसुद्धां नकाशाकडे पाहून ही गोष्ट सांगूं शकेल.

श्री. के—म्हणाला, कोटाबाहारूपासून जपान्यांनीं चढाई सुरू केली त्यावेळीं मलायांत ब्रिटिशांचें एकहि टँक नव्हतें. खरीखुरी पँझर पलटण तेथें मुळीं नव्हतीच. तेथें कांहीं चिलखती गाड्या होत्या, पण त्याहि मागील युद्धांत पॅलेस्टाइनमध्यें मार खाल्लेल्या होत्या. कांहीं पंचवीस वर्षांहतक्या जुन्या होत्या. आधुनिक पद्धतीच्या गोळीबारास त्या अगदीं निरुपयोगी होत्या. निःशस्त्र जमातींचे दंगे थांबविण्यासाठीं बुजगावणें म्हणून प्रदर्शन मांडण्याच्या लायकीच्या त्या गाड्या होत्या. या चिलखती गाड्यांत मोठ्या मशीनगन्सहि नव्हत्या. जपानी सैन्य, अगदीं आरामांत चालत आलें यात कांहींच आश्चर्य नाहीं.

आणि मलायन सरकारच्या मुलकी नोकरवर्गाच्या अंगीं किती जडत्व आलें होतें ! उद्धट ब्रिटिश अधिकारी आणि पादऱ्या कातडीचे 'बडे साहेब' रोज रात्रीं जेवणें झोडीत, नाचरंग करीत आणि मजा मारीत होते. अर्धा मलाया जपाननें जिंकला असताना देखील सिंगापुरात ही चैनबाजी चालली होती.

पूर्व आशियातील ब्रिटिश सरसेनापति ब्रुक पोर्फॅन याच्या एका मुलाखतीची आठवण श्री. के—सांगतो. मलाया, पर्लहार्बर आणि मॅनिला यावर जपानचा हल्ला होण्यापूर्वी पाच दिवस पोर्फॅननें ही मुलाखत दिली होती. सप्टेंबरची ३ तारीख होती. सरसेनापति पोर्फॅनचे ते शब्द श्री. के.—च्या कानात घुमत होते. पोर्फॅन म्हणाला होता, "टोजो डोके ताळ्यावर आहे. जपान्याची बुद्धि कुंठित झाली आहे. कुणीकडे वळावें हे त्याना कळत नाहींसें झाले आहे. त्याचे अमुक असें निश्चित धोरण नाहीं. ब्रिटिश अथवा अमेरिकन याजवर हल्ला करण्याची जपानची छाती नाहीं. जर आमच्यावर हल्ला करण्याचें धाडस ते करतील तर आम्ही त्याना चांगला धडा शिकवू. त्याना तोंड देण्यास आम्ही सज्ज आहों."

पण जपान्यांच्या ठिकाणीं तें धाडस होतें असें त्यानीं सिद्ध केलें. प्रिन्स ऑफ वेल्स व रिपल्स हीं दोन अतिविध्वंसक लढाऊ जहाजें त्यानीं बुडविलीं. हौदात कागदी नावा बुडवाव्या तशी या दोन युद्धनौकांची जपान्यानीं वाट लावली !

खरोखर ब्रिटिश सिंहानें आपणास गाडून घेण्याची तयारी केली आहे का ? वस्तुस्थिति तर तशीच दिसते.

२८ फेब्रुवारी, १९४२

अखेरीस एकदा बातमी मिळाली ! उत्कृष्ट बातमी मिळाली. युद्धैन्याच्या छावणींत पी—आहे. जपान्याना शरण जाण्याहून त्याच्या तुकडीला कांहीं इलाजच नव्हता असें दिसतें. टँक्सखालीं चिरडून जाणें, तोफखान्यापुढें अथवा बॉम्बहल्ल्याखालीं उध्वस्त व्हावें अथवा शरण जाणें याहून अन्य मार्ग त्याना कांहीं

नव्हता. अशा स्थितींत ते शरण गेले यात काहींच आश्चर्य नाहीं. त्याच्याजवळ पुरेसा तोफा नव्हत्या. विमानदळाचें पाठबळहि त्याना नव्हतें. ऑस्ट्रेलियनांनीं पळ काढल्यामुळे त्याची बगल उघडी पडली.

मला असें सांगण्यात आलें, कीं शस्त्रें खालीं ठेवण्याचा हुकूम ऐकून सैनिकांच्या डोळ्यातून घळघळ पाणी आलें.

पण यात अत्युत्कृष्ट गोष्ट ही कीं पी—सुरक्षित आहे, त्याला इजा वगैरे झालेली नाहीं. सेनापतीकडे मीं त्याच्यासबंधानें अर्ज केला आहे. त्याला भेटण्याची, अन्न, कपडे, वाचण्याचीं पुस्तकें आणि त्याला लागणाऱ्या इतर वस्तु देण्याची परवानगी मीं मागितली आहे.

तो लवकरच बंधमुक्त होईल असें आश्वासन मला मिळालें आहे. कारण इंडियन इंडिपेन्डन्स लीग स्थापन होताच हिंदी लोकांनीं हिंदी लोकांचीच काळजी करावयाची आहे.

या घटनावरींतील आणखी एक दुवा मला नोंदला पाहिजे. श्री. रास बिहारी बोस यांनीं, टोकिओला परिषदेसाठीं पुढाऱ्यांनीं जावें, अशी तार केली आहे.

११ मार्च, १९४२

बिचारे रोजनिशी ! मी तुला विसरलेच होतें; पण काहीं झालें तरी सर्व बातमी मला नोंदलीच पाहिजे.

पी—सुरक्षित आहे. मी त्याला भेटलें. सेनापतीच्या दिवाणखान्यात मला पहाताच त्याच्या चेहऱ्यावर आपोआप आनंद झळकला. त्यानें खूप यातना सोसल्या आहेत. त्याच्या चेहेऱ्यावर काळजीनें सुरकुत्या पडल्या आहेत हें माझ्या लक्षात आल्यावाचून राहिलें नाहीं. त्याचीं बोटें थरथरत होतीं हेंहि माझ्या लक्षात आलें. गुप्तपणें शत्रूच्या क्षेत्रात शिरकाव करणाऱ्या जपान्यांच्या अभिनव कारवायानीं ब्रिटिश सेनापतींची रणनीति कशी उधळून लावली गेली हें पी—नें मला सांगितलें. मलायाच्या पश्चिम किनाऱ्यावर अनेक

ठिकाणीं जपानी सैनिक उतरले. ब्रिटिश सैनिकाच्या पिछाडीच्या जागाच त्यानीं यावेळीं निवडल्या. त्यामुळ शिस्तीने माघार घेणे शक्य न होऊन ब्रिटिश सैन्याची वाताहत झाली. पी—म्हणतो 'आमचे सर्व सेनापति गोंधळले. शत्रूच्या या रणनीतीचा त्याना उलगडाच होईना.'

रगून जपानच्या हातीं पडलें ! चार दिवसापूर्वी ब्रिटिश सैन्यानें तें खाली केलें. सोनेरी 'श्‍वे डॅगन पॅगोडा'चें रगून जपानच्या हातीं गेलें. जेथें बुद्धाचे दोन केस पुरलेले आहेत असें हें शहर आज जपानच्या मुलखात आहे.

हिंदी लोकाची पहिली परिषद सपली. ती काल व परवा येथें सिंगापुरांत भरली. आता या शहरास सिंगापूर म्हणता कामा नये. शोनान—दक्षिणेचा दिवा—हें नवें नाव जपान्यानीं त्याला दिलें आहे. मी या परिषदेत स्वय सेविका होतें. मलायाच्या सर्व प्रदेशांतून प्रतिनिधी आले होते. सयाममधूनहि थोडे आले होते. मलाया आणि सयाम यांतून टोकिओच्या परिषदेसाठीं अधिकृत प्रतिनिधींमडळ जावें अशी सूचना श्री. रास बिहारी बोस यानीं केली होती. जपान्याचा त्याबद्दल विशेष आग्रह होता. पण आमच्या पुढाऱ्यानीं अगदीं सावधपणें पावलें टाकण्याचें ठरविले आहे. त्यानीं फक्त एक गुडविल मिशन नेमलें आहे. टोकिओत कोणतें धोरण स्वीकारावयाचे यासबधानें आगाऊ अमूक एक भूमिकेनें बाधून घेण्याची त्याची इच्छा नाहीं. दरम्यान तुरुगातून सर्व हिंदी लोकाना बधमुक्त करावें अशी जपानी सेनापतीकडे त्यांची मागणी आहे.

### २३ मार्च, १९४२

आतापर्यंत मीं पी—ची अनेक वेळा भेट घेतली. छावणीमध्यें सैनिकाची आपसात मोठी हृदयसशोधक चर्चा चालू आहे असें तो सागतो. बहुसख्य सैनिकाचें असें मत आहे कीं जपान्याना जाऊन मिळालें पाहिजे असें सागण्यात आलें तर त्यास स्पष्ट 'नाहीं' असेंच उत्तर द्यायचें, पण हिंदुस्थानच्या स्वातत्र्या-साठीं प्रयत्न करून पहाण्याची परवानगी जर मिळाली आणि ब्रिटिश साम्राज्य शाहीपासून हिंदुस्थान स्वतत्र करून घेण्यासाठीं सैन्य सघटित करण्यास जपाननें

जर मदत दिली तर तो प्रयत्न करण्यास मात्र आता तयार आहे. पण यासंबंधीं त्यांना ठाम आश्वासन पाहिजे. ते म्हणतात, आमची हिंदी स्वामिनिष्ठेची लष्करी शपथ ही स्वदेशाबद्दलच्या स्वामिनिष्ठेची आहे. पी— म्हणतो, ही विचारसरणीच अधिकाधिक लोकप्रिय होऊ लागली आहे; त्या जपानच्या हेतूविषयीं ते फार साशंक आहेत. चिनी लोकांवर त्यांनी केलेले अत्याचार त्यांना माहीत आहेत. जपान्यांचे फॅसिस्ट मार्ग त्यांना पसंत नाहींत. आपल्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं लढण्यास आणि त्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्यास आपले हात निष्कलंक असले पाहिजेत अशी त्यांची मागणी आहे. त्यांना हिंदी लोकांचे हिंदी सेनापतीच्या हाताखालचें आणि हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठीं लढणारें असें हिंदी सैन्य पाहिजे आहे. हे घडत नसेल तर मरूं, दगडासारखे बसून मरूं, केवढ्याहि यातना सोसून मरण पत्करूं असा त्यांचा हट्ट आहे. पी— म्हणतो, ब्रिटिश साम्राज्यवादाविरुद्ध त्यांना वाटणारा द्वेष कितीहि प्रादेशिक व खोल असो, जपानच्या हातचें खेळणें होण्यास हे हिंदी सैनिक कधींहि संमति देणार नाहींत. त्यांच्यामध्ये स्वदेशाभिमान अतिशय जागृत आहे.

रेडिओवर इतक्यातच बातमी आली. जपान्यांनीं अंदमान बेटावर [illegible] करून तीं व्यापलीं. हिंदुस्थानवरील चढाईहि सुरू झाली की काय!

३१ मार्च, १९४२

चीनमधील, मलायातील, सयाममधील व जपानमधील हिंदी लोकांची टोकिओमध्यें भरलेली परिषद संपली. श्री. रास बिहारी बोस अध्यक्ष होते. २८ तारखेपासून ३० तारखेपर्यंत ती चालली. सयामपासून हिंदी प्रतिनिधींना घेऊन जाणाऱ्या विमानाला एक अपघात झाला. अतिशय प्रभावी असे स्वामी सत्यानंद पुरी या अपघातात मृत्यु पावले. ही नुकसानी फार मोठी आहे।

टोकिओतील परिषदेने इंडिपेन्डन्स लीग स्थापन करण्याचा ठराव केला. 'कोणत्याहि प्रकारच्या परकीय नियंत्रणापासून, हस्तक्षेपापासून [illegible] [illegible] मुक्त असें पूर्ण स्वातंत्र्य स्थापन करणें' हा सदर लीगचें ध्येय ठरविण्यात आला.

आझाद हिंद फौज निर्माण करणें हा या लीगचा सर्वांत महत्त्वाचा ठराव होता.

याच परिषदेने पूर्व आशियातील सर्व हिंदी लोकांची बँकॉक येथें पूर्ण प्रातिनिधिक अशी बैठक भरविण्याचे ठरविले. या बँकॉकच्या परिषदेनें अधिकृतपणे इंडियन इंडिपेन्डन्स लीग स्थापन करावयाची व लीगची कार्यसमिति नेमावयाची आहे.

शाबास! माझ्या देशबांधवांनो शाबास! तुम्ही टोकिओमध्यें सिंहाच्या दरींतच प्रवेश केलात आणि आपल्या राष्ट्राचे हितसंबंध रक्षिण्यासारखे निर्णय मोठ्या धैर्यानें ठरविलेत.

पी—, तुला घरीं आणून तुझी मी काळजी वाहीन तो दिवस आता फार दूर नाहीं. खरोखर युद्धबंदींच्या छावणींतून तुझी मुक्तता होणं ही गोष्ट आता अगदीं नजीकची आहे. ती फार लांबणीवर पडूच शकत नाहीं. तरी पण मला किती तरी भीति वाटत आहे. कदाचित असे होईल काय?...तसें होईल काय?...

### १३ एप्रिल, १९४२

अजूनहि पी—युद्धकैद्यांच्या छावणींतच आहे. रोज त्याच्या सुटकेसंबंधीं बोलवा ऐकूं येत आहे. सगळा दिवस ती बोलवा ऐकण्यात अगदीं कंटाळवाणा जातो. पण टोकिओ परिषदेहून परत आलेल्या पुढाऱ्यानीं तडकाफडकीं कोणताहि निर्णय घेऊं नका असा सल्ला त्या लोकाना दिला आहे. आपण करू ती प्रत्येक गोष्ट जवळ जवळ एकमतानें झाली पाहिजे असे त्यांचे म्हणणें आहे. हिंदुस्तानचें स्वातंत्र्य व इंडियन इंडिपेन्डन्स लीगची कामगिरी यासंबंधानें जपाननें अजून कांहींच आश्वासन दिलें नाहीं.

म्हणून—आणखी वाट पाहायची. खरोखर आतां अधिक वाट पाहणें अतिशय तापदायक झालें आहे.

पण दरम्यान मीं प्रत्यक्ष कार्य आगाऊर घेतलें आहे. आय्. आय्. एल्. च्या (इंडियन इंडिपेन्डन्स लीगच्या) मलायांतील सर्व शाखांची परिषद २२ तारखेला

शोनानला बोलावली आहे. त्या कामामध्यें मी माझा वेळ गुंतवितें; पण घरीं आल्यावर पुन्हा मी त्या भकास घरात एकटीच.

चिनी लोकाचा जपानी लोक उघडच अतिशय द्वेष करतात. मलायातील लोकहि त्याचा द्वेष करतात. जपानी लष्कराने चिनी लोकाचा छळ केल्याचा व त्याना निर्दयपणें वागवल्याच्या अनेक अफवा ऐकू येत आहेत.

माझी पोटॅशम सिनाइडची कुपी अजूनहि माझ्याजवळ आहे—जगदीं चौवीस तास माझ्याजवळ आहे.

एकूण सभासदसंख्या ९५००० झाली आहे. पेनँग, पेरॅक, केडाह, सेलॅंगोर, नेग्रीसेम्बिलम, मलाक्का आणि जेहोर या संस्थानांनीं मुख्य शाखा व बावीस पोटशाखा स्थापन केल्या. आजारी आणि गरीब यांना साहाय्य करण्या-साठीं सेलॅंगोरनें सर्वांत मोठी मदतछावणी स्थापिली आहे पेरॅकमध्ये 'सुंगेइ माणिक' योजनेखालच्या जमिनींत हिंदी लोकांची वसाहत करण्यासाठीं वाटाघाटी सुरू आहेत.

ज्या एका कार्यानेंच पी—स्वतंत्र होईल व आमची भारतमाता स्वतंत्र होईल असे हें कार्य करणें अवश्य आहे व मीं तें करावें ही गोष्ट पी—ला पटते यामुळें मला फार आनंद होतो. स्त्रियांनीं एकलकोंडें राहण्याचे, अनौप चारिक पडद्यात राहण्याचे, दिवस गेले. मला आता मी स्वतंत्र आहें, आझाद आहें असे वाटतें.

आणखी दोन घटनांची नोंद मला येथे केली पाहिजे २१ एप्रिलला लॅशिओ जपानच्या हातीं पडलें आणि बर्मा रोड बंद झाला. १ तारखेस मंडाले पडलें. वैमानिक हल्ल्यानें मंडालेचा भयंकर विध्वंस झाला असें मीं ऐकलें. सुंदर मंडाले! तुझा सर्वनाश झाला! युद्धदेवाना पौर्वात्य राष्ट्रांतील आणखी एका सुंदर जागेचें बलिदान झालें!

२४ जून १९४२

आज मी अगदीं थकलें आहे. शरीरानें गळून गेलें आहे. आताच आम्ही बँकॉकहून परत आलों पूर्व आशियातील सर्व प्रदेशांतील हिंदी लोकांची परिषद तेथ भरली होती शंभर प्रतिनिधी हजर होते १५ तारखेस परिषद सुरू झाली आणि मुक्तीचा काल सपला नाया, सुमात्रा, इंडोचायना, बोर्निओ, मांचुरो, हाँगकाँग, बर्मा, मलाया, जपान या सर्व ठिकाणाहून प्रतिनिधी आले होते युद्धवद्यांचे प्रतिनिधिहि परिषदेस हजर होते.

आय्. आय्. एल्. ची अधिकृतपणें सुरुवात झाली. तिची घटना लिहून काढण्यात आली व मंजूर झाली. 'ऐक्य, विश्वास आणि त्याग' हें तिचें ध्येय आहे. सर्व हिंदी जनतेचें एका घटनेत ऐक्य करणें, हिंदुस्तानचें स्वातंत्र्य

शोनान येथील स्त्रियांच्या मेळाव्यापुढें सुभाषबाबू
'झाशीची राणी' पलटणीचें निरीक्षण



"मी फक्त हिंदुस्तानलाच स्वामिनिष्ठ राहीन"
आझाद हिंद फौजेची स्थापना जाहीर करता वेळचे सुभाषबाबूंचें भाषण



सुभाषबाबूंना फंड देण्यासाठी मलायाचे व्यापारी खोळंबून उभे आहेत.

तावडतोब मिळविणे आणि स्वातंत्र्याचे ध्येय प्राप्त करून घेण्यासाठीं मृत्यूसुद्धा कोणताहि स्वार्थत्याग करणें असा या ध्येयाचा अर्थ होय.

परिषदेनें पुढील निर्णय ठरविला —" हिंदुस्तान एक व अखंड आहे. कोणतीहि चळवळ राष्ट्रीय स्वरूपाचीच असली पाहिजे. वगाय, जातीय अथवा धार्मिक भूमिका ही त्याज्य आहे. कार्यक्रम आणि कार्याची योजना इंडियन नॅशनल कॉंग्रेसचीं ध्येये व कॉंग्रेसचे हेतु यांच्या पद्धतीचीच असेल. हिंदुस्तानची भावि राज्यघटना हिंदी जनतेच्या पूर्ण स्वतंत्रपणे निवडलेल्या प्रतिनिधींनींच करावी "

या परिषदेने लीगच्या कौन्सिल ऑफ ॲक्शनच्या नियंत्रणाखालीं आझाद हिंद फौज उभारण्याचे ठरविले. या फौजेला स्वतंत्र हिंदुस्तानच्या स्वतंत्र राष्ट्रीय सैन्याचा दर्जा देऊन जपानी सैन्याच्या बरोबरीनें वागविण्यात आल पाहिजे. तसेंच असेंहि ठरविण्यात आलें कीं हिंदुस्तानातील परकीयाविरुद्ध लढण्यासाठींच आणि हिंदुस्तानचें स्वातंत्र्य टिकविण्यासाठींच या सैन्याचा उपयोग करा जाईल. दुसऱ्या कोणत्याहि कारणासाठीं उपयोग केला जाणार नाहीं.

कौन्सिल ऑफ ॲक्शनवर एक अध्यक्ष आणि चार सभासद असावे. त्या सभासदापैकीं दोघेजण आझाद हिंद फौजेपैकीं असावे. रासबिहारी बोस हे त्याचे पहिले अध्यक्ष असावे. श्री. एन्. राघवन्, श्री. के पी. के. मेनन्, कॅप्टन मोहनसिंग आणि कर्नल जी. क्यू. गिलानी हे सभासद असावे.

या कौन्सिल ऑफ ॲक्शनला एक स्पष्ट हुकूम देण्यात आला आहे. कोणतीहि लष्करी हालचाल करण्याचे कौन्सिलनें योजले तर ती हालचाल हिंदुस्तानातील क्रांतिकारक उठावणीशी समकाल असावी. तसेंच त्याच वेळीं ब्रिटिश हिंदी सैन्यातहि उठावणी व्हावी.

- परिषदेनें ज्पानकडून एका अधिकृत घोषणेची मागणी केली आहे. ब्रिटिश साम्राज्यातून हिंदुस्तान बाहेर पडताच जपानी सरकारनें हिंदुस्तानच्या प्रदेशाचे ऐक्य मान्य करून हिंदुस्तानच्या पूर्ण स्वतंत्रसत्तेला मान्यता द्यावी. हिंदुस्तानचें हें स्वातंत्र्य कोणत्याहि परकीय वर्चस्वापासून, राजकीय, लष्करी अथवा आर्थिक नियंत्रणापासून अथवा हस्तक्षेपापासून पूर्ण अलिप्त असें असावें.

कोणाहि हिंदी माणसाला परकी शत्रु म्हणून लेखण्यात येऊं नये, अथवा जपाननें शत्रूच्या मिळकतीप्रमाणें कोणाहि हिंदी इसमाची मिळकत जप्त करू नये.

इंडियन नॅशनल काँग्रेसचा ध्वज हा आपला ध्वज असें परिषदेनें ठरविलें.

श्री. सुभाष बोस याना पूर्व आशियात येऊ देण्यास व जातीनें हिंदी स्वातंत्र्याची चळवळ आपल्या पुढारीपणाखालीं चालविण्यास सवलती देण्यात याव्या अशी आम्हीं विनती केली आहे.

पी—ची अपेक्षा अशी आहे कीं युद्धकैद्यांपैकीं बहुसंख्य लोक आझाद हिंद फौजेंत व आय्. आय्. एल्. मध्यें सामील होतील. फौजेंत सामील होण्याबद्दल नागरिकांकडून सार्वत्रिक मागणी आहे आणि त्याना त्यासाठीं परवानगी मिळणार आहे. आमच्यापैकीं कांहीं स्त्रियाहि सैन्यात जाण्यास उत्सुक आहेत. पण आमच्या सूचनेला पुढारी सहानुभूति दाखवीत नाहींत.

मला वाटतें बरखास्त झालेल्या ब्रिटिश सैन्यातून बाहेर पडलेल्या लोकांनीं या फौजेंत सामील होणें हें अगदीं योग्य आहे; कारण कांहीं झालें तरी त्यांनीं स्वामिनिष्ठेची शपथ घेतली आहे ती आपल्या राष्ट्राबाबत घेतली आहे. आपल्या मताला योग्य वाटेल त्या दिशेनें जाऊन राष्ट्रसेवेची घेतलेली शपथ यथाशक्य पार पाडण्याचा त्याना अधिकारच आहे, आणि जर त्यांनीं ही देशसेवा करण्याचें साधन ही आझाद हिंद फौज हेंच आहे असें ठरविलें तर त्याचें करणें सर्वस्वी न्याय्य होईल.

हिंदुस्तान, भारतमाता—हे दोन शब्द माझ्या अंतःकरणात केवढी स्फूर्ति उत्पन्न करतात! परिषदेंतील वक्त्यांचीं भाषणें मीं कितीतरी लक्षपूर्वक ऐकलीं. माझें अंतःकरण हेलावलें. स्वातंत्र्याची आकांक्षा पुनः पुन्हा दडपली गेली असूनसुद्धा ती अजून टिकून राहिली आहे. दोडशें वर्षांच्या परकीय राजसत्तेच्या अवजड जोखडाखालीं असूनहि हिंदुस्तानची स्वातंत्र्य काक्षा वाढत्या तीव्रतेनें शिल्लक आहे. दारिद्र्य आणि दुःख यांखालीं भारतमातेचीं लेकरें चिरडलेलीं हिंदीं लोकांनीं पाहिलीं आहेत. आपली मातृभूमि स्वतंत्र व्हावी

## आणि आतां पेटलेली शेगडी

एवढाच त्याचा एक गुन्हा होता. एकाच स्वातंत्र्याच्या ध्येयासाठीं स्वातंत्र्यवीर लढले; एकच दुर्दैवी शेवट त्याना लाभला. प्रत्येक वेळीं त्याच छळवादी शत्रूनें त्याचा तसाच निकाल लावला आणि पुन्हा प्रत्येक वेळीं एक नवी पिढी दुर्दम आशा बाळगून हुतात्म्याच्या रक्तांतून वर आली व तिनें पुन्हा तोच स्वातन्त्र्यलढा केला. लढा आणि मृत्यु याचें चक्र सतत चालू आहे, तें थांबत नाहीं, थकत नाहीं. आम्ही मान वाकवायची नाहीं असें ठरविलें आहे. दुर्दम अशा चिकाटीनें आमच्या अंत:करणात स्वातन्त्र्याचा अग्नि आम्हीं जिवंत ठेवला आहे. कारकून आणि हमाल याचें राष्ट्र अशा दर्जाला आम्ही गेलों होतों. पण आमच्या अंत:-करणातील अग्नि अजूनहि प्रज्वलित आहे. वर्षानुवर्षे दुष्काळ आणि महापूर यानीं आमच्यातील लक्षावधि माणसें मेलीं आणि तरीहि आमच्या हृदयातील लहानसा स्फुलिंग आम्ही आमच्या मुलाबाळाना देऊं शकलों आहों. याच बारीकशा ठिणगींतून पुनः पुन्हा ज्वाळा भडकल्या आहेत. पुन्हा एकदा इतिहासानें अग्निदिव्यासाठीं आम्हाला हाक दिली आहे आणि साम्राज्यशाहीचा हा दुष्ट तुरुंग पेटविण्यासाठीं आमच्या देहाच्या जिवंत दिवट्या करण्यास आम्ही सज्ज झालो आहों.

### ११ ऑगस्ट, १९४२

प्रचंड वादळापूर्वी अशुभ असा गडगडाट वाटण्यासारखी बातमी आज शोनानला पोचली. मुंबईत भरलेल्या ऑ. इ. कॉं. कमिटीच्या बैठकींत इंडियन नॅशनल कॉंग्रेसनें 'सर्व विदेशियानीं हिंदुस्तान सोडावें' असा ठराव केला. महात्मा गांधींनीं 'करा अथवा मरा' असा संदेश सर्व देशभक्ताना दिला आहे. "पुढाऱ्याच्याकडून मार्गदर्शन मिळण्यासाठीं वाट पाहू नका. तुम्हाला योग्य वाटतें तें करा. ज्यामुळें स्वातन्त्र्य मिळेल असें कांहींहि करा" हाच गांधींच्या संदेशाचा थोडक्यात सारांश आहे.

स्वातन्त्र्य हिसकून घेण्याची हीच संधि आहे हें त्यानाहि कळलें आहे. आमच्या बॅंकॉक परिषदेचेंहि हेंच मत होतें. कॉंग्रेसनें पसंत केलेल्या मार्गानेच आम्हीहि चालत आहों हें पाहून आम्हाला समाधान वाटलें.

ब्रिटिश सरकारनें सर्व लहानमोठ्या पुढाऱ्याना पकडलें आहे. परंतु सरहद्दीच्या दुसऱ्या बाजूस लढ्यात भाग घेणारे सक्रिय वीर आहेत हें आता आम्हाला ठाऊक आहे. आम्हाला शंभरपट बळ आलें आहे.

१६ सप्टेंबर, १९४२

हिंदुस्तानात घडत असलेल्या घटनाची बातमी येथे झिरपून येऊ लागली आहे. आपोआपच एक प्रचंड क्रांति तेथें होत आहे. हिंदुस्तानच्या कोना कोपऱ्यापर्यंत तिची झळ लागली आहे. आपण आपल्या या क्षेत्रात आपलें काम भराभर उरकलें पाहिजे. ब्रिटिश साम्राज्यशाही करकरू लागली आहे तिची अखेरची घंटा वाजू लागली आहे गोऱ्या राष्ट्राच्या शिरावरचें हिंदी साम्राज्याचे ओझे आपण लवकरच उतरून घेऊ.

मलायातील आमचे कार्य मूळ धरू लागलें आहे. इंडियन इंडिपेन्डन्स लीगचे सभासद १२०००० झाले आहेत पोटशाखाहि वाढत आहेत. त्याची सख्या चाळीस झाली आहे.

सर्व बाजारभाव भराभर चढत आहेत. चलॅन खूप वाढलें आहे. जपानी सरकार नोटा हजारोंनीं छापीत आहे. जुन्या डॉलरला जेवढा माल मिळत असे त्याच्या दशांश मालहि हल्लीच्या डॉलरला मिळत नाही. तेथल्या हिंदी लोकाना आमच्या लीगने साहाय्य केले नसते तर उपासमारीने कितीतरी लोक मेले असते. विशेषत मजुराची परिस्थिति अत्यंत करुणाजनक आहे.

१ ऑक्टोबर, १९४२

४२ ३४ मीटरवर कॉंग्रेस रेडिओ आम्हीं ऐकला. खरोखर आगावर रोमाच उभे राहिले ! स्वतन्त्रभारत आपल्या सकटाचें दर्शन घेण्यास जगाला बोलावीत आहे.

लवकरच सुभाषबाबू पूर्व आशियात येणार असें आम्ही ऐकले. अगदी पहिल्या दर्जाचें हिंदी सैन्य स्थापन करण्यासाठीं कौन्सिल ऑफ ॲक्शन जपानशीं अगदीं शौर्यानें झगडत आहे. आमची अपेक्षा होती तितक्या सुलभपणे

कामें होतातसें दिसत नाहीं. बँकॉक परिषदेच्या ठरावाना अजूनहि उत्तर मिळालें नाहीं.

जपानी आम्हास फसवतील काय ? पी—च्या डोळ्यात हा अलिखित प्रश्न मला दिसतो. त्याच्या वर्तनातहि या भीतीचा थरकाप दिसून येतो. पुन्हा एकदा विश्वासघाताच तोंड देण्याची पाळी हिंदी जनतेवर येणार काय ? पण मला आशा आहे. मी आशावादी आहें. सुभाषरावू ताजना उलटवूं शकतील.

१७ ऑक्टोबर, १९४२

पी—हल्लीं रात्रंदिवस कामात आहे. सकाळपासून रात्रीपर्यंत त्याची एकसारखी चर्चा–चर्चा–आणि पुन्हा चर्चाच चालते. नतर रात्रीचा बहुतेक वेळ बरोबरचे अधिकारी व सामान्य सैनिक यांच्याशीं आझाद हिन्द फौज उभारण्यासाठीं वाटाघाटी चालतात.

आय्. आय्. एल्. नें हिंदी नागरिकाना फौजेंत सामील होण्याला विनती केली आहे. याची भूमिका अगदीं ऐच्छिक आहे. प्रत्येक समर्थ हिंदी माणसाला सक्तीनें सैन्यांत घ्यावें अशीहि काहींची सूचना आहे. पी—अशी माहिती देतो, कीं काहीं हिंदी अधिकारी फौजेंत सामील होण्याचें नाकारून बाजूस राहात आहेत व फौज बनविण्यास विघ्न करीत आहेत. अमक्या अमक्या-पेक्षा आम्ही अधिक वरिष्ठ दर्जाचे आहो म्हणून त्याच्या हाताखालीं काम करणार नाहीं अशा स्वरूपाच्या तक्रारी ते करतात. खरोखर हे लज्जास्पद आहे. त्याना शिस्तीची भावना काहीच नाहीं काय ? पूर्वी ब्रिटिश सैन्यात त्याना जो उच्च दर्जा होता तो स्वातंत्र्यासाठीं लढणाऱ्या आमच्यावरहि त्यानीं लादावा काय ? धिक्कार असो त्याना !

कौन्सिल ऑफ ॲक्शननें ५६ हजारपैकीं जवळजवळ ५० हजार युद्धकैदी फौजेत सामील करून घेतले आहेत. सोडकर लोकाना कौन्सिल ऑफ ॲक्शननें ताकीद दिली असून फौजेचें काम त्यानीं बिघडवूं नये असे बजावलें आहे.

३ नव्हेंबर, १९४२

जपानच्या वरिष्ठ सेनापतींशीं असलेले आमचे संबंध बिघडू लागले आहेत इवाकुरो किकान हें जपानी सैन्याचे परक्यांशीं संबंध ठेवणारें खातें (लिऑसॉ डिपार्टमेंट) आहे. या किकान खात्यानें आमच्या व्यवहारात हस्तक्षेप करता कामा नये अशी कौन्सिल ऑफ ॲक्शनची निःसंदिग्ध मागणी आहे.

वादाचा मुद्दा अगदीं स्पष्ट आहे. इवाकुरो किकान खातें उघड कबुली देत नाहीं तरी जपानच्या हिंदुस्तानवरील चढाईसाठीं आमच्या हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीचा उपयोग करण्याचा डाव किकान खातें खेळत आहे यात संशय नाहीं श्री आर—यांनीं मला सांगितलें तें खरें असल्यास कौन्सिल ऑफ ॲक्शन इवाकुरो किकानच्या धोरणास मोठ्या शौर्यानें प्रतिकार करीत आहे असें दिसतें

पण आम्ही जपानच्या अगदीं चापात सापडलों आहों आमच्याजवळ शस्त्रें नाहींत आमची मालमत्ता आणि आमचा पैसा कोणत्याहि क्षणीं ते हिरावून घेऊ शकतील, आमचा अगदीं नाइलाजच झालेला आहे, तरीपण जपानच्या पुढें मान लवविण्यास अथवा जपानच्या हातचें हत्यार होण्यास आम्ही मुळींच तयार होणार नाहीं. हिंदी स्वातंत्र्याची चळवळ जर व्हावयाची असेल तर ती हिंदी लोकांनीं हिंदी लोकांसाठींच चालविली पाहिजे.

श्री आर—पेनँगमध्यें स्वराज्य इन्स्टिटयूट नावाची संस्था चालवीत आहेत तिच्या बाबतींत येत असलेल्या अडचणी त्यांनीं मला सांगितल्या. मलायाच्या सर्व भागांतून तरुण हिंदी लोक राष्ट्रीय कार्यांत सेवा करण्याचें शिक्षण घेण्यासाठीं त्या संस्थेंत येत आहेत तेथील सर्व शिक्षणाची मुख्य किल्ली देशाभिमान ही आहे श्री आर—सांगतात, किकान खात्याच्या अधिकाऱ्याना बरोबर घेऊन काहीं जपानी लष्करी अधिकारी एके रात्रीं स्वराज्य इन्स्टिटयूट मध्यें गेले तेथील तरुणाना त्यांनीं एकत्र जमविलें त्यातील चलाख तरुणाना त्यांनीं निवडून घेतलें आणि मोटार लॉऱ्यांत त्याना कोंबून त्यांनीं पळवून नेलें. या तरुणाचा पत्ता लावण्यासाठीं श्री. आर—जपानी अधिकाऱ्याकडे

एकसारखे हेलपाटे घालीत आहेत. कौन्सिल ऑफ अॅक्शननें जपानी सैन्याच्या या दुष्कृत्याबद्दल त्याचा निषेध केला आहे. प्रत्येक जपानी अधिकारी यासबधानें कानावर हात ठेवतो. असा प्रकार पुन्हा होणार नाहीं अशी जाहीर हमी मिळाली नाहीं तर व इन्स्टिटयूटमधील पळवून नेलेले तरुण परत करण्यात आले नाहींत तर स्वराज्य इन्स्टिटयूट अजिबात बद करण्याची धमकी श्री. आर—यानीं दिली आहे.

श्री. आर—याचे मित्र त्याना इषारा देतात, कीं तू जर जपानच्या विरुद्ध तुझे चालू असलेले 'उपद्याप' थाबवले नाहींस तर तुलाहि पळवून नेण्यात येईल. या इषाऱ्यास त्या शूरानें उत्तर दिलें, 'ते मला पकडू शकणार नाहींत; ते फार तर माझा वध करू शकतील. त्यानीं मला पकडण्याचा प्रयत्न करून पहावा.'

## १५ नोव्हेंबर, १९४२

स्वराज्य इन्स्टिटयूटसंबधींच्या या प्रकरणावर सर्व हिंदी जमातींत खळबळ माजलेली आहे. जपाननें आता कबुली दिली आहे, कीं त्या तरुणांना सैन्यानें पळवून नेऊन एका पाणबुडींतून हिंदुस्तानकडे पाठविलें. जपानी सैन्या-साठीं गुप्त हेराचें काम त्यानीं करावयाचें आहे.

ह्या दाडगाईच्या कृत्याचा श्री. आर—यानीं जाहीर निषेध केला आहे. श्री. आर—यानीं किकान खात्यास बजावलें आहे, कीं स्वराज्य इन्स्टिटयूट ही सस्था म्हणजे काहीं जपानसाठीं गुप्त हेर निर्मिण्याचा कारखाना नव्हे. कोणाहि हिंदी माणसाच्या इच्छेविरुद्ध त्याला जपानी सैन्यासाठीं काम करण्याची सक्ति करता येणार नाहीं. कौन्सिल ऑफ अॅक्शनच्या परवानगीशिवाय कोणाहि हिंदी माणसानें काहींहि कार्य करू नये असें श्री. आर—यानीं निक्षून सांगितलें आहे.

बँकॉक परिषदेच्या मागण्यांना जपानी सरकारकडून निःसदिग्ध उत्तर मिळालें पाहिजे असें श्री. एम—यानीं कळविलें आहे. जपानला हिंदुस्तानांत मुलूख मिळविण्याची महत्त्वाकांक्षा नाहीं असें मोघम आश्वासन देऊन भागणार

नाहीं. आम्हाला स्वतंत्र राष्ट्र म्हणून मान्यता मिळाली पाहिजे आणि हिंदुस्तानचें तात्पुरतें सरकार बनविण्यास आम्हाला परवाना मिळाला पाहिजे. किकान खात्याचा हस्तक्षेप अजिबात थांबला पाहिजे.

पी—सांगतो, आझाद हिंदफौजेला पूर्ण लष्करी शिक्षण देण्याच्या कामात आणि त्याना शस्त्रास्त्रांचा पुरवठा करण्यात जपानी अधिकारी अडथळे आणीत आहेत. कौन्सिल ऑफ ॲक्शनला आपले कार्य मोठें दुर्घट होत आहे.

## २९ नोव्हेंबर, १९४२

*जपान्यांनीं स्वराज्य इन्स्टिट्यूटमधून हिंदी तरुणांना पळवून नेले याचा* निषेध करण्यासाठीं श्री. आर—यांनीं स्वराज्य इन्स्टिट्यूट बरखास्त केली आहे. त्यामुळे जपानी अधिकारी त्रस्त झाले आहेत. श्री. आर—याना व त्याच्या कुटुंबाला रोज ज्या धमक्या येतात त्याच्यामागे कांहीं सत्य असेल तर कोणत्याहि दिवशीं श्री. आर—याचा खून झालेला आढळून येईल. पण श्री. आर—निर्भयपणें वागत आहेत. स्वराज्य इन्स्टिट्यूटचे दरवाजे त्यांनीं कायमचे बंद केले आहेत. जपानी म्हणतात कीं हा त्यांच्या बादशाहाचाच उपमर्द आहे श्री. आर—याना पेनँगमधील खुद्द त्याच्याच घरीं स्थानबद्ध करण्यात आले आहे असेंहि ऐकण्यात येतें. त्याना कोणी भेटूहि शकत नाहीं

दुसरा एक उपद्रव निर्माण होऊं लागला आहे. तो आझाद हिंद फौजे संबधीं आहे. सदर फौजेनें ब्रह्मदेशावर स्वारी करण्यासाठीं सज्ज रहावें अशी मागणी जपानी सेनाधिकाऱ्यांनीं केली आहे. यासंबधानें कौन्सिल ऑफ ॲक्शन दरवाजे बंद करून वाटाघाटी करीत आहे . ..

## ६ डिसेंबर, १९४२

- शोनान बंदरात एक जहाज आले असून तें ब्रह्मदेशाला ही फौज घेऊन जाणार आहे असें विश्वसनीय रीत्या कळतें. फौजेला जहाजावर पाठवा असा बिनतोड हुकूम जहाजाच्या कप्तानानं आझाद हिंद फौजेच्या अधिकाऱ्यास

पाठविला आहे; पण कौन्सिल ऑफ ॲक्शनची बैठक दीर्घकाल चालली आहे. रात्रंदिवस त्याच्या बैठका चालू आहेत.

कोणत्याहि क्षणीं काहीहि घडूं शकेल. कौन्सिल ऑफ ॲक्शन जर हट्ट धरून बसले तर जपानी काय करतील ? हा सर्व प्रश्नांपेक्षां अधिक श्रेष्ठ प्रश्न आहे. पी—चे मत असे कीं हिंदी लोकांचे वैर पत्करण्याचें धाडस जपानी करूं शकणार नाहींत......

*१० डिसेंबर, १९४२*

एकामागून एक घटना घडत आहेत. ता. ८ रोजीं जपान्यांनीं कर्नल *जी—ला अटक केली; पण त्याहून अधिक त्यांनीं अजून कांहींहि केलें नाहीं.* जपान्यांच्या मते कर्नल जी—हा ब्रिटिशांचा गुप्त हेर आहे. किती मूर्खपणाचें मत हें !

कौन्सिल ऑफ ॲक्शनने हिंदी सैनिकांना ब्रह्मदेशावरील स्वारींत पाठविण्याविरुद्ध आपला विरोध नोंदला असून ब्रह्मदेशाला एकहि सैनिक पाठविण्यासाठीं जहाजावर चढविण्याचें साफ नाकारलें आहे......

*१३ डिसेंबर, १९४२*

ब्रह्मदेशाला जाणारें सैनिकवाहू जहाज रिकामेंच गेलें. आय्. आय्. एल्. च्या पुढाऱ्यांनीं तडीस लावलेल्या आपल्या या हट्टामुळें चितगाव व ब्रह्मदेश यावरील मोठी चढाई करण्याचे जपानचे बेत फिसकटले आहेत असें मीं ऐकलें.

आम्ही चढाई करूं त्यापूर्वीं जपानकडून आम्हाला आश्वासक स्वरूपाची हमी मिळाली पाहिजे. अशी हमी न घेतां आम्ही चढाई करूं तर हिंदी स्वातंत्र्याच्या नाशाच्या हुकुमावर आम्हीं सही केल्यासारखें होईल. हिंदुस्तानातील हल्लींच्या पांढऱ्या मालकाऐवजीं पिवळे मालक तेथे आणणे ही आमची मागणी नव्हे. आम्हाला हिंदुस्तान स्वतंत्र आणि लोकशाहीप्रधान होईल अशी हमी हवी आहे.

कर्नल जी—ला जपान्यांनीं अटक केली आणि त्याबाबत आधीं कौन्सिल ऑफ ॲक्शनचा सल्लाहि घेतला नाहीं याबद्दल कौन्सिल ऑफ ॲक्शननें निषेध केला आहे. किकानच्या हस्तक्षेपाचा निषेध करण्याकरितां सगळ्या कौन्सिल ऑफ ॲक्शननें राजीनामा दिला आहे. आमचे अध्यक्ष श्री. रास बिहारी बोस हे टोकिओला जाण्यासाठीं सोईसवलती मिळवू पहात असून तेथील पेचप्रसंगा संबंधानें जनरल टोजोची मुलाखत ते घेणार आहेत. तें सर्व होईपर्यंत दरम्यान सर्व पूर्व आशियाभर लीगच्या सर्व शाखांनीं काम करीत रहावें अशी त्यांची सूचना आहे. टोकिओहून नवीन काहीं कळेपर्यंत हल्लींची परिस्थिति अधिक बिघडेल असें कोणतेंहि वर्तन जपानी अधिकाऱ्यांनीं करू नये अशी हमी त्यांनीं जपानी अधिकाऱ्यांकडून मिळविली आहे.

लीगच्या मलायन शाखेनें रासबिहारी बोस यांच्या वरील सूचनेस एका अटीवर मान्यता दिली आहे. 'स्वातंत्र्य चळवळीचें मामुली कार्य चालू रहावें पण जपानी सरकारकडून आश्वासक अशी हमी मिळेपर्यंत पुढील पाऊल टाकू नये' ही ती अट होय.

## २२ डिसेंबर, १९४२

अलीकडे जपानशीं असलेले आमचे संबंध सुधारले आहेत. आमच्या कारभारांत किकान खातें हस्तक्षेप करीत नाहीं. आणखी कोणा हिंदी लोकांना अटकहि झालेली नाहीं, पण कर्नल जी—कोठें आहे हें मात्र अजून सांगण्यांत येत नाहीं.

किकान खात्यानें आपला डाव थांबविला असाहि याचा अर्थ नाहीं. फक्त आपली कार्यपद्धति त्यांनीं बदलली आहे. आय्. आय्. एल्. संस्थेच्या प्रतिस्पर्धी अशी एक संघटना किकान उत्पन्न करीत आहे. किकानच्या गुप्त पाठिंब्यानें एक युवक चळवळ निर्माण करण्यांत येत आहे. तिच्या हालचाली संबंधानें अजून नक्की कांहीं समजत नाहीं. पण तींत काम करणाऱ्या हिंदी लोकांनीं दिलेल्या माहितीवरून पहातां ही अगदीं उघडउघड जपानच्या शिक्षणांतला संघटना आहे असें म्हणता येईल. जपानच्या लष्कराच्या अथवा किकानच्या

बाहुल्या असलेले लोकच या संघटनेचे कार्यकर्ते आहेत. पण एकंदर हिंदी जमातीवर या फॅसिस्ट संघटनेचा प्रभाव मुळींच पडणार नाहीं.

अजून श्री. आर—हे आपल्या घरीं स्थानबद्धच आहेत. पण अधिकाधिक मित्रांना त्यांना भेटू देण्यात येते. किकाननें अगदीं अलीकडे अवलंबिलेला एक उपाय म्हणजे श्री. आर—च्या राजीनाम्याची केलेली मागणी हा होय. मागून मग सर्व सुरळीत चालेल असें किकान सांगतें म्हणतें. आपल्या इभ्रतीच्या बचावासाठीं कोणाला तरी बळी देणें हा त्याचा हेतु आहे.

९ जानेवारी, १९४३

आर्—, एम्—, आणि आय्. आय्. एल्. चे इतर पुढारी यांची बदनामी करण्याची कामगिरी किकान सात्यानें उभारलेल्या युवक संघटनेनें चालविली आहे. वैयक्तिक शिवीगाळी करणें हेंच यांच्या कार्याचें स्वरूप असून त्यांच्या प्रचारातील प्रत्येक शब्द खोटा असतो. या युवक संघटनेच्या गेल्या सभेतील कांहीं घोषणापत्रकें स्वतः जपानी सैनिकांनीं जागोजाग चिकटविलीं होतीं.

हिंदुस्तानातून येणारी बातमी बरीच संकटसूचक आहे. माझे भारतभूमि ! आम्ही तुझ्या साहाय्यास धावून येण्यासाठीं उतावीळ झालों आहों. पण अविचारानें साहस करावें असें आम्हास वाटत नाहीं. तुझ्या शरीरावर होणाऱ्या प्रत्येक जखमेमुळें आमच्या शरीरातून रुधिरस्राव होतो, पण आमच्या अविचारानें तुझ्यावर भावि काळात आणखी संकटें कोसळावीं अशी आमची इच्छा नाहीं. आम्हा सर्वांना प्रिय असणारें तुझें मस्तक कोणाहि पिळगूक करणाऱ्यापुढें कधींहि नमूं नये यासंबंधानें आम्हाला खात्री करून घ्यावयाची आहे.

करांचीचा एक विद्यार्थी हेमू कल्याणी यास आज फाशीं देण्यांत आलें, कॅांग्रेस रेडिओनें ही बातमी दिली. त्याचा स्वदेशाभिमान हा साम्राज्यशाहीसाठीं गुन्हा ठरतो. केवढी भयंकर गोष्ट ही !

१३ फेब्रुवारी, १९४३

२९, माल्कम रोड या घरीं सध्यां खूप गर्दी आहे. हें आमचे मुख्य ठाणें. तेथें हालचालींनी एकसारखी गजबज सुरू आहे.

लीगच्या मलाया शाखेच्या कमिटीची बैठक गेले तीन दिवस चालू आहे. रास बिहारींना पाठविण्यासाठीं एक खलिता लीगनें तयार केला आहे. रास बिहारी येथून गेल्यानंतरच्या काळात लीगच्या कार्यांत काय काय अडचणी येत आहेत त्याचा तपशील त्यात दिला आहे. परिस्थिति लवकरच जर सुधारणार नसेल तर सर्व कमिटीनें राजीनामा द्यावा असेंहि ठरविण्यात आलें आहे.

अध्यक्षानीं आझाद हिंद फौजेची सुधारणा करून पुनर्घटना केली आहे. परिस्थिति आणीबाणीची आहे. फौज कौन्सिल ऑफ ॲक्शनच्याच हाताखालीं काम करील, कौन्सिलचेच हुकूम स्वीकारील, दुसरा कोणी केवढाहि मोठा असो, त्याचे हुकूम ऐकणार नाहीं.

१५ फेब्रुवारी, १९४३

या खलित्याची हकिगत जपानी अधिकाऱ्याना कळली असून श्री रास बिहारी बोस याना हा खलिता पोंचण्यापूर्वीं श्री आर—याने कांहीं झालें तरी राजीनामा दिलाच पाहिजे असा जपानी अधिकाऱ्याचा हट्ट आहे.

श्री के—चें मत असें आहे, कीं कौन्सिलचे पुढारी राजीनामे देऊन जपानी अधिकाऱ्याचे डाव यशस्वी करण्याला एक प्रकारे साहाय्यच करीत आहेत कौन्सिलच्या पुढाऱ्यानीं बराच विचार करून श्री के—ची भूमिका मान्य केली. कौन्सिलातील जबाबदारीच्या जागा सोडून देऊन किकानच्या हातातील खेळणें व्हावयाचें नाहीं असें त्यानीं ठरविलें आहे...

३ मार्च, १९४३

पुढील महिन्यात लीगच्या पूर्व आशियातील सर्व प्रतिनिधींची एक बैठक शोनान येथें भरावयाची आहे. जपान्यानीं श्री. रास बिहारी बोस यांनी मागितलेली हमी देण्याचें कबूल केलें नाहीं असें दिसते. तात्पुरत्या स्वरूपाचा

समेट त्यानीं मान्य केला आहे. श्री. सुभाषचंद्र बोस याना येथे येऊ देण्यात येईल आणि ते रास बिहारी बोस याच्या जागीं लीगचे अध्यक्ष म्हणून काम करतील.

तोंवर सद्य स्थिति आहे तशीच राहावयाची.

श्री. आर—याना हिंडण्याफिरण्याची मोकळीक मिळाली आहे. पण घरातच राहाणे हें ते अधिक पसत करतात. शिवाय ते आजारीहि आहेत. कांहीं तरी दुखण्यामुळें त्याजवर शस्त्रक्रिया आवश्यक झाली आहे असे मला सागण्यात आले.

*१० मार्च, १९४३*

मलाया शाखेविरुद्ध किकान खात्यानें एक डाव जिंकला. श्री. आर—यानीं राजीनामा दिला तरच आमची इभ्रत कायम राहील असा हट्ट त्यानीं धरला. तेव्हा या दडपणापुढे मान लवबून श्री. रास बिहारी बोस यानीं श्री. आर—याचा राजीनामा मागितला. आणि श्री. आर—यानीं राजीनामा दिला आहे. आता श्री. आर—च्या जागीं कोण येणार ? जपानच्या कोणातरी बाहुल्यास आम्ही मलाया शाखेचा अध्यक्षच होऊ देणार नाहीं.

श्री. आर्—च्या राजीनाम्याने आम्हापैकीं अनेकाचे डोळे उघडले. केवढा उत्कृष्ट मनुष्य ! मलायातील विचारी हिंदी लोकाच्या दृष्टीने तो फार मोठा मनुष्य होता. त्याने एक तोंडी सदेश पाठविला आहे. "आमची सस्कृति ही नुसती वरवरची नव्हती. आमचें वडिलार्जित संस्कृति धन ओबडधोबड नाहीं. गुलामाप्रमाणे पळपुटेपणा स्वीकारून अथवा नरभक्षक रानम्याप्रमाणें क्रूरपणा करून आम्हाला स्वातत्र्य मिळणार नाहीं. क्षुद्रपणा व स्वार्थ ह्यापासून आम्ही दूर असले पाहिजे. कोणत्याहि राष्ट्राच्या पायीं आम्ही लोटांगण घालणार नाहीं. आमच्या मार्गात आम्ही कोणासही तुडवणार नाहीं. आमच्या धर्मास आम्ही चिकटून राहू. हिंदुस्तान स्वतत्र करण्याचा आमचा हाच मार्ग आहे. मी नेहमीं माझ्या निश्चित मताप्रमाणे वागलों आहे. माझ्या वैयत्तिक स्वार्थासाठीं मीं काहींहि केले नाहीं. आम्हाला स्वातत्र्य हवें आहे. आम्ही आणखी आत्मयश करू व अजूनही स्वातन्त्र्य मिळवू. माझी ही श्रद्धा आहे. आणि निष्क्रियता मजवर

आतां सर्वांनीं लढ्यांत आली तरी त्याच श्रद्धेनें मी धीर धरीन. अखेर आम्हाला विजय मिळणारच व तो मिळालाच पाहिजे.

९ एप्रिल, १९४३

मी बँकॉकला परत आलें आहें. बँकॉक रेडिओवरून हिंदी लोकांसाठीं जी आकाशवाणी होते तिच्या कारभारात लक्ष घालणें आणि सुधारणा सुचविणें हें काम मजकडे देण्यात आलें आहे. प्रत्येक आघाडी आपल्या धोरणास अनुकूल अशा प्रकारे चालली पाहिजे अशी व्यवस्था लीग करीत आहे.

म्हणून मी बँकॉकला आलें. आतापर्यंत येथील आकाशवाणींतून झालेल्या घोषणांचे तर्जुमे मी तपासीत आहें.

दिल्लीचा ऑल इंडिया रेडिओ आम्हाला शत्रु म्हणून उल्लेखून आमच्यावर शिव्या ओकीत आहे. पण ज्या विषयीं आम्हाला शरम वाटावी असा एकही शब्द आम्हीं उच्चारला नाहीं अथवा कृत्य केलें नाहीं. आम्हीं प्रामाणिक देशभक्त आहों. आमच्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं सटपट करीत आहों असें आमचें म्हणणें आहे. दिल्लीमधून होणारी आकाशवाणी आणि बँकॉककडून होणारी आकाशवाणी या दोहोंची तुलना करून कोणाहि आंतरराष्ट्रीय न्यायासनानें कोणात देशभक्ति आहे याचा निर्णय द्यावा. उत्तर काय मिळेल यासबधानें मला मुळींच शंका नाहीं.

जालियनवाला बाग प्रकरणासबधानें १३ तारखेस आम्ही एक कार्यक्रम करणार आहोंत. नाटकें, गीतें व भाषणें त्यासाठीं मुद्दाम तयार केलीं आहेत.

. . .

१८ एप्रिल, १९४३

मलायातील आमचें मुख्य ठाणें—१९ चॅन्सरी लेन, येथें सर्व हिंदी लोकांची एक पूर्व आशिया परिषद भरविण्यात आली. दोन महिन्यांत सुभाषबाबू युरोपातून येथें येणार असें जाहीर करण्यात आलें.

स्वातंत्र्याची सर्व चळवळ आतां युद्धभूमिकेवर घेण्यांत आली आहे. पैसा व साहित्य जमविण्यासाठीं मोहीम काढण्याचें ठरविण्यात आलें आहे.

सर्व साधनें एकत्रित करून बजेट आखावें व त्याप्रमाणें कामें ठरवावीं असें ठरलें आहे.

सर्व शाखा व उपशाखा यांची संघटना करण्यांत आली असून त्यांना कार्यतत्पर करण्यांत आलें आहे.

मिस सी—आणि मि. पी—आज चहाला आले. बराच वेळ आमच्या गप्पा झाल्या. मिस सी—ही दिसण्यांत अगदींच सौम्य दिसते; पण रंगूनमधील आपले अनुभव जेव्हा तिनें मला सांगितले तेव्हां तिच्या अंतःकरणांत पेटलेल्या अग्नीची धग मला अनुभवास आली. रंगूनच्या एका व्यापारी कचेरींत तिचा बाप हेडक्लार्क होता. रंगूनवर झालेल्या पहिल्या बाँबहल्ल्यांत तो ठार झाला. मि. पी—हा बॅरिस्टर आहे. रंगून हायकोर्टांत तो वकिली करीत असे.

त्यांनीं सांगितलेली कथा मी जमवून येथें पुन्हा नोंदून ठेवतें.

मिस सी—म्हणाली,

"जपान्यांनीं रंगूनवर जेव्हा पहिल्यानें बाँब टाकले तेव्हा मार घेण्यासारखीं बचावघरें आम्हाला तेथें मुळींच नव्हतीं. ब्रिटिश गव्हर्नरानें तीस हजार रुपयाएवढा अफाट खर्च करून एक बचावघर स्वतःसाठीं तयार केलें होतें; पण सामान्य जनतेला आपली तरतूद स्वतःच करावी लागली. जपानी आले ते अकस्मात व अनपेक्षित असे आले. सरकारी माहितीप्रमाणें एक हजार माणसें जपानच्या त्या बाँबहल्ल्यांत ठार झालीं. पण आम्हाला माहीत आहे, कीं त्या दिवशीं दहा हजार लोकांना तरी तें अनैसर्गिक मरण प्राप्त झालें असावें.

"जणूं काहीं धरणीकंप व्हावा त्याप्रमाणें रंगून त्या बाँबहल्ल्यानें हादरलें. इमारती जमीनदोस्त झाल्या. रस्त्यांना प्रचंड खड्डे पडले. फुटक्या काचा रस्तोरस्तीं पसरल्या. मोठमोठीं झाडें व तारांचे खांब रस्त्यांवर आडवे पडले. विजेच्या तारा, माणसांचीं शरीरें, मोडतोड झालेल्या गाड्या व रिक्शा यां सर्वांचा समावेश निरनिराळ्या ढिगाऱ्यांत एकत्रच झालेला होता. पाण्याचे नळ फुटले. जो तो रंगून सोडून पळून जाऊं लागला. पळून जाणाऱ्या माणसांनीं

आगगाड्या आणि रस्ते तुंबून गेले, गोद्यातील गोदीकामगार पळून गेले. कोठेही नोकर म्हणून उरला नाहीं. माझा पुरुष-नोकरही पळून गेला. ट्रॅम व बस चालविण्यास माणसेंच नव्हतीं. जपानच्या वैमानिक हल्ल्याचा विषय झालेल्या या शहरास सोडून प्रत्येकजण उत्तरेकडे धावत सुटला होता. मिंग्यालोडॉन वैमानिक तळावर बॉंबहल्ल्याचा भडिमार झाला. तेथे एकहि इमारत उभी अशी शिल्लक राहिली नाहीं. वैमानिक हल्ल्याचा वाजणारा भोंगाहि उध्वस्त झाला.

"दिवसानुदिवस रस्त्यातील परिस्थिति बिघडू लागली. एका आठवड्यात रस्तोरस्तीं माजलेल्या गदळाच्या टेकड्या बनल्या. मोठ्या रस्त्यावर बॉंबहल्ल्यामुळे मरून पडलेल्या माणसांना तीन तीन दिवस कोणी हातहि लावला नाहीं. नाताळच्या दिवशीं जपान्यांचा दुसरा बॉंबहल्ला आला. त्यापूर्वी त्यांनीं हस्तपत्रकें टाकलीं होतीं. आशियाटिकांनीं शहर सोडावे असे त्यात त्यांनी कळविलें होतें. तीन चतुर्थांश लोकसंख्या पळून गेली होती. जणूं ईश्वराचा, शाप झालेला असावा असें रंगून निर्मनुष्य झाले होते.

"मुलकी सरकार खलास झाले. सिव्हिल सर्व्हिसचे परमेश्वर गारठले. रात्रीं लूट आणि चोऱ्या होत. पण पोलिसांचा काहीहि इलाज चालत नसे. रंगून गॅझेटमध्ये एक दिवस पुढील मथळा आला:—'येथील नोकरशाही पळून गेली म्हणजे मग आमचे उत्कृष्ट युद्धगुण प्रगट होतील.' मि. स्टोन नामक एका ब्रिटिश माणसाचे ते शब्द होते. या लेखाबद्दल त्याला सक्तीच्या रजेवर जावें लागलें.

"ब्रह्मदेशाला पिछाडीचा बचावाचा समुद्र म्हणतात, परंतु तेथें सरकारी व लष्करी वरिष्ठांनीं अज्ञान व उद्धटपणा असलेल्या अधिकाऱ्यांचा केवढा घाण गळाठा जमविला होता याची कल्पना जे त्यावेळीं रंगूनमध्ये होते त्यानाच येऊं शकेल."

मि. पी.—म्हणाला,

"रंगूनच्या दरवाजाशीं ज्यावेळीं जपानी प्रत्यक्ष आले त्यावेळीं म्युनिसिपालिटीचे झाडूवाले व इतर नोकर आणि फायर ब्रिगेडचे लोक यानींहि पोबारा केला असल्याचें आढळून आलें. तुरुंग, महारोग्याचे आश्रम आणि



*"भाई हो, भारतमातेचें स्वातंत्र्य हें एकच आमचें ध्येय, दिल्लीचा प्राचीन लाल किल्ला हा आमच्या प्रवासाचा शेवट आमचें हें तात्पुरतें सरकार व आमची फौज हे हिंदी राष्ट्राचेच सेवक आहेत"*

—फौजेच्या ध्येयासंबंधीं सुभाषबाबूंचें भाषण
(२५ ऑक्टोबर १९४५)

वेड्याचे आश्रम याचे दरवाजे खुले करण्यांत आले असून त्यातील भयंकर माणसें रस्तोरस्तीं मोकळीं सोडण्यात आलीं होतीं. ब्रिटिश सिव्हिल सर्व्हिसमधील परमेश्वराचेंच हें कर्तृत्व होतें. रंगून जागोजाग आगीनें धडाडत होतें, पण या आगी लावल्या कोणीं हे कोणासच माहीत नव्हतें. बऱ्याचशा आगी गुन्हेगारानीं लावल्या असाव्यात. घरातून पळून गेलेल्या नागरिकाचीं घरें लुटावीं आणि चोरीचा मागमूस राहू देऊं नये, म्हणून या आगी लावण्यात आल्या होत्या.

" तुरुंगातील वेडे आणि गुन्हेगार याना सरकारनें जनतेवर का मोकळे सोडलें याचा काहींच खुलासा करता येत नाहीं; पण सर्व ब्रह्मदेशात ब्रिटिशानीं जे वर्तन केलें त्याचाच हा एक नमुना होता. आपली कातडी बचावावी मग काहींहि होवो असा त्याचा विचार होता.

" आणि या गुन्हेगाराऱ्याकडून आम्हास किती तरी त्रास झाला. मी त्या दिवसापासून ब्रिटिशाचा शत्रु बनलों. ब्रिटिशाशी स्वामिनिष्ठ राहाणें म्हणजे स्वामिनिष्ठा अस्थानीं ठेवण्यासारखें आहे हें माझ्या लक्षात आलें. कसलीहि गुलामगिरी परवडेल पण ब्रिटिश अमलातील गुलामगिरी नको हे मला कळून आले. आम्ही त्याची सेवा केली, त्याच्या बाजूला राहिलों, त्यांच्यासाठीं आमचें रक्त साडले आणि असें सर्व झाल्यानतरहि ब्रिटिशानीं अखेरीस आम्हाला गुन्हेगाराच्या व वेड्याच्या हवालीं केलें.

" ८ तारखेस जपानी येण्यापूर्वी भयंकर स्फोट करून गाव जाळून पोळून काढण्यात आलें. ७ तारखेच्या दुपारीं ३ वा. सिरियन आणि डनिर्डो यातील तेल शुद्ध करण्याच्या टाक्या पेटविण्यात आल्या. दुसरीं काहीं गुदामेंहि जाळून टाकण्यात आलीं. त्याचा दाट धूर पसरल्यानें रस्त्यात व घरात भर दिवसा अंधार पसरला. दिवे बंद झाले. जळणाऱ्या आगींचा प्रकाश हाच उजेड देत होता. पुढील आठवड्यातील बहुतेक दिवस या आगी पेटलेल्या होत्या.

" मर्चेंट स्ट्रीटवरील आमच्या घराकडे आम्ही चाललों असता गळाठ्याऱ्या ढिगाऱ्यावर नागवे बसलेले वेडे लोक गळाठा उकरून खात असलेले आम्हीं पाहिले. ७ तारखेस सूर्यास्तापूर्वी रगूनमधील शेवटचा ब्रिटिश माणूस मेजर मेन्स हाहि पळून गेला.

" ८ तारखेच्या दिवशीं सकाळीं बाव आणि डामफू या खेड्यातून जपानी रंगूनला आले. ते आम्हाला सरक्षक देवदूतच वाटले. त्यानींच गावात व्यवस्था निर्माण केली. हळूहळू लोकप्रवाह परत येऊ लागला. गुन्हेगाराना आवरण्यात आले व परत तुरुगात टाकण्यात आलें......"

मिस सी—व मि. पी—यानीं बरीच संध्याकाळ होऊन गेल्यावर आमचा निरोप घेतला. त्याच्या तोंडून मीं जे अनुभव ऐकले त्यानीं त्याचे चेहिरे होरपळून निघालेले मला दिसले. त्याचे पूर्वीचें स्वरूप त्याना पुन्हा कधींहि परत येणार नाहीं. मृत्यु आणि मृत्यूपेक्षाहि भयकर अशी दहशत,—मृत्यूची भीति त्याच्यासमोर कित्येक दिवस उभी होती. त्याची स्मृतिभूमि कित्येक मैल पर्यंत या दु:खाच्या फाळानें फाटून गेली आहे.

१९ मे, १९४३

मि. एस्—काल रात्रीं आमच्याबरोबर जेवणास होता. मडालेचा तो एक लाकूडव्यापारी आहे. त्याची बायको ब्रह्मी असून त्याला बरींच मुले आहेत. पळून जाणाऱ्या ब्रिटिश सैन्यासबधानें आणि या महिन्याच्या पहिल्या तारखेस मडाले जिंकणाऱ्या जपान्यासबधानें त्यानें आम्हाला पुष्कळ हकिगती सागितल्या.

मडालेच्या तुरुगातून गेल्या मार्चच्या शेवटीं बा मॉ पळून गेला. या बाबतींत त्याचा कांहीं हात असावा असा मि. एस्—वर ब्रिटिशाचा सशय होता.

बा मॉ ची कथा ही ब्रह्मदेशात एक अद्भुत घटना झाली आहे.

ब्रह्मदेशाचा माजी पतप्रधान बा मॉ याला युद्ध चालू असता तुरुगात टाकण्यात आलें. जपान्याशीं वाटाघाटी करीत असल्याचा सशय त्याजबद्दल घेण्यात आला होता. यू सॉ त्यावेळीं पतप्रधान होता. बा मॉ साठीं यू सॉनें कांहींहि केलें नाहीं. कारण ते दोघेहि एकमेकाचे राजकीय प्रतिस्पर्धी आहेत.

नतर लौकरच यू सॉ-वरहि गडातर आले. तो अमेरिकेंतून ब्रह्मदेशास परत येत असता, जपानशीं वाटाघाटी करीत असल्याच्याच सशयावरून ब्रिटिशानीं त्यालाहि अडकवून टाकलें. ब्रह्मदेशाला तावडतोब पूर्ण डोमिनियन

स्टेटस मागण्यासाठीं तो इंग्लंडला गेला होता. ब्रिटिशानीं नकार दिला. नंतर तो अमेरिकेस गेला. ब्रिटिशाचा नकार त्यानें प्रसिद्ध केला आणि मग त्यास अटक झाली.

मार्चच्या अखेरीस ‘ एक वड्या दर्जाचा दूत ’ मामिओमधून आला. मामिओमध्ये ब्रह्मदेशाचा गव्हर्नर आश्रय घेऊन राहिला होता त्याच्याकडून हा दूत आला होता. हा दूत मंडालेच्या तुरुंगात गेला. बा मॉ-बरोबर तो पुष्कळ वेळ तुरुंगात होता. बा मॉ-ला विनशर्त सोडण्यास ब्रिटिशाची तयारी होती. ब्रह्मदेश ब्रिटिशाना राजनिष्ठ राहावा यासाठीं ब्रिटिशाशीं सहकार्य करण्याची तयारी बा मॉ-ने दाखवावी अशी त्याजवर अट होती. बा मॉ-नें मुक्त होताच ब्रिटिशानी ब्रह्मदेशाला प्रत्यक्ष व्यवहारात पूर्ण स्वायत्तता दिली आहे, ब्रह्मदेशाला सारभूत व व्यावहारिक स्वातंत्र्य मिळाले आहे असें त्यानें जाहीर करावे अशी हमी बा मॉ कडून मागण्यात आली होती.

पण बा मॉ-चे बेत वेगळेच होते असे उघड दिसते. त्याने थापा मारल्या. अनेक अडचणी माडल्या. तेव्हा तो दूत मामिओला गव्हर्नरकडे पुढील सल्ला विचारण्यासाठी गेला. गव्हर्नरनें बा मॉ-च्या अटी झिडकारल्या. बा मॉ ला तुरुंगात सुरक्षित व पूर्ण बदोबस्तात ठेवता यावें यासाठीं त्याला हिंदी तुरुंगात पाठविण्याचें ठरले. तो दूत बा मॉ-कडे परत जो आला तो सशस्त्र पहारेकरी घेऊन बा मॉ-ला घेऊन जाण्यासाठीं आला. पण तुरुंगात बा मॉ कोठेच सापडेना. तो पळून गेला होता. तो कसा आणि केव्हा पळून गेला हे कोणासच माहीत नव्हते.

सुभाषबाबूंच्या घरीं दारावर गुप्त पोलिसांचा पहारा असताहि कलकत्त्यांतून सुभाषबाबू निसटले; त्याहिपेक्षा अधिक अवघड परिस्थितीतून बंदी पळून गेल्याचें हे उदाहरण घडलें.

बा मॉ-ला आध्यात्मिक शक्ति प्राप्त झाली असून तिच्या बळावर तुरुंगातून तो अदृश्य झाला अशासंबंधींच्या कथा सर्व ब्रह्मदेशभर पसरल्या. तुरुगाचे सर्व दरवाजे, खिडक्या, गज, सर्व जसेच्या तसेच होते आणि तरीहि पक्षी पळून गेला होता. विविध प्रकारच्या अफवा चोहोकडे पसरल्या. जो तो आपापल्या परी

जुन्या अफवात भर घालीत होता अथवा दुरुस्त्या सुचवीत होता. ब्रिटिशाची अब्रु साफ खलास झाली. मि. एस्—च्या मतें, घडला असावा तो प्रकार असा— त्या दिवशीं अगदीं सकाळीं इरावती नदींतून मंडालेच्या किनाऱ्याला कांहीं जलविमानें लागलीं. तीं लोकांनीं पाहिलीं, पण सर्व चूपचाप राहिले. केशरी पोषाख केलेले कांहीं ब्रह्मी धर्मगुरु त्या जलविमानाजवळ गेले व त्यावर चढले. त्या जलविमानानीं इंजिनें चालू केलीं व आकाशात उड्डाण केलें. इकडे मंडालेच्या तुरुगात अधिकाऱ्यांनीं सकाळची गणती केली त्यावेळीं एक माणूस कमी आला होता.

आता हें सर्वांना कळून चुकलेले आहे, कीं ब्रिटिशाचीं जलविमानें पूर्व आशियात नाहींतच. जपानचीं मात्र आहेत. यावरून निघणारें अनुमान अगदीं उघड होतें. बा मॉ नें घातलेली स्वातन्त्र्याची शर्त ब्रिटिशानीं नाकारली पण जपाननें मान्य केली. तेव्हा ब्रिटिश सैन्याच्या एका छावणीच्या मध्यांतून जपान्यांनीं बा मॉ। ला अलगद उचलून सुरक्षित जागी नेले.

ब्रिटिश म्हणतात, कीं बा मॉ हा जपानचा हस्तक आहे. ब्रह्मीलोक म्हणतात, ब्रिटिशाना बा मॉ ला आपला हस्तक बनविता आले नाहीं यात त्याची अब्रु गेली आहे.

सुभाषबाबू युरोपातून निघाले अथवा इतक्यात निघणार असून टोकिओला लवकरच पोचतील अशी बातमी आम्हाला कळली आहे. प्रत्येकाला उत्साहाचे भरतें आलें असून आमची आशा खूप वाढली आहे.

मी रोज सकाळीं प्रार्थना करतें, त्यात सुभाषबाबूंचें नाव मीं आता घातलें आहे. ईश्वरा, त्यानीं पत्करलेल्या त्याच्या आयुष्यातील सर्वश्रेष्ठ अशा या कार्यात त्याना यश दे !

३ जून, १९४३

श्री. रास बिहारी बोस चार दिवसापूर्वीं टोकिओला जाण्यासाठीं निघाले. सुभाषबाबू येताच त्याना ते भेटणार आहेत.

# आणि आतां पेटलेली शेगडी

मलाया-सयाम सरहद्दीपर्यंतच्या लांबच्या दौऱ्यावरून पी—परत आला आहे. तामीळ मजूर जेथें काम करतात त्या प्रचंड रबराच्या मळ्याना त्यानें भेट दिली. त्यानें रबराच्या जंगलाचें केलेले वर्णन आश्चर्यानें थक्क करून टाकणारें आहे. मजुराना अतिशय वाईट रीतीनें वागविण्यात येते. कामगाराची संघटना करण्यास परवानगी मुळींच नाहीं. ते व्यवस्थापकाचे सर्वस्वी गुलाम आहेत आणि अगदींच मागासलेल्या अवस्थेंत रहातात.

पी—ने ज्यावेळीं लीगचा संदेश त्याना सांगितला त्या वेळीं ते पी—च्या भोंवतीं जमा झाले आणि त्यांनीं त्याला आपला पुढारी बनविले. आपल्या मातृभूमीसाठीं दरिद्री, अडाणी असा तामीळ कामगार सर्वस्वाचा यज्ञ करण्याला तयार होतो हें खरोखर मोठें आश्चर्य नव्हे काय? जेथें जेथें एखादा हिंदी माणूस कष्ट करतो आहे तेथें तेथें हिंदुस्तान आहे. पी—सांगतो, रबराच्या मळ्यातील अगदीं अंतर्भागात जा; तेथेंहि तुला ल्हानसा हिंदुस्तान दिसेल. तेथें महाभारत आणि रामायण सांगितले जातें. आपल्या पूजेच्या देवात त्यांनीं गांधींचे नांवहि घातले आहे.

पी—म्हणतो,. मलायातील रबराच्या मळ्याहून मनाला अधिक खंत आणणाऱ्या वातावरणाचा अनुभव कोठेंच येत नाहीं. दोन्ही बाजूंनीं सारख्या आकाराच्या अशा रबराच्या झाडाच्या रांगाच्या रांगा तेथें लागलेल्या असून त्याचीं पानें इतकीं घनदाट पसरलेलीं असतात, कीं त्यातून सूर्यप्रकाशहि येऊं शकत नाहीं.

पावसाच्या दिवसांत असणाऱ्या दलदलीचा भयंकरपणा कल्पनातीत आहे. 'अत्तप' झाडाच्या पानांचीं छपरें व भिंती ज्याच्या केलेल्या आहेत अशा झोंपड्यांतून लोक रहातात. जमीन बाहेरच्या दल्दलीपासून सहा फूट उचीवर आणलेली असते. खांबावर या झोंपड्या उभ्या असतात.

पी—म्हणतो, आमची सभा चालू असता वळवाचा गडगडाट व पाऊस चालू झाला, विजा कडाडून मुसळधार पाऊस पडला, पण समास्थान कोणींहि सोडलें नाहीं. पंधरा मिनिटानंतर त्या वळवाच्या पावसातलें थेंबथेंब पाणी खालीं झिरपूं लागलें. प्रचंड वळवाच्या पावसामधून एवढें थोडेंसें पाणीच

फक्त त्या झाडाच्या पानाच्या आच्छादनातून एवढ्या वेळात खालीं आलें. पण एकदा ही टपटप सुरू झाल्यानतर मग ती अखड चालू राहिली. पी—म्हणतो, मी चिडलों, पण मजुराना त्याचें काहींच वाटलें नाहीं.

त्या मुलुखात रक्त शोषणाऱ्या जळवा सर्वत्र आहेत. प्रचड हत्तीहि तेथे आहेत. मासे, झाडावरून चिखलाच्या काठावर उड्या मारतात. तेथें ते शेपटीवर उभे राहून माणसें शेजारून जाताना त्याच्याकडे वळून पाहातात. तेथें माकडेहि आहेत. पक्षी आणि वन्यफुलें तेथे फारच सुदर आहेत. वैपुल्यानें भरलेल्या उष्ण प्रदेशातील जगलाचें रानवट सौंदर्य तेथें खूप पसरलें आहे. पण हा सर्व आनद थोडा वेळचा असतो. दीर्घ कालानें जगल नको नकोसे वाटतें. त्यात जीव गुदमरतो. आपला कोणी कोंडमारा करीत आहे असे वाटू लागतें.

याच जगलामधून गरीब मजुराचा पोषाख करून जपानी प्रथम मलायात शिरले. जगली टोळ्यानीं त्याना वाटा दाखविल्या.

पी—ला बारीक ताप येत आहे. हा ताप मलेरियाचा आहे कीं जगलातील दुसरा एखादा प्रकार आहे हे ठरविण्यासाठीं मला डॉक्टराकडून त्याच्या रक्ताची तपासणी केली पाहिजे. पी—च्या मतानें मलेरिया हाच येथला मोठा शाप असून इतर कशाहिपेक्षा मलेरियानेंच अधिक माणसें येथें मरतात.

# स्वातंत्र्याची सुप्रभात

२० जून, १९४३

आनंदीआनद! सुभाषबाबू टोकिओला पोचले. ते एका पाणबुडींतून आले. त्याच्याबरोबर मि. हसन नावाचा एक मुसलमान तरुण होता. टोकिओमध्यें सुभाषबाबूंचें मोठें स्वागत झालें. हें स्वागत हिंदुस्तानाबाहेरील सर्व हिंदी लोकाच्या पुढाऱ्याला साजेसें होतें. ब्रिटिश साम्राज्यशाहीला अनेकवार आव्हान देणाऱ्या थोर क्रातिकारक पुढाऱ्यास साजेसेंच होतें. आजवर काय काय घडलें याची त्याना माहिती करून देण्यासाठीं आमच्यातील काहीं पुढारी टोकिओला गेले आहेत.

## स्वातंत्र्याची सुप्रभात

वृत्तपत्रांसाठीं सुभाषबाबूंनीं पुढीलप्रमाणें अतिशय महत्त्वाचें विधान केलें आहे:—

" गेल्या महायुद्धात ब्रिटिश मुत्सद्यानीं आपल्या शक्तीचा बागुलबुवा आमच्यापुढे उभा करून आमच्या पुढाऱ्याना ठकविलें. म्हणून यापुढे आम्ही कधींहि फसले जाणार नाहीं अशी शपथ वीस वर्षांपूर्वीं आम्हीं घेतली.

" माझ्या पिढीने वीस वर्षांहून अधिक काळ ज्या घडीची वाट उत्सुकतेनें पाहिली ती घडी आज आली आहे. हिंदी जनतेच्या स्वातंत्र्याची ही सुप्रभात होय.

" आम्हाला आता पूर्णपणे कळत आहे, कीं अशी संधि आणखी शंभर वर्षे येणार नाहीं, म्हणून तिचा जास्तीत जास्त उपयोग आम्ही करून घेणार आहों.

" ब्रिटिश साम्राज्यसत्तेचा आमच्यावर झालेला परिणाम म्हणजे आमचा नैतिक अधःपात, सांस्कृतिक नाश, आर्थिक दारिद्र्य आणि राजकीय गुलामगिरी ......हाच होय.

" आमच्या रक्ताची किंमत देऊनहि स्वातंत्र्य संपादन करणें हें आतां आमचें कर्तव्य आहे. यापुढे आम्ही आमच्या स्वार्थत्यागानें आणि परिश्रमानें जें स्वातंत्र्य जिंकून घेऊ तें सांभाळण्याची ताकदहि आमच्या ठिकाणीं आलेली असेल.

" ज्या शत्रूनें तरवार उपसली आहे त्या शत्रूला तरवारीनेंच तोंड दिलें पाहिजे. नि शस्त्र प्रतिकारातून सशस्त्र लढाच उत्पन्न झाला पाहिजे. ज्या वेळीं हिंदी लोकांवर या अग्निदिव्याचे संस्कार फार मोठ्या प्रमाणावर होतील त्या वेळींच स्वातंत्र्य मिळविण्याची पात्रता......त्यांच्या अंगीं येईल."

### २१ जून, १९४३

आज टोकिओमधून सुभाषबाबूंनीं आकाशवाणीवर भाषण केलें तें आम्हीं ऐकले. मी त्यांच्या भाषणातील काहीं महत्त्वाचे परिच्छेद नमूद केले आहेत. मी स्त्रियांत काम करीत असताना त्या परिच्छेदांचा मला उपयोग होईल.

कोणचीहि परिस्थिति अगदीं साध्या व परिणामकारक शब्दात मांडण्याची कला त्याना अवगत आहे.

" हिंदुस्तानच्या दृष्टीनें पाहता हिंदुस्तानच्या शेजारच्या मुलखात असलेली परिस्थिति हीच आमच्या विशेष जिव्हाळ्याची आहे. ब्रिटिशांच्या हिंदुस्तानातील उभ्या इतिहासात एकाहि ब्रिटिश सेनापतीच्या डोक्यात, हिंदुस्तानच्या पूर्व सरहद्दीवरून हिंदुस्तानवर परचक्र येईल, ही कल्पना कधीं आली नाहीं. म्हणून हिंदुस्तानच्या वायव्य सरहद्दीवरच सर्व ब्रिटिश रणनीतिज्ञ आपलें चित्त लावून बसलेले असत.

" सिंगापूरचा आरमारी दुर्ग आपल्या हातीं असल्यामुळें हिंदुस्तान आपल्या ताब्यात सुरक्षित राहू शकेल असें आमच्या राज्यकर्त्यांना नेहमीं वाटे. ज्यावेळीं सेनापति यामाशिटा आणि इडा यानीं जोरदार चढाई केली त्यावेळीं ब्रिटिश रणनीतीच्या भिकारपणासंबधानें साऱ्या जगाचे डोळे उघडले...

" त्या वेळेपासून जनरल वेव्हेल हिंदुस्तानच्या पूर्व सरहद्दीवर तटबंदी करण्याचा निकराचा प्रयत्न करीत आहेत. पण हिंदी लोक स्वत:शीं ज्या प्रश्नाचा विचार करीत आहेत तो असा :—सिंगापूर बांधण्याला याना वीस वर्षे लागलीं आणि गमविण्याला फक्त आठवडा लागला. तर आता पूर्व सरहद्दीवर बांधल्या जाणाऱ्या तटबंदीपासून माघार घेण्याला हर्लीच्या सेनापतीला व त्याच्या मागून येणाऱ्या सेनापतींना किती काळ लागेल ?

" ट्यूनिस, टिंबक्टू, अथवा लँपेडुसा अथवा अलास्का येथें काय घडत आहे ही बाब हिंदी लोकाना महत्त्वाची नसून हिंदुस्तानात आणि हिंदुस्तानच्या सरहद्दीपलीकडे काय घडत आहे ही बाब आम्हा हिंदी लोकाच्या दृष्टीनें महत्त्वाची आहे.

" सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी, कीं ब्रह्मदेश पुन्हा जिंकून घेण्यासंबधानें जी खूपशी जाहिरातबाजी झाली तिचा फज्जा उडाला असून निर्लज्जपणानें ब्रिटिश सैन्यानें माघार घेतली आहे.

" सिंगापूरचा पाडाव व ब्रह्मदेश गमावणें या दोन गोष्टी ब्रिटिशांच्या लष्करी इतिहासात फार मोठे अनर्थ होत. पण त्यामुळें ब्रिटिशांच्या वृत्तींत

लक्षात येण्यासारखा फरक झालेला दिसत नाहीं. ब्रिटिश साम्राज्यवाद्यांचा आडमुठेपणा अजून कायमच आहे. जुनीं माणसें गेलीं व नवीं आलीं तरी, आणि जुनीं साम्राज्यें जाऊन नवीं आलीं तरी ब्रिटिश साम्राज्यशाही कायमच रहाणार— असा जणूं काहीं आमच्या राज्यकर्त्यांचा समज आहे.......

"याला तुम्ही मुत्सद्दीगिरीचा अभाव म्हणा, राजकीय दिवाळखोरी म्हणा अथवा वेडपटपणा म्हणा, या वेडपटपणामागेंहि विशिष्ट कारणपरंपरा आहे.

"ब्रिटिश साम्राज्य हें हिंदुस्तानातूनच वाढले आहे. ब्रिटनमधील निरनिराळे लोक कोणत्याहि पक्षाचे असोत. हिंदुस्तानातील साधनसंपत्तीची लूट पुरेपूर केली पाहिजे ही गोष्ट सर्वांनाच सारखीच माहिती आहे. त्यांच्या दृष्टीनें साम्राज्य म्हणजे हिंदुस्तान. हे साम्राज्य टिकविण्यासाठीं वेडेपिसे होऊन ते लढत आहेत. म्हणून या युद्धात अखेर ब्रिटनचें काहींहि होवो, आपले साम्राज्य टिकविण्यासाठीं—म्हणजे हिंदुस्तानवरील आपला अंमल टिकविण्यासाठीं इंग्रज माणूस अखेरपर्यंत प्रयत्नाची शिकस्तच करील.

"म्हणून प्राजळपणे बोलावयाचें तर मी असें म्हणेन कीं ब्रिटिश मुत्सद्दी भयंकर संकटात पडले आहेत तरी हिंदुस्तानचें स्वातंत्र्य मान्य करण्यास ते तयार नाहींत हा केवळ वेडपटपणा नाहीं, उलट ब्रिटिशांनीं स्वेच्छेनें साम्राज्य सोडावें अशी आम्हीं अपेक्षा करणें हा आमचाच वेडेपणा होय......

"कोण्या एके दिवशीं हिंदुस्तानचें स्वातंत्र्य मान्य करण्यास इंग्लंडचें मन वळविता येईल असा भ्रम कोणीहि हिंदी इसमानें आपल्या मनात ठेवू नये.

"याचा अर्थ ब्रिटिश मुत्सद्दी जनतेशीं पुन्हा कधींच समेट करणार नाहींत असा नव्हे.

"व्यक्तिशः मला असें वाटतें, कीं या सालीं केव्हातरी पुन्हा असा प्रयत्न होईल. पण माझ्या देशबांधवांनो, तुमच्या नजरेस एक गोष्ट आणू इच्छितों, कीं केवळ तडजोडीच्या मार्गानें ब्रिटिश मुत्सद्दी हिंदुस्तानचें स्वातंत्र्य कधींच मान्य करणार नाहींत. फक्त पुन्हा एकदा आमच्यापुढें आपल्या प्रचंड शक्तीचा बागुलबुवा उभा करतील.

" दीर्घकालीन किचकट वाटाघाटींचा हेतु नेहमीं स्वातंत्र्याची मोहीम डावलली जावी हा असतो. यामुळे राष्ट्राची प्रबळ इच्छाशक्ति दुर्बल करून टाकणें हा डाव खेळला जातो. डिसेंबर १९४१ पासून एप्रिल १९४२ पर्यंत हाच डाव खेळला जात होता...

" म्हणून ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं तडजोड करण्याची आशा आपण एकदा अखेरची सोडून दिली पाहिजे. आमच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नात तडजोडींना मुळींच वाव नाहीं. ब्रिटिश आणि त्याचे मित्र हिंदुस्तान सोडून कायमचे बाहेर जातील त्यावेळींच स्वातंत्र्य मिळाले असे होईल; आणि ज्याना स्वातंत्र्य खरोखर हवे आहे त्यानीं त्यासाठीं लढा केला पाहिजे व आपल्या रक्ताचे मोल दिलें पाहिजे...

" म्हणून, देशबांधवहो आणि मित्रहो, आपण स्वातंत्र्याचा लढा हिंदुस्तानात व हिंदुस्तानाबाहेर आपल्या सर्व शक्तीनें व सर्व जोमानें लढला पाहिजे. ब्रिटिश साम्राज्यशाही पूर्णपणें उध्वस्त होईपर्यंत आपला हा लढा अचल श्रद्धेनें आपण चालू ठेवला पाहिजे. ब्रिटिश साम्राज्याच्या रक्षेतूनच स्वतंत्र हिंदुस्तान पुन्हा जन्माला येईल.

" आता या लढ्यात मागें वळायचें नाहीं अथवा कचरायचें नाहीं. पुढें— आणखी पुढें आपण चाल करीत राहिलें पाहिजे. विजय मिळून देश स्वतंत्र होईपर्यंत ही लढाई आपण पुढें चालूच ठेवली पाहिजे."

किती उदात्त भाषण हें!

२४ जून, १९४२

सुभाषरावूंचें आकाशवाणीवरील आणखी एक भाषण—राष्ट्राच्या हृदयाला पोचणारी आणखी एक हाक ऐकू येत आहे:—

" आमच्या देशातील कांहीं बांधवाना अशी अपेक्षा आहे, कीं आंतरराष्ट्रीय संकटाच्या दडपणामुळें हिंदुस्तानसारख्या गुलाम राष्ट्राचें स्वातंत्र्य मान्य करण्यास ब्रिटनला भाग पाडलें जाईल; पण या सर्व अपेक्षा अगदीं चुकीच्या आहेत...

"तुम्हाला माहीतच आहे, कीं १९४० च्या शेवटीं महात्मा गांधींनीं नि शस्त्र प्रतिकाराची मोहीम अखेरीस सुरू केलेली मीं जेव्हा पाहिली त्या वेळीं हिंदुस्तानचा स्वाभिमान आणि त्याची इभ्रत त्यांनीं प्रस्थापित केली असें मला वाटलें. आता हिंदुस्तानातील क्रांतिकार्य अधिक मोठ्या प्रमाणावर आणि अधिक परिणामकारक रीतीनें आखून घेऊन यशस्वी करण्याची वेळ आली आहे असें माझ्या मनाने घेतलें. आपले हें सर्व हेतु पूर्ण झाले आहेत असें आज मी जाहीर करू शकतो. आंतरराष्ट्रीय परिस्थिति काय आहे हें आपण आज जाणतों, आणि म्हणून अंतिम विजय आम्हाला मिळेल अशी आम्हाला खात्री वाटते ..

"आमच्या शत्रूच्या प्रत्यक्ष अमलाखालीं जे हिंदी लोक रहात नाहींत अशा हिंदुस्तानाबाहेरील सर्व हिंदी लोकांचें एकीकरण आम्हीं आज केलें असून त्याची मजबूत संघटना आम्हीं बनविली आहे. हिंदुस्तानात ज्या हकिगती घडत आहेत त्या रोजच्या रोज आम्ही पहात आहों. आंतरराष्ट्रीय घटनांशींहि आम्ही अधिक संबंध ठेवला आहे. हे सर्व हिंदी लोक हिंदुस्तानातील तुम्हां हिंदी लोकांना योग्य वेळीं सर्व प्रकारची मदत देण्यासाठीं, जे तुम्ही तुरुंग, छळ आणि पाशवी हल्ले यांना तोंड देऊन स्वातंत्र्याचा लढा स्वदेशात लढत आहा त्या तुमच्या मदतीसाठीं सर्व तयारी करीत आहेत.

"मित्रहो, तुमच्या लक्षात असेलच, कीं मी आणि माझ्यासारख्या किती तरी जणांनीं योग्य वेळ येताच स्वातंत्र्यासाठीं लढण्याच्या चैमनात, त्यासाठीं सोसाव्या लागणाऱ्या यातनात, त्यामुळे प्राप्त होणाऱ्या विजयानंदात भागीदार होण्यासाठीं तुमच्या खांद्यास खांदा लावून उभे असू अशी शपथ पूर्वी घेतली आहे.. ही शपथ आम्ही आज पार पाडीत आहों. ."

"हिंदुस्तान स्वतंत्र होणारच—अगदीं लवकर स्वतंत्र होणार. स्वतंत्र होताच आपले तुरुंग खुले करणार. तुरुंगातील हिंदुस्तानच्या बहुमोल सुपुत्रांना तुरुंगाच्या अंधारातून स्वातंत्र्याच्या प्रकाशात बाहेर आणणार."

## २९ जून, १९४३

हिंदुस्तानच्या स्वातंत्र्यासाठीं उभारण्यांत यावयाच्या सैन्यात पूर्व

आशियांतील हिंदी लोकांनीं सामील व्हावें अशी सुभाषबाबूंनीं जाहीर विनंति केली आहे.

" हिंदुस्तान स्वतंत्र करण्याचे कार्य आम्हा हिंदी लोकाचे आहे. तें फक्त आमचेच कार्य आहे. ही जबाबदारी आम्ही इतर कोणावरहि टाकणार नाहीं; कारण राष्ट्राच्या इभ्रतीच्या दृष्टीने तें गैर होईल...

" परंतु शत्रु अत्यंत निर्दय असून बेफाम झालेला आहे. सर्वांगानीं तो शस्त्रसज्ज झालेला आहे. अशा भयंकर शत्रूविरुद्ध केवढाहि निःशस्त्र प्रतिकार, केवढाहि घातपात, केवढाहि क्रांतिकारक दहशतवाद पुरा पडणार नाहीं. म्हणून हिंदुस्तानातून ब्रिटिश सत्ता हाकून लावावयाची असेल तर त्याच्यासारखींच हत्यारें आपल्याजवळ पाहिजेत. शत्रूनें तरवार उपसलीच आहे—तर मग त्याच्याशीं तरवारीनेंच लढलें पाहिजे.

" मला विश्वास वाटतो, कीं पूर्व आशियातील माझ्या देशबांधवाच्या मदतीनें मी प्रचंड सैन्य उभारीन, आणि त्याच्या बळावर हिंदुस्तानांतून ब्रिटिश सत्तेला हाकून लावीन...अखेरची घटका आली आहे.''आता प्रत्येक हिंदी माणसानें रणांगणाची वाट धरली पाहिजे. स्वातंत्र्यप्रेमी हिंदी लोकाचें रक्त जेव्हा वाहूं लागेल तेव्हाच हिंदी राष्ट्र स्वतंत्र होईल."

सर्व बाजूंनी उत्साहाला भरते येत आहे. आम्ही सर्व कामकाजांत अगदीं गर्क आहों. पी—रात्रीं अगदीं उशिरा घरीं आला. एक दोन वाजले होते. सकाळीं सातला तो पुन्हा बाहेर पडला. शोनानला सुभाषबाबूंचे होणारें आगमन आणि ज्या परिषदेंत ते आमचें पुढारीपण पत्करणार ती परिषद याची योग्य तयारी सुरू आहे. मी रोषणाई समितींत आहें. गांधीजींचे एक भव्य तैलचित्र आम्हीं मिळविलें आहे. परिषदेचा सर्व कारभार त्या भव्य चित्राच्या छायेंत चालेल. आझाद हिंद फौज समोरून सलामीसाठीं चाल करून जाईल त्यावेळीं भारतमाता राष्ट्रीय निशाण हातांत घेऊन उभी आहे अशी एक आकृति आम्ही तयार करणार आहों. रोषणाई अगदीं साधी पण परिणामकारक करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. फाजील देखाव्याशीं मुळींच करावयाची नाहीं.

२ जुलै, १९४३

सुभाषबाबू आज आले. पुरुष, स्त्रिया व मुलें झाडून सारीं त्यांच्या स्वागतार्थ गेलीं..प्रेम आणि गौरव व्यक्त करण्याचा तो देखावा मोठा विलक्षण होता, हिंदी, मलायी, चिनी, जपानी अशा अनेक राष्ट्रिकाचा तो सागरच होता. या महान् क्रांतिकारक पुढाऱ्याचें दर्शन एकदां तरी मिळावें यासाठीं हे लोक धक्काबुक्की करीत होते, गर्दीत चिरडले जात होते.

सुभाषबाबूंची शरीरयष्टी ताठ उभी आहे. त्याचें डोकें सर्व गर्दीच्या वर उंच दिसतें. मान न वाकता ते अभिमानानें ताठ असते. त्यांच्या चेहेऱ्यावर मोहक हास्य आहे. सर्वांचीं मनें सुभाषबाबूंनीं काबीज केलीं आहेत. असा एक पुढारी आम्हास मिळाला आहे, कीं जो आमच्या ध्येयाप्रत आम्हाला घेऊन जाईल असा आता आम्हाला विश्वास वाटतो. सुभाषबाबूंचे फोटो पाहून त्याचें सुंदर शरीर आणि त्याची उपाड्याची उंची याची योग्य कल्पनाच येत नाहीं. आमच्या चॅन्सरी लेन येथील कचेरींत ते स्थानिक कार्यकर्त्यांना भेटले त्या वेळीं मला त्यांच्याकडे निरखून पहाण्याची संधि मिळाली, त्यांचा चेहेऱ्यावरील हास्य पाहून विरोधकाचा संताप नाहींसा होतो, शस्त्र गळून पडतें. मि. डी— हा अतिशय संशयखोर. जपानवर विश्वास कसा टाकावा अशा शंका तो मांडू लागला तेव्हा सुभाषबाबू त्याच्याकडे वळले, त्यांनीं स्मित केलें आणि ते म्हणाले,

" निदान फसला जाऊ नये इतपत मेंदू माझ्या डोक्यात आहे असा तरी विश्वास तुम्हाला वाटतो का? तसा वाटत असेल तर जपानी आम्हाला दगा देऊ शकणार नाहींत असें मी तुम्हाला आश्वासन देतों. या माझ्या शब्दावर विश्वास ठेवा. जर आपण योग्य संघटना केली नाहीं, आमच्या स्वातंत्र्यासाठीं लढणारें हिंदी लोकाचें समर्थ असें सैन्य आम्हीं जर उभारलें नाहीं तरच जपानी आम्हाला दगा देऊ शकतील. आपण जागे असलें पाहिजे, जिवंत असलें पाहिजे, पाळतीवर असलें पाहिजे—ही पाळत आपण केवळ आपला शत्रु असलेल्या ब्रिटिश साम्राज्यावरच नव्हे अथवा साम्राज्यलोभी असलेल्या जपानी नोकरशहावरच नव्हे तर आमच्यातील हिंदी लोकावरहि ही पाळत आपण ठेवली पाहिजे. पूर्ण शिस्तीनें वागून प्रत्येक प्रकारच्या त्यागाला

आशियांतील हिंदी लोकांनीं सामील व्हावें अशी सुभाषबाबूंनीं जाहीर विनंति केली आहे.

" हिंदुस्तान स्वतंत्र करण्याचें कार्य आम्हा हिंदी लोकांचें आहे. तें फक्त आमचेंच कार्य आहे. ही जबाबदारी आम्ही इतर कोणावरहि टाकणार नाहीं, कारण राष्ट्राच्या इभ्रतीच्या दृष्टीनें तें गैर होईल...

" परंतु शत्रु अत्यंत निर्दय असून बेफाम झालेला आहे. सर्वांगानीं तो शस्त्रसज्ज झालेला आहे. अशा भयंकर शत्रूविरुद्ध केवढाहि नि:शस्त्र प्रतिकार, केवढाहि घातपात, केवढाहि क्रांतिकारक दहशतवाद पुरा पडणार नाहीं. म्हणून हिंदुस्तानातून ब्रिटिश सत्ता हाकून लावावयाची असेल तर त्याच्यासारखींच हत्यारें आपल्याजवळ पाहिजेत. शत्रूनें तरवार उपसलीच आहे—तर मग त्याच्याशीं तरवारीनेंच लढलें पाहिजे.

" मला विश्वास वाटतो, कीं पूर्व आशियातील माझ्या देशबांधवांच्या मदतीनें मी प्रचंड सैन्य उभारीन, आणि त्याच्या बळावर हिंदुस्तानांतून ब्रिटिश सत्तेला हाकून लावीन...अखेरची घटका आली आहे. 'आता प्रत्येक हिंदी माणसानें रणांगणाची वाट धरली पाहिजे. स्वातंत्र्यप्रेमी हिंदी लोकांचें रक्त जेव्हां वाहूं लागेल तेव्हांच हिंदी राष्ट्र स्वतंत्र होईल."

सर्व बाजूनीं उत्साहाला भरतें येत आहे. आम्ही सर्व कामकाजात अगदीं गर्क आहों. पी—रात्रीं अगदीं उशिरा घरीं आला. एक दोन वाजले होते. सकाळीं सातला तो पुन्हा बाहेर पडला. शोनानला सुभाषबाबूंचें होणारें आगमन आणि ज्या परिषदेत ते आमचें पुढारीपण पत्करणार ती परिषद याची योग्य तयारी सुरू आहे. मी रोषणाई समितींत आहे. गांधीजींचें एक भव्य तैलचित्र आम्हीं मिळविलें आहे. परिषदेचा सर्व कारभार त्या भव्य चित्राच्या छायेंत चालेल. आझाद हिंद फौज समोरून सलामीसाठीं चाल करून जाईल त्यावेळीं भारतमाता राष्ट्रीय निशाण हातात घेऊन उभी आहे अशी एक आकृति आम्ही तयार करणार आहों. रोषणाई अगदीं साधी पण परिणामकारक करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. फाल्तू देखावाबाजी मुळींच करावयाची नाहीं.

२ जुलै, १९४३

सुभाषबाबू आज आले. पुरुष, स्त्रिया व मुलें झाडून सारीं त्याच्या स्वागतार्थ गेलीं..प्रेम आणि गौरव व्यक्त करण्याचा तो देखावा मोठा विलक्षण होता. हिंदी, मलायी, चिनी, जपानी अशा अनेक राष्ट्रिकांचा तो संगमच होता. या महान् क्रांतिकारक पुढाऱ्याचें दर्शन एकदां तरी मिळावें यासाठीं हे लोक धक्काबुक्की करीत होते, गर्दींत चिरडले जात होते.

सुभाषबाबूंची शरीरयष्टी ताठ उभी आहे. त्यांचें डोकें सर्व गर्दींच्या वर उंच दिसतें. मान न वाकता ते अभिमानानें ताठ असतें. त्यांच्या चेहेऱ्यावर मोहक हास्य आहे. सर्वांचीं मनें सुभाषबाबूंनीं काबीज केलीं आहेत. असा एक पुढारी आम्हास मिळाला आहे, कीं जो आमच्या ध्येयाप्रत आम्हाला घेऊन जाईल असा आता आम्हाला विश्वास वाटतो. सुभाषबाबूंचे फोटो पाहून त्यांचें सुंदर शरीर आणि त्यांची उफाड्याची उंची याची योग्य कल्पनाच येत नाहीं. आमच्या चॅन्सरी लेन येथील कचेरींत ते स्थानिक कार्यकर्त्यांना भेटले त्या वेळीं मला त्यांच्याकडे निरखून पहाण्याची संधि मिळाली. त्यांच्या चेहेऱ्यावरील हास्य पाहून विरोधकांचा संताप नाहींसा होतो, शस्त्र गळून पडतें. मि. डी— हा अतिशय संशयखोर. जपानवर विश्वास कसा टाकावा अशा शंका तो मांडू लागला तेव्हा सुभाषबाबू त्याच्याकडे वळले, त्यांनीं स्मित केलें आणि ते म्हणाले,

" निदान फसला जाऊं नये इतपत मेंदू माझ्या डोक्यात आहे असा तरी विश्वास तुम्हाला वाटतो का ? तसा वाटत असेल तर जपानी आम्हाला दगा देऊं शकणार नाहींत असें मी तुम्हाला आश्वासन देतों. या माझ्या शब्दावर विश्वास ठेवा. जर आपण योग्य संघटना केली नाहीं, आमच्या स्वातंत्र्यासाठीं लढणारें हिंदी लोकांचें समर्थ असें सैन्य आम्हीं जर उभारलें नाहीं तरच जपानी आम्हाला दगा देऊं शकतील. आपण जागे असलें पाहिजे, जिवंत असलें पाहिजे, पाळतीवर असलें पाहिजे—ही पाळत आपण केवळ आपला शत्रु असलेल्या ब्रिटिश साम्राज्यावरच नव्हे अथवा साम्राज्यलोभी असलेल्या जपानी नोकरशहावरच नव्हे तर आमच्यांतील हिंदी लोकांवरहि ही पाळत आपण ठेवली पाहिजे. पूर्ण खिस्तीनें वागून प्रत्येक प्रकारच्या त्यागाला

आपली तयारी आपण ठेवली पाहिजे. प्रत्येकानें आपलें कार्य उचलण्यास सज्ज असावें. मी तुम्हाला भरपूर काम पुरवितों. काम—काम—एकसारखें काम, हाच तुमचा व माझा घोष असला पाहिजे."

२ जुलै, १९४३

आज सुभाषबाबू आझाद हिंदी फौजेच्या पुढाऱ्यांना भेटत आहेत. काल हाँगकाँग, सयाम, ब्रह्मदेश, बोर्निओ इत्यादि ठिकाणच्या लीग कार्यकर्त्यांशीं ते गुप्तपणे बोलले.

पी—नें सुभाषबाबूंची छोटीशी मुलाखत घेतली व उत्तर मलायांतील आपल्या दौऱ्यातील अनुभव सांगितले. सुभाषबाबूंच्याइतका माहीतगार पुढारी आपणाला कधींच भेटला नाहीं असें पी—म्हणाला. नकाशावरील लहान लहान ठिकाणाचीं नावें त्याना माहीत आहेत. निरनिराळ्या ठिकाणाची हवेची परिस्थिति, जगलाचा अवघडपणा, ब्रिटिशाना चकविण्यासाठीं जपान्यानीं अवलंबिलेली कार्यपद्धति या सर्वांची सुभाषबाबूंना माहिती आहे. पी—म्हणतो, आपण सांगितलेली प्रत्येक गोष्ट सुभाषबाबूंना माहीत होतीच. पी—च्या मनावर सुभाषबाबूंची विशेष छाप पडण्याचें कारण म्हणजे सुभाषबाबूंच्या बोलण्यात आधुनिक युद्ध व आधुनिक सैन्य यासंबंधींचें तात्त्विक ज्ञान त्यानीं जें व्यक्त केलें तें होय. हा खराखुरा जनतेचा पुढारी आहे अशी पी—ची खात्री झाली.

४ जुलै १९४३

आज परिषदेची प्राथमिक बैठक भरली.

सुभाषबाबू बोलत असता अगदीं निःशब्द शांतता होती. त्याचा प्रत्येक शब्द ऐकूं येत होता.

"मित्रहो, स्वातंत्र्यप्रेमी हिंदी लोकानीं स्वातंत्र्यार्थ निकराचा प्रयत्न करण्याची वेळ आता आली आहे. युद्धाचा आणीबाणीचा प्रसंग आलेला असतांना जें कार्य करावयाचें त्यात प्रथम लष्करी शिस्त आणि कधींही न खचणारी कार्यनिष्ठा आपण दाखविली पाहिजे. म्हणून पूर्व आशियातील माझ्या सर्व

देशबांधवानो, आपली एक अभेद्य फळी निर्माण करण्याची मी विनंति करतो. आपल्यासमोर वाढून ठेवलेलें हे जें निकराचें युद्ध त्यासाठीं आपण तयारी केली पाहिजे. माझी खात्री आहे, कीं हे हिंदी लोक ही तयारी करतीलच...

"मीं अनेकवार जाहीरपणे सांगितले आहे, कीं १९४१ सालीं एका महत्त्वाच्या कार्यासाठीं मीं स्वदेश सोडला, त्यावेळीं माझ्या देशांतील प्रचंड लोकमताचा मला पाठिंबा होता. तेव्हापासून गुप्त पोलीस खात्यानें हिंदुस्तानातील बातम्यावर कडक निर्बंध ठेवले असूनसुद्धा माझ्या देशातील देशबांधवांशीं माझा सतत संबंध आहे...

"हिंदुस्तानात जे स्वातन्त्र्यवीर लढत आहेत त्यांचे विश्वस्त म्हणूनच हिंदुस्तानाबाहेरील हिंदी देशभक्त कार्य करीत आहेत. मी पुन्हा एकदा सर्वांना आश्वासन देतो, कीं आम्ही आजवर जे करीत आलों अथवा पुढें करू तें सर्व हिंदुस्तानच्या स्वातंत्र्यासाठींच होतें व यापुढेंहि तें स्वातंत्र्यासाठींच असेल. हिंदुस्तानच्या हितसंबंधास बाध येईल, हिंदी लोकमताला पसंत न पडेल अशी कोणतीहि गोष्ट आम्ही करणार नाहीं.

"आमच्या सर्व शक्तींची सघटना परिणामकारक अशी व्हावी यासाठीं स्वतंत्र हिंदुस्तानचें तात्पुरतें सरकार स्थापन करण्याचा माझा हेतु आहे...... आमच्याच प्रयत्नाने व आमच्याच आहुतीने स्वातन्त्र्य प्राप्त करून घेतले म्हणजे ज्यायोगे सर्व भाविकाळ आमच्या स्वातंत्र्याचें आम्ही रक्षण करूं शकूं असे सामर्थ्यहि आम्हाला प्राप्त होईल. मी तुम्हांला इषारा देऊन ठेवतों, कीं अंतिम विजय आम्हाला मिळणार अशी पूर्ण खात्री असली तरी शत्रूची शक्ति कमी आहे असें आपण मानता कामा नये. मधून मधून थोडा काळ पिछेहाट पत्करण्याची तयारी आपण ठेवली पाहिजे. आमच्यापुढें भयानक असा लढा वाढून ठेवला आहे; कारण शत्रु सामर्थ्यवान, निर्दय व नीतिअनीतीची मर्यादा न करणारा असा आहे. स्वातंत्र्याचा हा अखेरचा लढा असून त्यात उपासमार तहानभूक, सक्तींची वाटचाल, मृत्यु या सर्वांस तोंड देणें आपल्यास भाग पडेल. या सर्व कसोटीस तुम्ही उतराल त्यावेळींच तुम्ही स्वतंत्र व्हाल. मला खात्री आहे, कीं तुम्ही या कसोटीस उतरालच आणि आपल्या दरिद्री व गुलाम झालेल्या मातृभूमीस स्वातंत्र्य आणि वैभव प्राप्त करून द्याल... "

५ जुलै, १९४३

टाऊनहॉलसमोर झालेल्या लष्करी निदर्शनामध्यें आमच्या सैनिकांनीं मोठ्या अभिमानानें कवाईत करून दाखविली.. मी व्यासपीठावरून पहात होतें. राष्ट्रगीत गाणाऱ्या मुलींच्या तुकडींत मी होतें. नेताजींना सलाम करीत पी—त्याच्या समोरून जात असता, व्यासपीठावर विजेप्रमाणें चमकणारा पुढारी पाहून पी—ला त्याचेबद्दल किती गौरव वाटला हें मी पी—च्या चेहेऱ्यावरून पाहू शकलें. पी—आणि त्याचे सैनिक आपल्या राष्ट्राच्या स्वातन्त्र्यासाठीं आपल्या रक्ताचा शेवटचा बिंदु सपेपर्यंत लढण्यास तयार आहेत. त्याचा उत्साह आणि हिंमत, अतिशय तापून पांढऱ्या दिसू लागलेल्या लोखंडाइतकी सतेज झाली आहे. विशेष लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही, कीं सुभाषबाबूंच्या दर्शनाबरोबर सर्व क्षुद्र कारस्थानें बंद पडलीं, सर्व भांडणें विसरलीं गेलीं. नेताजींनीं आम्हा सर्वांचें रूप पालटून टाकलें. आम्हीं पूर्वींहून अगदीं वेगळीं माणसें आहोंत असें आमचें आम्हासच वाटू लागलें आहे.

नेताजींच्या तोंडातून अनावर असा विचारौघ वाहात होताः—

"हिंदुस्तानच्या स्वातंत्र्यसैन्यातील सैनिकहो,

"माझ्या आयुष्यातील अतिशय अभिमानाचा असा हा दिवस आहे. हिंदुस्तान स्वतन्त्र करणारें हिंदुस्तानचें सैन्य निर्माण झाले असें जगाला जाहीर करण्याचा अद्वितीय मान मला देण्याची ईश्वराची इच्छा आहे. एकाकाळीं ब्रिटिशांच्या अमलात असलेल्या या सिंगापूरच्या रणांगणावर हें सैन्य लष्करी पद्धतीनें रचलेलें आहे. ब्रिटिश साम्राज्याच्या जोखडापासून हिंदुस्तानची सुटका करणारें असें हें सैन्य आहे......हें हिंदी सैन्य सर्वस्वीं हिंदी नेत्याच्या नेतृत्वाखालींच संघटित झालें असून जेव्हा स्वातन्त्र्यलढ्याचा तो ऐतिहासिक क्षण प्राप्त होईल त्यावेळीं हिंदी नेत्याच्या हुकुमतीखालींच तें रणांगणावर जाईल......ब्रिटिश साम्राज्याच्या स्मशानभूमींत आज उभे राहिले असताना सर्वसमर्थ असें ब्रिटिश साम्राज्य हें भूतकालात जमा झालें आहे अशी एखाद्या लहान मुलालाहि खात्री पटेल.



*ज्या क्षेत्रांत स्त्रियांनी पुरुषांबरोबर आनंदानें व शौर्यानें कर्तव्याचा भार उचलला नाहीं असें एकही कार्यक्षेत्र नाहीं.*

रंगूनमधील स्त्रियांच्या सभेंत सुभाषबाबूंचें भाषण



झाशीच्या राणीची समशेर हाती धरून मृत्यूला आव्हान देणारे मी—ळ

"बाधवहो, माझे सैनिकहो, 'दिल्लीकडे' 'दिल्लीकडे' अशी आपली घोषणा असू दे. आम्हापैकीं कितीजण व्यक्तिशः या स्वातंत्र्य संगरातून जिवत राहातील तें मला माहीत नाहीं. पण एक गोष्ट मी नक्की जाणतों, कीं आम्ही अखेरीस यशस्वी होऊ. आमच्यातील जे जिवत राहातील त्यांना ब्रिटिश साम्राज्याच्या दुसऱ्या स्मशानभूमीवर—प्राचीन दिल्लीच्या लाल किल्ल्यापुढें—विजयकवाईत करायला मिळेपर्यंत आमचें कार्य सपणार नाहीं......

"माझ्या सर्व सार्वजनिक आयुष्यभर एक गोष्ट नेहमीं माझ्या मनास लागून राहिलेली असे, की इतर सर्व बाबतींत हिंदुस्तान स्वतत्र होण्याला परिपक्व झालें आहे, पण एकच गोष्ट कमी आहे. ती म्हणजे स्वातन्त्र्यास्तव लढणारे सशस्त्र सैन्य ही होय. अमेरिकेचा जॉर्ज वॉशिंग्टन लढून स्वातन्त्र्य मिळवू शकला याचें कारण त्याच्याजवळ सैन्य होतें. गॅरिबाल्डीला इटालीचें स्वातन्त्र्य मिळविता आलें याचे कारण त्याच्यामागें सशस्त्र स्वयसेवकाचे पाठबळ होतें. हिंदुस्तानचे राष्ट्रीय सैन्य बनविण्यासाठीं प्रथम पुढे येण्याचा मान तुम्हाला मिळालेला आहे...स्वत.च्या देशाला जे सैनिक स्वामिनिष्ठ राहातात, कोणत्याहि परिस्थितींत जे कर्तव्यतत्पर असतात आणि आत्माहुतीसाठीं केव्हाहि तयार असतात ते सैनिक अजिंक्य ठरतात. तुमच्या अत करणात खोल जागीं हीं तीन ध्येयें कोरून ठेवा.

"बाधव हो, हिंदुस्तानच्या राष्ट्रीय स्वाभिमानाचे आज तुम्ही संरक्षक असून हिंदुस्तानच्या आशा आणि आकाक्षा तुमच्या रूपानें जगाला दिसत आहेत. म्हणून असें वर्तन करा कीं ज्यायोगें तुमचे देशबाधव तुम्हाला आशीर्वाद देतील आणि भावी पिढ्या तुमच्याबद्दल अभिमान बाळगतील. विश्वास असू द्या, कीं गडद अधकार असो कीं प्रखर सूर्यप्रकाश असो, दु खाचे डोंगर कोसळोत अथवा आनदाच्या लहरी येवोत, यातना भोगाव्या लागोत अथवा विजयानदाचा वर्षाव होवो—सर्व वेळीं मीं तुमच्या बरोबरच असेन. तूर्त भूक, तहान, यातना, सक्तीची चाल आणि मृत्यु याखेरीज मी तुम्हाला काहींहि देऊं शकत नाहीं. हिंदुस्तान स्वतत्र झालेलें पहाण्यास आपल्यातील कोण जिवत राहील हा मुद्दा मुळींच महत्त्वाचा नाहीं. हिंदुस्तान स्वतत्र होणारच आणि त्या

स्वातंत्र्यासाठीं आम्हीं सर्वस्वाचा होम करणारच. एवढा आत्मविश्वास असला म्हणजे पुरे. आमच्या या फौजेला ईश्वर आशीर्वाद देवो आणि आगामी युद्धात विजयी करो."

इंडिपेन्डन्स लीगच्या पुढाऱ्यांना ज्या अडचणी दुर्गम पर्वतासारख्या प्रचंड वाटल्या त्या नेताजी भराभर वितळून टाकीत आहेत.

आझाद हिंद फौज निर्माण झाली ही गोष्ट व ती निर्माण करण्याचे हेतु जगाला जाहीर करण्यास अजूनपर्यंत किरान सात्यानें परवानगी दिली नव्हती. हीच आमची मुख्य तक्रार होती. सुभाषबाबू येथें आले व जेते ठरले. भयकर वादळी पावसानें मिठाचा ढिगारा जसा वाहून जावा त्याप्रमाणें सुभाषबाबूंच्या आकर्षक आणि वेगवान व्यक्तित्वानें ही अडचण एकदम दूर झाली. उद्या जनरल टोजो फौजेस सलामी देईल.

## ६ जुलै १९४३

जनरल टोजोनें त्याचे समोरून आझाद हिंद फौज चालली असता तिला सलामी दिली तो देखावा किती तरी भव्य होता. जपानी पंतप्रधानाच्या सान्नास खादा लावून नेताजी उभे होते. आमचे शूर तरुण त्याच्या समोरून मर्दपणानें कवाईत करीत चालले होते. लष्करी भावनायुक्त अशा सशस्त्र देशाभिमानामुळें जें सामर्थ्य आगीं येतें त्याचा आत्मविश्वास त्याच्या तोंडावर झळकत होता. आमची राष्ट्रध्वजा—हिंदुस्तानचें राष्ट्रीय निशाण—ही खात्रावर अतिशय उच करण्यात आली होती. दीड तासपर्यंत फौजेची चाल सुरू होती. जनरल टोजो कवायतींत उभा राहून सलामी देत होता.

रात्रीं पी—नें आपल्याबरोबर अनेक मित्र जेवायला आणले. ते लोक सर्व समिश्र होते. मि. एल्—हा मलायन् होता. त्यानें कितीतरी नव्या आणि उद्बोधक कथा सांगितल्या. तो म्हणाला, "ब्रिटिशानीं मलाया कधींहि शस्त्रानीं जिंकला नाहीं. पैसा आणि कपट याच्या बळावर त्यानीं मलाया 'खरेदी' केला. त्यानें अनेक उदाहरणें दिलीं. सिंगापूर १८१९ मध्यें जोहोरच्या सुलतानाकडून 'खरेदी' करण्यात आलें. पेनँग केडहच्या सुलतानकडून १७८६ मध्यें

खरेदी' करण्यांत आलें. मलाक्का डचांपासून 'खरेदी' करण्यांत आलें. पेरॅकचा इतिहास वैशिष्ट्यपूर्ण आहे. १८२४ मध्यें ब्रिटन व सयाम यांनीं पेरॅकच्या स्वातंत्र्याची हमी घेतली. १७७४ पर्यंत सुलतानानें सुखेनैव राज्य केलें. नंतर सुलतानानें एक मूर्खपणा केला. कांहींतरी अंतर्गत भांडणात त्यानें ब्रिटिशांची मदत मागितली. एक ब्रिटिश रेसिडेंट तेथें आला आणि त्याचा खून झाला. बहुधा ब्रिटिशांच्या हस्तकानीं खून केला असावा. लगेच त्या संस्थानास शासन करण्यासाठीं ब्रिटिश सैन्य आणण्यात आलें. खुनी लोकांना पकडून फाशीं देण्यांत आलें. पेरॅक मात्र कायमचें ब्रिटिशांच्या अंमलात गेलें.

सेलँगोरचा इतिहास असाच आहे. नेग्रि सॅंबिलन आणि पाहंग यांचाहि असाच आहे. कांहीं तरी स्थानिक उपद्रव व्हावा—कोणीतरी ब्रिटिशानें हस्तक्षेप करावा, त्याचा खून व्हावा अथवा दुसरें काहीं तरी व्हावें—मग शासन करण्यासाठीं ब्रिटिश सैन्य यावें—आणि मुलुख खालसा व्हावा असेच हे सर्व मुलुख जिंकले गेले.

. . . या सर्व मोहिमांत शंभराहून अधिक ब्रिटिशांना मरावें लागलें नसेल. इतक्या थोड्या किंमतीला ही 'खरेदी' झाली आणि तरीहि हे प्रदेश आम्हीं जिंकून घेतले असे ब्रिटिश सांगतात.

जपानी मलायाच्या पूर्व किनाऱ्यावरून चढाई करतील अशी ब्रिटिशांची अपेक्षा होती. जपान्यांनीं कोटा बाहारू येथें हल्ला चढविला; परंतु मलाया द्वीपकल्पाच्या उत्तर–दक्षिण लांबीतून ते जे गेले ते पश्चिम किनाऱ्यावरील मैदानांतून गेले. ब्रिटिशांना वाटलें, हीं जंगलें अभेद्य आहेत. परंतु जंगलांतील अवघड वाटांतून सुरक्षितपणें जाण्याला जपान्यांना पुरेसे वाटाडे मिळाले. जपानच्या सैन्य-पद्धतीसंबंधानें ब्रिटिशांचें मत अगदीं क्षुद्र होतें. म्हणून त्यांनीं फक्त दोन सहा इंची तोफा पेनँगमध्यें ठेवल्या होत्या. किनाऱ्यावर बचावसाधनें फक्त कोटाबाहारूत आणि दुसऱ्या तीन-चार ठिकाणीं ठेवलीं होतीं. टॅंक्स अथवा टॅंक पकडण्याचे सापळे कोठेंच नव्हते. तोफा ठेवण्याचे धक्के नव्हते. पिलबॉक्सेस नव्हत्या. कोठेंच कांहींच बचावसामुग्री नव्हती. फोर्मोसा बेट येथून पंधराशें मैल आहे. तेच जपान्यांचा जास्तींत जास्त जवळचा आरमारी तळ होय असें ब्रिटिशांना

वाटलें. जेव्हा जपान्याची आघाडी पुढें सरकली तेव्हा थायगावला त्यांचें मुख्य ठाणें होतें. थायगाव फक्त सहाशें मैल होतें. सिंगापूरचा विस्तृत समुद्र हीच धोक्याची जागा होय असें ब्रिटिशाना वाटे. म्हणून सर्व जड आरमारी तोफा त्यानीं तेथेंच, समुद्राच्या दिशेनें सीमेंट—कॉंक्रीटच्या पायात भक्कम बांधून ठेवल्यामुळें जपानी जेव्हा उत्तरेच्या दिशेनें आले तेव्हा उत्तरेकडे तोंड करून तोफाचा भडिमार करण्याचें काम या तोफाना करता येईना. दक्षिणेकडील 'धोक्याच्या समुद्राकडे' त्यांचीं तोंडें पक्की बसविलेलीं होतीं. ज्याचा नाश करायचें ईश्वराच्या मनात असतें ते प्रथम आंधळे होतात अशी जी म्हण आहे ती खरीच. मि. एल्—म्हणतो, जपान्याना ब्रिटिशाविरूद्ध हा जो अगदीं सहज विजय मिळाला त्याचा खुलासा याहून अन्य प्रकारें करताच येणार नाहीं.

आम्हा सर्व मंडळींची बैठक संपली त्यावेळीं बरीच रात्र झाली होती. सगळें सभाषण मि. एल्—यानेच केलें. त्या माणसाची मोठी छाप पडते. त्याला आपण वरचेवर बोलावलें पाहिजे.

९ जुलै १९४३

आज प्रचंड मेळाव्याचा दिवस होता. पेडॅंग येथें म्युनिसिपल कचेर्‍या समोर तो मेळावा भरला एक लाखाहून अधिक लोक नेताजींचें भाषण ऐकण्यास आले होते वरून पहाणारास तो नुसता मस्तकाचा सागरच दिसत होता. उत्साह प्रचंड होता. लोकाशीं वागण्याच्या नेताजींच्या पद्धतींत अशी काहीं एक ढब आहे, कीं त्यामुळें त्यांचेबद्दल प्रेम वाटू लागतें. स्त्रिया व मुलें यांच्या संबधानें ते मोठें आदरानें वागतात. जमाव अनावर होतो, नेताजींना पाहाण्यासाठीं अथवा त्याना स्पर्श करण्यासाठीं धक्काबुक्की करू लागतो तरीहि नेताजी संतापत नाहींत काल नेताजी आमच्या कचेरींत आले. एका म्हाताऱ्या स्त्रीनें दाराशीं त्यांच्या पायास स्पर्श करण्याचा प्रयत्न केला नेताजींनीं लगेच तिला वर उठवलें आणि तिजपुढें मान लववून तिचा आशीर्वाद मागितला. 'माताजी' या शब्दानें त्यानीं तिला संबोधिलें. पुढें आमच्याशीं संभाषण करताना कलकत्त्यात आपल्या मागें एक मोठी प्रेमळ व आर्जवी आई आहे असें जेव्हा त्यानीं आम्हास सांगितलें तेव्हा आम्हा सर्वांचे डोळे अश्रूंनीं भरून आले.

## स्वातंत्र्याची सुप्रभात

मायक्रोफोनमधून बोलताना नेताजी मान ताठ व सरळ करून उभे राहतात. हावभाव फार थोडे करतात. वक्तृत्वात अती आवेश नसतो. गंभीर, शांत पण निश्चयी आवाजात ते एकामागून एक युक्तिवाद पुढें मांडतात. श्रोत्यातील प्रत्येक स्त्री-पुरुषाला सुभाषबाबू व्यक्तिशः आपल्याशींच बोलत आहेत असा भास होतो. नाटकी अभिनय ते करीत नाहींत. पाण्याचा घोट घेत नाहींत. कोणी पसा हालवीत नाहीं. स्मरण देण्याला हातात बारीक चिठ्ठीहि नसते. कागद मागेंपुढे करण्याचा गजरजाट नसतो. तुमचे पिताजी तुमच्यासमोर उभे आहेत, तुम्हाला आवाहन करीत आहेत, तुमच्याशीं युक्तिवाद करीत आहेत, तुमच्या स्वभावातील चागली बाजू विशेष जोर देऊन जागृत करीत आहेत असें समोर असलेल्या सुभाषबाबूंना पाहून वाटतें. त्यांच्याशीं आपण सहकार्य न करू, ते ज्या गोष्टी आपल्याजवळ मागतात त्या आपण त्याना न देऊ तर आपण क्षुद्र ठरू, स्वार्थी पशु अथवा समाजविरोधी प्राणी ठरूं असें प्रत्येकाला वाटतें. खरोखर, सुभाषबाबू जादुगारच आहेत. पण जादुगाराचा जादूटोणा मात्र त्याच्याजवळ मुळींच नाहीं.

उच्च व्यासपीठावरून त्याचा विचारौघ वाहूं लागला:—

"मी, माझें घर आणि स्वदेश सोडून सर्व प्रकारच्या संकटानीं ग्रासलेल्या प्रवासास का निघालो हें प्राजळपणें सागतों. मला ब्रिटिशाच्या एका तुरुगात सुरक्षितपणें ठेवण्यात आलें होते. त्यावेळीं ब्रिटिशाच्या त्या कैदेतून सुटण्यासाठीं सर्व धोका पत्करून प्रयत्न करण्याचा मीं निश्चय केला. मीं पूर्वी अकरा वेळा तुरुगात गेलों. तेथेंच राहाणें हें सवयीमुळें सोपें व अधिक सुरक्षित झालें होतें. तथापि हिंदी स्वातंत्र्याच्या कार्यासाठीं कोणताहि धोका पत्करून परदेशीं गेलें पाहिजे असें माझ्या मनानें घेतलें.

"माझें कर्तव्य पार पाडीत असताना मरण आलें तरी तें पत्करण्या पुरेसें सामर्थ्य माझ्या ठिकाणीं आहे कीं नाहीं हें ठरविण्यासाठीं प्रार्थना व चिंतन करण्यात मीं पुरे तीन महिने घालविले. हिंदुस्तानातून निसटायचें तर सर्वांत आधीं तुरुंगातून निसटलें पाहिजे तरच हिंदुस्तानातून निसटतों येईल ते म्हणून माझ्या सुटकेच्या मागणीसाठीं मीं अन्नसत्याग्रह सुरू केला. ब्रिटिश

अथवा आयर्लंडमध्यें अशा रीतीनें आपली सुटका करण्याची सक्ती ब्रिटिशावर करणें हें कोणाहि बद्याला साधलें नाहीं हें मला ठाऊक होतें; सरकारला नमविण्यासाठीं केलेल्या प्रयत्नात टेरेन्स मॅक्स्विनी आणि जतीनदास याना मृत्यु पत्करावा लागला हेंहि मला ठाऊक होतें, परंतु माझ्या हातून एक प्रचंड ऐतिहासिक कार्य कायमचें व्हावयाचें आहे अशी माझी खात्री झाली म्हणून मीं त्या प्रयत्नात उडी घेतली. सात दिवसाच्या अन्नसत्याग्रहानंतर अनपेक्षितपणें सरकारचा धीर सुटला आणि पुन्हा एकदोन महिन्यानीं मला परत तुरुंगात आणण्याचें योजून त्यानीं मला मोकळें केलें. पण त्यानीं मला पुनः पकडण्यापूर्वीच मी स्वतंत्र झालों.......

"मित्र हो ! मी १९२१ सालीं विद्यापीठ सोडल्यापासून स्वातंत्र्याच्या चळवळींत प्रत्यक्ष कार्य करीत आहे. गेल्या वीस वर्षांतील निःशस्त्र सत्याग्रहाच्या सर्व मोहिमात मी होतों. अनेकदा खटला न करता मला तुरुंगात डांबून ठेवण्यांत आलें आहे. सशस्त्र अथवा नि.शस्त्र क्रांतिकारक चळवळीशीं माझा संबंध असल्याच्या संशयावरून सरकार मला अटकेंत ठेवी. हा सर्व अनुभव विचारात घेतल्यानंतर मी असा निर्णय ठरविला, कीं हिंदुस्तानातच राहून आपणास जें काहीं करता येईल तेवढ्यानें ब्रिटिश सरकार हाकलेलें जाऊ शकणार नाहीं.......

"थोडक्यात सांगायचें म्हणजे स्वदेशात चालू असलेल्या स्वातंत्र्य लढ्याला बाहेरून पुरवणी मिळेल असा प्रयत्न करणें हा हिंदुस्तान सोडण्यात माझा हेतु होता......उलट ही जी पुरवणी मदत देशात चालू असलेल्या राष्ट्रीय लढ्याला बाहेरून मिळणें अत्यंत आवश्यक आहे ती सरोसर फार थोड्या प्रमाणात आम्ही देऊं शकलों. आमच्या स्वदेशांतील देशबांधवाना जी मदत हवी होती आणि अजूनहि हवी आहे ती दोन प्रकारची आहे:—नैतिक आणि साहित्य-विषयक. पहिल्यानें तुम्हांस विजय मिळेल अशी त्यांची नैतिक खात्री पटविली पाहिजे. दुसरें म्हणजे त्यांना बाहेरून लष्करी मदत मिळाली पाहिजे...

"जगाला आणि आमच्या शत्रूलाहि आमचें राष्ट्रीय स्वातंत्र्य आम्हीं कसें मिळविण्याचें योजिलें आहे हें जाहीरपणें मीं सांगण्याची वेळ आता आली आहे.

हिंदुस्तानाबाहेरील हिंदी लोक—विशेषतः पूर्व आशियातील लोक—लढाऊ फौज निर्माण करणार आहेत. हिंदुस्तानातील ब्रिटिश सैन्यावर हल्ला करूं शकेल इतके ते सैन्य भक्कम असेल. आम्ही ही गोष्ट घडवून आणली म्हणजे हिंदुस्तानात क्रांति होईल. ती फक्त नागरिकातच होणार नसून आज ब्रिटिश निशाणाखाली असलेल्या हिंदी सैन्यातहि होईल. ब्रिटिश सरकारवर हिंदुस्तानांतून आणि हिंदुस्तानाबाहेरून असा दुहेरी हल्ला झाला म्हणजे ब्रिटिश सरकार कोलमडून पडेल आणि त्यावेळीं हिंदी जनता पुन्हा स्वतंत्र होईल. म्हणून माझ्या योजनेप्रमाणें पहाता 'ॲक्सिस' राष्ट्रें हिंदुस्तानसंबंधानें कोणतें धोरण ठेवतात याचा मुळींच विचार करण्याची जरूरी नाहीं. जर हिंदुस्तानांतील व हिंदुस्तानाबाहेरील हिंदी लोक आपलें कर्तव्य पार पाडतील तर ब्रिटिश सत्तेला हिंदुस्तानातून हाकलून देऊन हिंदुस्तानांतील अडतीस कोटी लोकांचें स्वातंत्र्य संपादन करू शकतील...मित्रहो ! पूर्व आशियातील तीस लक्ष हिंदी लोकाची घोषणा 'अखंड युद्धासाठी अखंड संघटना' ( टोटल् मोबिलायझेशन फॉर टोटल् वॉर ) ही असली पाहिजे......या अखंड संघटनेंतून निदान तीन लक्ष सैनिक आणि तीन कोटी डॉलर फंड मिळेल अशी मी अपेक्षा करतो. तसेंच १८५७ च्या पहिल्या स्वातंत्र्य युद्धात झाशीच्या शूर राणीनें तरवार हातीं धरली त्याप्रमाणें मृत्यूला आव्हान देऊन तरवार गाजविणाऱ्या हिंदी स्त्रियांची एक पलटण तयार व्हावी अशीहि माझी इच्छा आहे...

"हिंदुस्तानातील आमचे देशबांधव यावेळीं संकटात सापडले असून ते दुसऱ्या आघाडीची मागणी करीत आहेत. आपण सर्व बाजूंनीं पूर्व आशियात एकत्र होऊ या. म्हणजे हिंदी स्वातंत्र्यासाठीं दुसरी आघाडी—खरोखुरी दुसरी आघाडी—निर्माण करण्याचें वचन मी देतों."

नेताजी बोलत असता पावसाचा वर्षाव चालू झाला. नेताजींनीं एक वाक्य उच्चारलें, "उठू नका, सभा सोडू नका. निर्धारानें बसून रहा. पाऊस आपल्याला भेडसावू शकत नाहीं." एकहि मनुष्य जागचा हालला नाहीं. प्रत्येकजण भिजून चिंब झाला होता पण कोणीहि कचरला नाहीं. आमची शिस्त विशेषतः कडेवर मुलें घेतलेल्या स्त्रियांची शिस्त पाहून नेताजींना आश्चर्य वाटलें.

नेताजींचा शरीररक्षक होण्याची कामगिरी पी—कडे दिली आहे.

मी राणी ऑफ झाशी पलटणींत सामील होत आहे. किती मस्त गोष्ट ही ! आम्ही हातात हत्यारें घेणार !

पी—, मी फारशी मागें राहिल्यें असे तुला आढळून येणार नाहीं.

१२ जुलै, १९४३

आय्. आय्. एल्. च्या स्त्रीशाखेनें एक स्त्रियाची सभा भरविली. तिजपुढे नेताजींचें भाषण झाले. आमच्या प्रिय नेत्याच्या प्रभावी जबड्यातून बाहेर पडणाऱ्या प्रत्येक शब्दाबरोबर श्रोतृवर्ग आंदोलत होता. दहाबारा मैलावरून स्त्रिया सभेला आल्या होत्या. नेताजी येण्यापूर्वी दोन तास सभेचा दिवाणखाना गच्च भरून गेला होता.

आम्ही पुष्पहारांनीं त्याना घुसमटून टाकलें. आम्हीं क्रांतीचीं गीतें म्हटलीं. नेताजींचे भाषण झालें. झाशीची राणी पलटण आणि रेडक्रॉस यांसाठीं सेविकांची मागणी त्यांनीं केली. एका गुजराती स्त्रीनें आपले सर्व दागदागिने देऊन टाकले. बांगड्या, आंगठ्या, हार जें जें सर्व काहीं तिच्या अंगावर होते तें तें सर्व स्त्रीसंघटनेच्या कार्यासाठीं नेताजींना तिनें अर्पण केलें.

नेताजी म्हणाले,

" भगिनींनो,

" आमच्या स्वातंत्र्याच्या चळवळींत विशेषतः गांधीजींच्या नेतृत्वाखालीं १९२१ पासून कॉंग्रेसचा पुनर्जन्म झाल्यानंतरच्या गेल्या बावीस वर्षांत आमच्या देशातील स्त्रियांनीं केवढा भाग घेतला हें तुम्हा सर्वांना माहीत आहे. केवळ कॉंग्रेसच्या निःशस्त्र प्रतिकाराच्या चळवळींतच नव्हे तर, गुप्त क्रांतिकारक चळवळींतहि स्त्रियांनीं उमदें कार्य केलें आहे...खरोखर, सार्वजनिक कार्यक्षेत्रातील अथवा राष्ट्रीय कार्यांतील एकहि जागा अशी नाहीं, कीं आमच्या राष्ट्रीय झगड्याचा भार पुरुषाच्या बरोबरीनें स्त्रियांनीं आनंदानें आणि शौर्यानें उचलला नाहीं. खरोखर माझ्या या म्हणण्यात थोडीहि अतिशयोक्ति नाहीं. खेड्याखेड्यांतून खाण्यापिण्यावाचून दौरे काढण्याचें काम असो, लागोपाठ सभातून भाषणें

करण्याचें काम असो, घराघरातून स्वातंत्र्याच्या संदेश देण्याचें काम असो, निवडणुकीच्या मोहिमा चालविण्याचें काम असो, सरकारी अधिकाऱ्यांचे हुकूम तोडून सार्वजनिक रस्त्यांतून मिरवणुका नेण्याचे काम असो, ब्रिटिश पोलिसांनीं केलेल्या निर्दय लाठीमारास तोंड देण्याचें काम असो, तुरुंग, छळ, अपमान, पाणउतारा या सर्वांस धैर्यानें तोंड देण्याचा प्रसंग असो, स्त्रिया सर्व प्रसंगीं तयार होत्या. आमच्या शूर भगिनींनीं गुप्त क्रांतिकारक चळवळींतहि प्रमुख भाग घेतला आहे. प्रसंग आला असता आपल्या भाईप्रमाणें आपणहि बंदुक चालवूं शकतो हें त्यांनी दाखविलें आहे......आज मी तुमच्यावर संपूर्ण विश्वास व्यक्त करीत असलों तर त्याचें कारण आमच्या स्त्रियांची पात्रता केवढी आहे याची मला जाणीव आहे हें होय आणि म्हणून थोडीसुद्धा अतिशयोक्ति न करतां मी म्हणूं शकतों, कीं आमच्या भगिनींना सहन होणार नाहींत अशा कोणत्याहि यातना असूं शकतच नाही.

"इतिहास आपणांस शिकवतो, कीं ज्याप्रमाणें प्रत्येक साम्राज्याचा उदय होतो तसाच त्याचा अस्तहि होतो आणि आतां या भूगोलावरून नष्ट होऊन जाण्याची वेळ ब्रिटिश साम्राज्याला आली आहे. जगाच्या या विभागांतून हें साम्राज्य कसें नष्ट झालें हें आपण आपल्या डोळ्यांनीं पहात आहों. असेंच तें साम्राज्य जगाच्या आणखी एका भागांतून—हिंदुस्तानातूनहि नष्ट होईल......

"या सभेत अथवा इतर कोठेंहि जर कोणी अशी स्त्री असेल, कीं स्त्रियांना खांद्यावर बंदुक घेता येत नाहीं अशी तिची समजूत असेल तर तिनें आमच्या इतिहासाचीं पानें उलटून पहावीं असें मी तिला सुचवतों. भूतकाळात आमच्या शूर स्त्रियांनीं काय कर्तृत्व गाजविलें आहे हें समजून घ्या. १८५७ च्या क्रांतींत—पहिल्या हिंदी स्वातंत्र्ययुद्धात—झांशीच्या शूर राणीनें केवढें शौर्य गाजविलें आहे तें पहा. या राणीनें तरवार उपसून घोड्यावर बसून आपल्या अनुयायांना रणांगणावर मार्गदर्शन केलें. आमच्या दुर्दैवानें ती राणी ठार झाली. तिला अपयश आलें आणि तिला अपयश आल्यामुळें हिंदुस्तानच्या पदरांत अपयश पडलें. पण १८५७ सालीं या महाराणीनें पत्करलेलें कार्य आपण परिपूर्ण केलें पाहिजे......

" म्हणून हिंदी स्वातंत्र्याच्या या शेवटच्या युद्धांत आम्हांला झांशीची एक राणी पुरणार नसून कित्येक हजार स्त्रियांनीं झांशीच्या राणीची भूमिका घेतली पाहिजे. तुम्ही किती बंदुका घेऊन जाल, किती गोळ्या झाडाल हा मुद्दा महत्त्वाचा नाहीं. तुम्हीं जें शूर उदाहरण घालून द्याल त्याचा होणारा नैतिक परिणाम हा विशेष महत्त्वाचा आहे. "

दोन आझाद शाळांतून इन्स्पेक्टर्सचें शिक्षण देण्यांत येत असून निरनिराळ्या छावण्यांत या इन्स्पेक्टरांना नेमावयाचें आहे. एक शाळा शोनान येथें आहे आणि दुसरी पेनांग येथें आहे. विद्यार्थिनींच्या दोन तुकड्यांचें शिक्षण पुरें झालें. मी तिसऱ्या तुकडींत जात आहें. स्त्रियांना लष्करी शिक्षण देऊं नये असें आमच्या जुन्या पुढाऱ्यांचें मत आहे पण तें नेताजींनीं बाजूस सारलें आहे. नेताजी हे खरेखुरे आधुनिक गृहस्थ आहेत. त्यांचा दृष्टिकोन व्यापक आणि प्रगतिपर आहे.

## २५ जुलै, १९४३

आज आमच्याकडे मिसेस टी—आणि मिस् एस्—चहाला आल्या होत्या. मिस्. एस्—पेनँगहून आली असून तिनें पेनँगमधून ब्रिटिश पळून गेले त्यावेळीं आलेल्या अनुभवांची हकिगत सांगितली. सर्व आशियाटिकांना या ब्रिटिशांनीं, चढाई करून येणाऱ्या जपान्यांच्या जबड्यांत सोडून दिलें.

तिनें सांगितलेली हकिगत अशी:—

" ११ डिसेंबर रोजीं मी आंथरुणांतून उठायचीच होतें तोंच सुमारें सात जपानी बॉबफेक्या विमानांनीं आमच्या शहरावर हल्ला केला. त्या हल्ल्यांत उध्वस्त झालेल्या घरांची संख्या फारोशी अगणित म्हणावी लागेल. फायर ब्रिगेडच्या ठाण्यावर अगदीं सरळ हल्ला झाला आणि त्यामुळें आगी विझविणारें यंत्र खलास झालें. आगी पेटून पेटून आपोआप विझणें एवढाच मार्ग उरला. जिवंत माणसांनीं आगीसमोर बघावें आणि आपली मालमत्ता जळून जात असतां तिचें दर्शन घ्यावें अशी परिस्थिति झाली. रस्तोरस्तीं जो माल दांगता आला असता त्याचीहि सर्वांशी झाली. सर्व प्रकारचे मजूर पळून गेले होते.

रस्त्यावर प्रेतें पडलीं असून तीं कुजल्यामुळें घाण सुटली होती. पारिया जातीचे कुत्रे कुजणाऱ्या प्रेताचे हात आणि पाय कुरतडून खात होते हें दृश्य मीं पाहिलें. शेतामध्यें लष्ठ घुशी दिसतात तेवढ्या लष्ठ घुशी रस्त्यावर नाचत आल्या होत्या. कोसळून पडलेल्या घराचा आश्रय सोडून रस्त्यावर पडलेला गळाठा खाण्यासाठीं त्या आल्या होत्या. बहुतेक दुकानें बंद पडलीं. बाजारात कोणतीहि वस्तु विकत मिळणेंच अशक्य झालें.

" यामागून चोर आले. ते कोठून आले हें कळत नव्हतें; पण एकदम सर्वत्र सारखे पसरले. पोलीस अदृश्य झाले. गुंडांच्या टोळ्यानीं अनेक क्षेत्रें व्यापून टाकलीं. बाहेर हिंडणें फिरणें अशक्यच होतें. होड्याची जा–ये सुद्धा बंद होती. झाडूवाले पळाले. विष्ठा घराघरातून ढिगाढिगानीं साचली. खरोखर आम्ही नरकात पडलों होतों. "

" सर्वात वाईट परिस्थिति ही, कीं लोकाना मदत करण्यासाठीं एकही सरकारी अधिकारी हजर नव्हता. ब्रिटिश नागरिक गावाच्या एका कोपऱ्यात एकत्र झाले असून इतर जगापासून विभक्त असें आयुष्य घालवीत होते. बदुका आणि पिस्तुलें याच्या साहाय्यानें स्वतःचा बचाव करीत असून गावातील जो मालमसाला उपलब्ध होता त्याची त्यानीं कोंडी केली होती. तिसऱ्या दिवशीं गाव खालीं करण्याचें ठरले. पण कोणाहि आशियाटिकाला गाव सोडण्याची परवानगी मिळाली नाहीं. स्थानिक लष्करी आणि सरकारी अधिकाऱ्यानीं शुद्ध रक्ताच्या ब्रिटिश रक्ताच्या नागरिकानाच गाव सोडता येईल असें फर्मान काढलें. युरेशियन–म्हणजे हिंदी व युरोपीय याच्या सबधापासून उत्पन्न झालेले प्रजाजन— त्यानाहि गाव सोडण्यास परवानगी नव्हती. अनेक इग्रज व्यापाऱ्यांनीं कित्येक युरेशियन स्त्रियानीं विवाह केले होते. अशा स्त्रिया मला माहीत आहेत. मिसेस बी—ही माझी मैत्रीण होती. तिच्या नवऱ्यानें तिला सोडून पलायन केलें. का, तर ती युरेशियन असल्यामुळें तिला गाव सोडण्यास परवानगी नव्हती म्हणून. आम्हा हिंदी, चिनी, मलायन आणि युरेशियन नागरिकाचे डोळे यामुळें खडखडीत उघडले. न्याय, लोकशाही आणि समता याविषयींच्या मारल्या जाणाऱ्या गप्पा म्हणजे आमची निव्वळ फसवणूक होती. जपानी आमच्यावर

भयंकर अत्याचार करतील हें ठाऊक असूनहि आम्हाला सोडून हे ब्रिटिश लोक पळून गेले . . . "

मलायात सर्वत्र ऐकू येणाऱ्या कथापैकींच ही एक कथा आहे. साम्राज्य उध्वस्त होण्याच्या घटकेला ब्रिटिश वसाहतवाल्याचें जें हें वर्तन घडले त्यावरून तो माणुसकीचा एक अत्यत घाणेरडा नमुना आहे ही गोष्ट लक्षात आली. जे प्रचड बलशाली होते ते अशा प्रकारे धूळ खात पडले. त्याची आठवण काढून रडणारा अथवा त्याच्या दुर्दैवाबद्दल वाईट वाटणारा असा एकादा प्रामाणिक कुत्राहि मिळणार नाहीं.

*१ ऑगस्ट, १९४३*

लीगचे सभासद वाढविण्याची मोहीम अत्यत वाढत्या उत्साहाने सुरू आहे अशा बातम्या आमच्या कचेरींत रोज येत आहेत. एकट्या मलायात आता दहा सरकारी शाखा आणि पन्नास उपशाखा आहेत. एक लक्ष सत्तर हजार सभासदसख्या झाली आहे.

मलायाच्या सर्व भागातून फौजेंत सामील होण्यासाठीं स्वयसेवकाचे अर्ज येत आहेत. नेताजींनीं बजावलें आहे, कीं सर्व सैन्य स्वयसेवकाचेंच पाहिजे, सक्ती होता कामा नये. रिक्रूट मिळविण्यासाठीं सामाजिक दडपणहि येता कामा नये. त्याचें हें मत खरें आहे.

आमच्या स्वातन्त्र्य सैन्यातील शिपाई अगदीं वेचून व निवडून घेण्याची विशेष जरुरी आहे. हिंदी सैनिकांनीं आझाद हिंद फौजेंत सामील व्हावें आणि रणागणावर आल्यावर आझाद हिंद फौज सोडून ब्रिटिश सैन्याकडे पळून जावें अशी सूचना दिल्ली रेडिओ देत आहे. आमच्या सैन्यात असे विश्वासघातकी नसोत, नाराज योद्धा हा परिणामीं विश्वासघातकी ठरतो.

पैशाच्या स्वरूपात व वस्तूच्या स्वरूपांत दूरदूरच्या वसाहतींतून रोजच्या रोज देणग्या येत आहेत. सर्व ठिकाणीं आशावाद व उत्साहयुक्त हालचाल सुरू आहे याबद्दल मुळींच शका नाहीं. आमच्या चळवळीचा सर्व आधार नेताजी

हेच बनले आहेत. पण ते जेथें जेथें जातात तेथें तेथें एक गोष्ट पुनः पुन्हा आग्रहानें सांगत असतात;—"आधुनिक काळात आपण पूजामूर्ति बनवीत नाहीं. एकाच टोपलींत सर्व अंडीं ठेवणें बरें नसतें. कोणत्याहि एका व्यक्तीपेक्षां एकंदर चळवळ ही अधिक मोठी आहे हें आपण लक्षात ठेवलें पाहिजे. एका व्यक्तीची हुकुमशाही आपल्या येथें नाहीं. एकाच रणांगणावर खांद्याला खांदा लावून लढणारे आपण सर्व सखे आहोंत."

१५ तारखेस नेताजी शोनानला येतील त्यावेळीं मोठा मेळावा भरविण्याचें ठरलें आहे. ९ तारखेस हिंदुस्तानातील क्रांतीला पहिलें वर्ष पुरें होतें.

१० ऑगस्ट १९४३

९ ऑगस्ट या हिंदुस्तानातील क्रांतीच्या प्रथम वाढदिवशीं मलाया आणि पूर्व आशिया यांच्या कोनाकोपऱ्यापर्यंत सर्वत्र शेकडों सभा झाल्या. शोनानमध्यें आम्हीं प्रचंड सभा भरविली. गांधीजी, जवाहरलाल, सरदार वल्लभभाई यांचे फोटो सभास्थानीं ठेवले होते.

१५ ऑगस्ट, १९४३

फेरेर पार्कमध्यें आज नेताजींच्या भाषणाला तीस हजार श्रोतृसमुदाय हजर होता. 'आझाद हिंद झिंदाबाद' या आरोळ्यांनीं आकाश फाटून गेलें. नेताजी बोलूं लागलेः—

"ब्रिटिशांनीं हिंदुस्तान सोडावें अशी मागणी करण्याच्या गुन्ह्याबद्दल महात्मा गांधींना तुरुंगात टाकण्यात आलें. त्या गोष्टीला आता एक वर्ष होऊन गेलें. तेव्हापासून आतापर्यंत नि:शस्त्र कायदेभंगाची चळवळ आणि घातपाताची चळवळ मुळींच कमी न होता एकसारखी वाढत आहे; पण अजून आपणास स्वातंत्र्य मिळालें नाहीं. जोंवर आपण हिंदी-ब्रह्मी सरहद्दीवर दुसरी आघाडी उघडून हिंदी जनतेला व ब्रिटिशांच्या हिंदी सैन्याला ब्रिटिश आणि त्यांचे दोस्त यांच्याविरुद्ध शस्त्र उपसण्याला आवाहन करीत नाहीं तोंवर हिंदी जनतेचा स्वातंत्र्यलढा यशस्वी होणार नाहीं. आजच्या या श्रोतृसमुदायास माझे

भयंकर अत्याचार करतील हें ठाऊक असूनहि आम्हांला सोडून हे ब्रिटिश लोक पळून गेले . . . ”

मलायांत सर्वत्र ऐकूं येणाऱ्या कथांपैकींच ही एक कथा आहे. साम्राज्य उध्वस्त होण्याच्या घटकेला ब्रिटिश वसाहतवाल्यांचें जें हें वर्तन घडलें त्यावरून तो माणुसकीचा एक अत्यंत घाणेरडा नमुना आहे ही गोष्ट लक्षांत आली. जे प्रचंड बलशाली होते ते अशा प्रकारें धूळ खात पडले. त्यांची आठवण काढून रडणारा अथवा त्यांच्या दुर्दैवाबद्दल वाईट वाटणारा असा एकादा प्रामाणिक कुत्राहि मिळणार नाहीं.

*१ ऑगस्ट, १९४३*

लीगचे सभासद वाढविण्याची मोहीम अत्यंत वाढत्या उत्साहानें सुरू आहे अशा बातम्या आमच्या कचेरींत रोज येत आहेत. एकट्या मलायांत आतां दहा सरकारी शाखा आणि पन्नास उपशाखा आहेत. एक लक्ष सत्तर हजार सभासदसंख्या झाली आहे.

मलायाच्या सर्व भागांतून फौजेंत सामील होण्यासाठीं स्वयंसेवकांचे अर्ज येत आहेत. नेताजींनीं बजावलें आहे, कीं सर्व सैन्य स्वयंसेवकांचेंच पाहिजे, सक्ती होता कामा नये. रिक्रूट मिळविण्यासाठीं सामाजिक दडपणहि येतां कामा नये. त्यांचें हें मत खरें आहे.

आमच्या स्वातंत्र्य सैन्यांतील शिपाई अगदीं वेचून व निवडून घेण्याची विशेष जरुरी आहे. हिंदी सैनिकांनीं आझाद हिंद फौजेंत सामील व्हावें आणि रणांगणावर आल्यावर आझाद हिंद फौज सोडून ब्रिटिश सैन्याकडे पळून जावें अशी सूचना दिल्ली रेडिओ देत आहे. आमच्या सैन्यांत असे विश्वासघातकी नकोत. नाराज घोडा हा परिणामीं विश्वासघातकी ठरतो.

पैशाच्या स्वरूपांत व वस्तूंच्या स्वरूपांत दूरदूरच्या वसाहतींतून रोजच्या रोज देणग्या येत आहेत. सर्व ठिकाणीं आशावाद व उत्साहयुक्त हालचाल सुरू आहे याबद्दल मुळींच शंका नाहीं. आमच्या चळवळीचा सर्व आधार नेताजी

हेच बनले आहेत. पण ते जेथें जेथें जातात तेथें तेथें एक गोष्ट पुनः पुन्हा आग्रहानें सांगत असतात;—"आधुनिक काळांत आपण पूजामूर्ति बनवीत नाहीं. एकाच टोपलींत सर्व अंडीं ठेवणें बरें नसतें. कोणत्याहि एका व्यक्तीपेक्षां एकंदर चळवळ ही अधिक मोठी आहे हें आपण लक्षात ठेवलें पाहिजे. एका व्यक्तीची हुकुमशाही आपल्या येथें नाहीं. एकाच रणांगणावर खांद्याला खांदा लावून लढणारे आपण सर्व सखे आहोंत."

१५ तारखेस नेताजी शोनानला येतील त्यावेळीं मोठा मेळावा भरविण्याचें ठरलें आहे. ९ तारखेस हिंदुस्तानांतील क्रांतीला पहिलें वर्ष पुरें होतें.

### १० ऑगस्ट १९४३

९ ऑगस्ट या हिंदुस्तानांतील क्रांतीच्या प्रथम वाढदिवशीं मलाया आणि पूर्व आशिया यांच्या कोनाकोपऱ्यापर्यंत सर्वत्र शेकडों सभा झाल्या. शोनानमध्यें आम्हीं प्रचंड सभा भरविली. गांधीजी, जवाहरलाल, सरदार वल्लभभाई यांचे फोटो सभास्थानीं ठेवले होते.

### १५ ऑगस्ट, १९४३

फेरेर पार्कमध्यें आज नेताजींच्या भाषणाला तीस हजार श्रोतृसमुदाय हजर होता. 'आझाद हिंद झिंदाबाद' या आरोळ्यांनीं आकाश फाटून गेलें. नेताजी बोलूं लागले:—

"ब्रिटिशांनीं हिंदुस्तान सोडावें अशी मागणी करण्याच्या गुन्ह्याबद्दल महात्मा गांधींना तुरुंगांत टाकण्यात आलें. त्या गोष्टीला आतां एक वर्ष होऊन गेलें. तेव्हांपासून आतांपर्यंत निःशस्त्र कायदेभंगाची चळवळ आणि घातपाताची चळवळ मुळींच कमी न होतां एकसारखी वाढत आहे; पण अजून आपणास स्वातंत्र्य मिळालें नाहीं. जोंवर आपण हिंदी-ब्रम्ही सरहद्दीवर दुसरी आघाडी उघडून हिंदी जनतेला व ब्रिटिशांच्या हिंदी सैन्याला ब्रिटिश आणि त्याचे दोस्त यांच्याविरुद्ध शस्त्र उपसण्याला आवाहन करीत नाहीं तोंपर्यंत हिंदी जनतेचा स्वातंत्र्यलढा यशस्वी होणार नाहीं. आजच्या या श्रोतृसमुदायांत माझे

अनेक मुसलमानबांधव आहेत हें पाहून मला अत्यानंद होतो. माझें त्यांनीं जें अंतःकरणपूर्वक स्वागत केलें आणि हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीला त्यानीं जी मोठी थैली देऊं केली तीबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें...सगळ्या जगानें आणि आमच्या शत्रूंनीं आतां लक्षात घ्यावें, कीं धर्म अथवा जाति यांचा विचार न करता पूर्व आशियांतील सर्व हिंदी लोक एकजूट झाले असून आपल्या सर्वांच्या मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठीं लढण्याचा दृढ निर्धार त्यानीं केला आहे."

पुढील दोन महिन्यात आझाद हिंद फौजेंतील बराचसा भाग प्रथम ब्रह्मदेशाच्या वाटेस लागेल; तेथून पुढें तो हिंदुस्तानास जाईल असें नेताजींनीं जाहीर केलें. त्याच्या मागोमाग आय्. आय्. एल्., चें ठाणेंहि रगूनला जाईल. याचा अर्थ असा कीं पी—आणि मी यानींहि बाधाबाध केली पाहिजे. ठीक, नेताजी आम्ही तयार आहों.

गांधींचे चिटणीस महादेव देसाई याच्या, आगाखान बंगल्यांतील खास तुरुंगात घडलेल्या मृत्यूचा सुभाषबाबूंनीं उल्लेख केला. त्या मृत्यूचा याददिवस सर्व हिंदुस्तानभर साजरा होत होता. महादेवभाईंची व्यक्तिशः ओळख असलेल्या एका गुजराती व्यापाऱ्यानें महादेवभाईंचा स्वार्थत्याग आणि गांधीजींबद्दल त्याना वाटणारी भक्ति याची थोरवी वर्णन केली. जॉन्सन आणि बॉस्वेल याचे जसे संबंध होते तसे महात्मा व महादेव याचे होते असें त्यानीं सांगितलें. ज्याच्या संबंधानें ब्रिटिशावर सूड उगवावयाचा आहे त्यात महादेवभाईंच्या नावाची आता भर पडली आहे—चलो दिल्ली!

## २५ ऑगस्ट, १९४३

आज आझाद हिंद फौजेचें नेतृत्व नेताजींनीं अधिकृतपणें स्वीकारलें. त्या दिवसाचें विशेष आज्ञापत्र म्हणून त्यानीं जो खलिता जाहीर केला तो फारच उत्कृष्ट आहे.

" हिंदी स्वातंत्र्याची चळवळ यशस्वी होण्याच्या दृष्टीनें आणि आझाद हिंद फौज यशस्वी व्हावी म्हणून आमच्या सैन्याचें प्रत्यक्ष आधिपत्य मीं आज स्वीकारलें आहे.

# स्वातंत्र्याची सुप्रभात

" मला याबद्दल आनंद आणि अभिमान वाटतो. हिंदी स्वातंत्र्यासाठीं लढणाऱ्या सैन्याचा सेनापति होण्याहून दुसरा कोणताच अधिक मोठा मान हिंदी माणसाला मिळूं शकणार नाहीं......

"माझ्या अडतीस कोटी बाधवाचा मी एक सेवक आहें. या अडतीस कोटी बांधवाचे हितसंबध सुरक्षित रहावे व प्रत्येक हिंदी माणसाला आमच्यावर संपूर्ण विश्वास ठेवणे योग्य वाटावें अशा प्रकारें माझें कर्तव्य पार पाडण्याचा निश्चय मीं केला आहे. निर्भेळ राष्ट्रवाद, परिपूर्ण न्याय आणि नि पक्षपात याच्याच पायावर हिंदी स्वातत्र्याच्या सैन्याची उभारणी करता येईल.

"आमच्या मातृभूमीच्या स्वातत्र्यासाठीं लढ्याव्या लागणाऱ्या आगामी लढ्यात......आझाद हिंद फौजेला फार महत्त्वाची कामगिरी करावी लागणार आहे. ही कामगिरी पार पाडण्यासाठीं हिंदी स्वातत्र्य हें एकच ध्येय आणि त्या स्वातत्र्याच्या कार्यांत कर्तृत्व गाजवावें अथवा मरावे हा एकच निर्धार या भूमिकेवर आपण एकजूट झालें पाहिजे. आपण रणांगणावर एकदा उभे राहिलों म्हणजे आझाद हिंद फौज ही दगडी भिंतीसारखी अभेद्य आहे असा अनुभव शत्रूस आला पाहिजे. आझाद हिंद फौज चाल करून येऊं लागली म्हणजे सडी वसविण्याच्या वाफेच्या रुळाप्रमाणें तिने आपल्या पायाखालीं शत्रूस जमीनदोस्त केलें पाहिजे.

आमचें कार्य सोपे नव्हे. युद्ध दीर्घकाळ चालेल आणि तें मोठें निकराचें होईल, पण आमची बाजू अजिंक्य आहे असा मला पूर्ण विश्वास वाटतो. अखिल मानव जातीची एकपचमाश लोकसंख्या असे जे अडतीस कोटी हिंदी लोक त्यांना स्वतन्त्र होण्याचा हक्क आहे. हा हक्क प्राप्त करून घेण्यासाठीं त्याची किंमत देण्यास ते तयार आहेत. म्हणून स्वातत्र्य हा जो आमचा जन्मसिद्ध हक्क तो हिरावून घेणारी एकहि शक्ति यापुढे या भूतलावर रहाणार नाहीं...

"भाईहो ! आमचें कार्य सुरू झालेंच आहे. 'दिल्लीकडे चला' हा घोष उच्चारीत राहून नव्या दिल्लींतील व्हाइसरॉय-गृहावर राष्ट्रीय निशाण चढेपर्यंत व हिंदुस्तानच्या राजधानींतील प्राचीन लाल किल्ल्यात आझाद हिंद फौजेची कवायत होईपर्यंत आपण कष्टव व दृढत राहिले पाहिजे."

आझाद हिंद फौजेच्या साहाय्यास लागणारे जे दुभाषी त्याचें शिक्षण करण्याकरिता शोनान, कौलालंपूर आणि सालेंतार या ठिकाणीं तीन केंद्रें उघडण्यात आलीं आहेत. तेथें दोनशें सद्‌गृहस्थाना लष्करी शिक्षण व 'तज्ज्ञतेचें' शिक्षण देण्यात येतें.

६ सप्टेंबर, १९४३

या महिन्याच्या पहिल्या तारखेस फौजेच्या रिक्रूटाना शिक्षण देण्याकरितां एक छावणी उघडण्यात आली.

नेताजी आपल्या बरोबरच्या मंडळींसह कौलालंपूरला गेले असता मीहि त्याचेबरोबर गेलें होतें. प्रवासात प्रत्येक स्टेशनावर हिंदी लोक प्लॅटफॉर्मवर गर्दी करून येत आणि चळवळीसाठीं थैल्या अर्पण करीत. कौलालंपूर येथें पंधरा मिनिटेंपर्यंत गाडी थांबविली तेव्हा नेताजींना गर्दींतून खालीं उतरणें शक्य झाले. स्थानिक पुढाऱ्याना उद्देशून सुभाषबाबू तेथें म्हणाले, "ही विभूतिपूजा तुम्ही चालू देता कामा नये. परिणामीं ही विभूतिपूजा हा आपल्या चळवळीचा शाप ठरेल. लोकाना आपल्या कार्याचें स्वरूप कळलें पाहिजे, आणि त्यासाठीं आत्माहुति देण्याची तयारी त्यानीं ठेवली पाहिजे. आमचा उत्साह याच मार्गानीं गेला पाहिजे. पुढारी हा अनेक घटनापैकीं एक आहे. पुढारी येतील आणि जातील पण चळवळीचा प्रवाह सतत चालू राहिला पाहिजे."

श्रोत्यातील एकजणानें उत्तर केलें, "तुम्हीं चळवळींत नवीन जीव घातला. जनतेच्या अंत:करणातील स्वातंत्र्याकांक्षेचें तुम्ही उत्तम प्रतीक आहा, म्हणून जनता तुमचें स्वागत करण्याला उत्साहाने पुढें येते."

जाहीर सभेमध्ये थैल्या व देणग्या देण्याच्या कामात भरपूर एक तास खर्च झाला. नतर नेताजी बोलले. त्यामुळें श्रोत्याच्या अंत:करणात विजेचा संचार झाला. कौलालंपूरला एवढी सभा पूर्वी कधींच झाली नव्हती. सभेतील उत्साह अमर्याद होता.

नेताजी म्हणाले,

शोनानमधील टाउन हॉल मैदानावर चाललेली आझाद हिंद फौजेची कवाईत सुभाषबाबू पाहात आहेत

"ईश्वराच्या नावानें मी शपथ घेतों ! हिंदुस्थानच्या रा। यासाठी मी लढेन

" कमींत कमी स्वार्थत्याग करण्याचे दिवस संपले. आतां आपल्यापैकीं प्रत्येकानें जास्तींत जास्त स्वार्थत्याग करण्याची वेळ आली आहे. हा स्वार्थत्याग आमचें सैन्य पूर्ण आधुनिक बनविण्यासाठीं जरूर असणारा पैसा, इतर सर्व साहित्य व मनुष्यजीवित या सर्व स्वरूपांत आम्हांला मिळाला पाहिजे.

" जगांत जोंवर शांतता होती तोंवर हिंदी लोकांना शस्त्रें मिळवून त्यांच्या साहाय्यानें लढणे हें जवळजवळ अशक्यच होतें. हिंदुस्तानांतील लोकांना तर ती गोष्ट अशक्यच होती. पण चार पाच वर्षांपूर्वी अशक्य ठरलेली ही घटना या युद्धानें शक्य करून दाखविली आहे. तुम्हाला आतां शस्त्रें हवीं असतील तर ती हिंदुस्तानात मिळणार नाहींत पण हिंदुस्तानाबाहेर खास मिळतील. आधुनिक सैन्य उभारून त्याला सर्व आधुनिक शस्त्रसाहित्यांनीं सज्ज बनविण्याची इच्छा तुम्हांला असेल तर तें आज शक्य आहे. म्हणून हें युद्ध ही ईश्वरानें दिलेली संधि आहे असें मी समजतों. डोमिनियन स्टेटस नव्हे अथवा वसाहतीचें स्वराज्य नव्हे तर परिपूर्ण स्वातंत्र्य मिळविण्याची अद्वितीय सुसंधि या युद्धानें आम्हाला दिली आहे..."

" ज्या ठिकाणीं तरुण हिंदी लोकाना आगामी स्वातंत्र्यलढ्याचें शिक्षण मिळूं शकेल अशी एक छावणी तुम्ही कौलालंपूरच्या मध्यभागीं स्थापन केली आहे याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों—मलायांत जागोजाग छावण्या आहेत. त्या पूर्वी ब्रिटिश सैन्यानें व्यापल्या होत्या. त्या जागीं आतां आमच्या छावण्या स्थापन झाल्या आहेत. हें पाहून माझ्या मनांत विचार येतो कीं, आम्ही जेव्हां हिंदुस्तानांत जाऊं तेव्हां आमच्या राष्ट्रीय सैन्यासाठीं रहाण्याच्या बराकी आम्हांला आयत्या मिळतील. त्या आम्हाला नवीन बांधाव्या लागणार नाहींत. कलकत्त्यापासून मुंबईपर्यंत आणि रावळपिंडीपासून मद्रासपर्यंत सुंदर बराकी बांधलेल्या आहेत. आज त्या हिंदी सैनिकांना न मिळतां ब्रिटिश टॉमीजना मिळतात. पण या सुंदर बराकी आम्ही आमच्या हिंदी राष्ट्रीय सैन्यासाठीं घेऊं. त्या बदली ब्रिटिशांना त्यांच्या उपयोगासाठीं सगळे तुरुंग आम्ही परत करूं असें मी वचन देतों."

आझाद हिंद फौजेच्या शिक्षणछावणीस आम्हीं भेट दिली. सुमारें

सातशे सैनिकांचें शिक्षण चालले होते. त्याचा उत्साह भरपूर आहे. त्याचें शिक्षण पाहून नेताजी खूप झाले. गेल्या शभर वर्षांत ज्याच्या बापदादानीं कधींच बंदुक हाताळली नाही अशा कारकुनानी आणि व्यापाऱ्यानीं लष्करी शिक्षण घेण्यात इतके कौशल्य दाखवावे ही गोष्ट कल्पनातीत होती. अत करणातील ईर्ष्येनें या गोष्टी घडत असतात. ब्रिटिशानीं हिंदुस्तानातील लष्करी जमाती आणि बिनलष्करी जमाती अशी जी बाष्कळ बडबड आजवर केली ती केवळ हिंदी लोकाना लष्करी ज्ञान मिळू नये, भरवशाच्या अशा काहीं लाचार घराण्याच रासीव कुरण असे हिंदी सैन्याचें स्वरूप रहाव यासाठीं घेतलेल्या बुरख्यासारखी होती. पूर्व आशियात आम्ही हा भ्रमाचा भोपळा फोडून टाकला आहे.

### २८ सप्टेंबर, १९४३

बहादुर शहाच्या—स्वतत्र हिंदुस्तानच्या शेवटच्या बादशहाच्या—कबरेजवळ रविवार ता २६ रोजीं मोठा गभीर व उठावदार समारभ झाला. त्यासाठीं आम्ही पुष्कळजण—जवळ जवळ पन्नास असामी रगूनला गेला होतो.

नेताजींनीं बहादुरशहाच्या गौरवपर असे मोठे भावनापूर्ण भाषण केल.

"हिंदुस्तानच्या शेवटच्या बादशहाचे अवशेष ब्रह्मदेशात असावे आणि स्वतत्र ब्रह्मदेशाच्या शेवटच्या राजाचे अवशेष हिंदुस्तानच्या भूमींत असावेत हा काहींसा विलक्षण पण भाग्याचा योगायोग आहे.

"या पवित्र स्मारकासमोर—हिंदुस्तानच्या स्वातत्र्यासाठीं लढलेल्या या शेवटच्या बादशहाच्या नश्वर अवशेषासमोर आम्ही आमचा अचल निर्धार व्यक्त करतो. हा बादशहा सामान्य माणसात बादशहासारखा होता आणि इतर बादशहासारखा बादशहा असूनहि त्याला सामान्य माणसाचे अत करण होते... यावेळीं आम्ही हिंदुस्तानच्या स्वातत्र्याच्या अखेरच्या लढ्यास सुरवात केली आहे. हा शेवटचा लढा स्वातत्र्य मिळेपर्यंत अविचल निर्धाराने आम्ही लढू सर्व यातना, सर्व स्वार्थत्याग, मार्गात येणाऱ्या सर्व अडचणी, लढ्याला लागणारा दीर्घ काल या कशाचीहि पर्वा न करता आम्ही हा लढा लढू. अखेरीस ब्रह्मदेश

व हिंदुस्तान यांचा शत्रु उलथून पाडला जाईल आणि आम्ही स्वदेशासच स्वतंत्र होऊं इतकेच नव्हे तर अखिल मानवजातीच्या उत्थान. त्यादा लावून अखिल मानवजातीच्या भवितव्यासाठीं चाल करीत पुढें जाऊ. इतक्या अखेरपर्यंत आम्ही लढत रहाणार आहों अशी शपथ येथें आज आम्हीं पुन्हा घेतली पाहिजे.

" येथे मी, स्वतः बहादुरशहानें केलेल्या एका वचनातील काही शब्द उच्चारुन, माझें भाषण संपवितों. हिंदुस्तानच्या स्वातन्त्र्यवीराच्या अन्तःकरणात श्रद्धेचा शेवटचा कण शिल्लक असेपर्यंत हिंदुस्तानची समशेर लंडनच्या अंतःकरणात घुसत राहील."

गाझियो में बू रहेगी
जब तलक ईमानकी
तब तो लन्दन तक चलेगी
तेग हिन्दोस्तान की

२ ऑक्टोबर, १९४३

महात्मा गांधींचा पंचाहत्तरावा वाढदिवस आज होता. आम्ही आज तो प्रचंड सभा भरवून साजरा केला. सर्व हिंदी लोकांच्या घरावर राष्ट्रीय निशाणे उभारण्यात आलीं. सकाळी राष्ट्रगीतें गात मिरवणुकी काढण्यात आल्या.

...नेताजींचे गांधीजींच्यासंबंधानें भाषण झालें.

" हिंदुस्तानच्या स्वातंत्र्यसंग्रामाच्या इतिहासात गांधीजींनी कामगिरी कोणती आहे तिचे महत्त्वमापन करण्याचें कामच मी आज करणार आहें. हिंदुस्तानच्या स्वातंत्र्याच्या कार्यात गांधींनीं बजावलेली कामगिरी इतकी वैशिष्ट्यपूर्ण व अद्वितीय आहे कीं हिंदुस्तानच्या राष्ट्रीय इतिहासात पुढील सर्व काळीं त्याचे नाव सुवर्णाक्षरानीं लिहावें लागेल.......

" गेले महायुद्ध संपल्यानंतर युद्धकाळीं हिंदुस्तानला आश्वासन देण्यात आलेले स्वातंत्र्य हिंदी लोकानीं जेव्हा मागितले तेव्हा आपला विश्वासघात झालेला आहे असे पहिल्यानें हिंदी लोकाना कळून आले. हिंदी लोकाना त्यांच्या

मागणीस जें उत्तर मिळालें तें १९१९ च्या रौलट कायद्याच्या स्वरूपांत मिळालें. लोकाना जें काहीं थोडें मतस्वातंत्र्य होतें तें या कायद्यानें हिरावून घेतलें. या काळ्या कायद्याचा लोकांनीं निषेध केला तेव्हा जालियनवाला बागेंत लोकाची कत्तल करण्यात आली. पहिल्या महायुद्धात लोकांनीं जो जो स्वार्थत्याग केला त्याचीं रौलट कायदा आणि जालियनवाला बागेंतील कत्तल अशीं दोन बक्षिसें हिंदी लोकाना मिळालीं......

"१९१९ च्या या दुर्दैवी घटनानंतर हिंदी लोक स्तिमित झाले. पुढें काय करावें हेंच त्याना काहीं काळ समजेना. ब्रिटिश सरकार व त्याचे सैनिक यानीं स्वातंत्र्याचे सर्व प्रयत्न आजवर चिरडून टाकले होते. सनदशीर चळवळ, ब्रिटिश मालावरील बहिष्कार, सशस्त्र क्रांति या सर्वांनाहि स्वातंत्र्य मिळविण्याचे कामीं अपयश आलें होतें. आशेचा एकहि किरण उरला नव्हता. नवी कार्यपद्धति, लढ्याचें नवें हत्यार शोधण्यासाठीं हिंदी लोक अंधारात चाचपडत होते. भावनेच्या खळबळीच्या या प्रसंगीं गांधीजी क्षितिजावर आले आणि त्यानीं असहकारिता, म्हणजे सत्याग्रह, म्हणजे सविनय कायदेभंग ही आपली नवी पद्धति हिंदी लोकापुढें मांडली. जणू काहीं ईश्वरानें स्वातंत्र्याचा मार्ग दाखविण्यासाठीं हा देवदूतच पाठवला आहे असें तेव्हा वाटलें. तावडतोब स्वयस्फूर्तीनें सारें राष्ट्र त्याच्या निशाणाभोंवतीं जमा झालें. हिंदुस्तानचा बचाव झाला. आशा आणि आत्मविश्वास यानीं प्रत्येक हिंदी माणसाचें तोंड सतेज झालें. आपण अखेरीस विजयी होऊच होऊ अशी पुन्हा एकदा खात्री वाटू लागली......

"गेल्या वीस वर्षांहून अधिक काळ हिंदुस्तानच्या स्वातंत्र्यासाठीं गांधीजींनीं प्रयत्न केला आहे. त्याच्याबरोबर हिंदी जनतेनेंहि तेंच कार्य केलें आहे.

"१९२० सालीं आपले लढ्याचे नवें शस्त्र हातीं घेऊन गांधीजी पुढें आले नसते तर अजूनहि हिंदुस्तान लाचार राहिला असता असे म्हणण्यात थोडीहि अतिशयोक्ति नाहीं. हिंदुस्तानच्या स्वातंत्र्य कार्यातील त्याची कामगिरी खास अद्वितीय स्वरूपाची आहे. तशा प्रकारच्या परिस्थितींत कोणाहि एकट्या माणसानें आपल्या एका आयुष्यात एवढी कमाई करून दाखविली नसती. गांधींच्या कर्तृत्वाशीं जास्तींत जास्ती समान असें दुसरें कर्तृत्व सांगावयाचें

असल्यास तें मुस्तफा केमलपाशाचें सांगतां येईल. महायुद्धातील पराजयानंतर त्यानें तुर्कस्तानचा बचाव केला आणि तुर्कस्तानच्या लोकांनीं ' गाझी ' म्हणून त्याचा गौरव केला.

" १९२० पासून महात्मा गांधींचे दोन संदेश हिंदी लोक शिकले आहेत. स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं हे दोन संदेश अत्यवश्य असे होते. पहिली गोष्ट म्हणजे राष्ट्रीय स्वाभिमान आणि आत्मविश्वास त्यांनीं संपादन केला, त्यामुळें त्यांच्या अंतःकरणात क्रांतीची ईर्ष्या धडाडून पेटली आहे. दुसरी गोष्ट म्हणजे अगदीं दूरवरच्या खेड्यापाड्यापर्यंत पोचलेली एक राष्ट्रव्यापी संघटना त्यांनीं निर्माण केली आहे......"

" स्वातंत्र्याच्या थेटच्या रस्त्यावर गांधीजींनी आमचे पाय आतां पक्के केले आहेत. गांधीजी आणि इतर पुढारी हल्लीं तुरुंगात खितपत असल्यानें त्यांनीं सुरू केलेलें कार्य गांधीजींच्या देशबांधवांनीं स्वदेशात व परदेशांत पार पाडलें पाहिजे...

" मी आपणास आठवण देऊं इच्छितों, कीं १९२० च्या डिसेंबरांत काँग्रेसच्या नागपूर येथील वार्षिक अधिवेशनात हिंदी राष्ट्रापुढें गांधींनीं जेव्हां आपला असहकारितेचा कार्यक्रम ठेवला तेव्हा ते म्हणाले, ' आज हिंदुस्तानच्या हातीं शस्त्र असतें तर तें शस्त्र त्यानें उपसलें असतें.' पुढें गांधीजी म्हणाले, ' पण आज सशस्त्रक्रांतीचा प्रश्नच उरला नाहीं; म्हणून राष्ट्रापुढें असहकारिता, म्हणजे सत्याग्रह हा एकच विकल्प राहिला आहे.' गांधींच्या त्या भाषणानंतर आतां परिस्थिति बदलली आहे. तरवार उपसणें आतां आम्हास शक्य आहे. हिंदुस्तानची स्वातंत्र्यसेना निर्माण झाली असून रोजच्या रोज तिची संख्या वाढत आहे याबद्दल आम्हास अभिमान वाटतो......"

## हुकुमत-ए-आझाद-हिंद

*२१ ऑक्टोबर, १९४३*

१७ तारखेस इपोह येथें आझाद हिंद फौजेची एक नवी शिक्षण छावणी उघडण्यांत आली.

आजचा दिवस मोठा सुदिन आहे. आज सकाळीं साडेदहा वाजता दाईतोआ गेकीजिओ येथे सर्व पूर्व आशियातील प्रतिनिधींची आय्. आय्. एल्. नें बोलाविलेली ऐतिहासिक परिषद भरली. श्री. आर—यांनी स्वागतपर भाषण वाचून दाखविले. कर्नल सी—यानें चिटणिशी अहवाल वाचला. नंतर नेताजी व्यासपीठावर आले आणि दीड तासपर्यंत त्यांचें सळसळजनक भाषण झालें. त्या प्रचंड श्रोतृसमुदायास त्यांनीं जणू कांहीं जादूनें मारून टाकले होते. स्वतंत्र भारताचें तात्पुरतें सरकार स्थापन करण्याचें वैशिष्ट्य काय हें त्यांनीं हिंदुस्तानी भाषेत सांगितलें. श्री. सी—यांनीं तामीलमध्यें त्या भाषणाचें भाषांतर सांगितलें.

नेताजींनी त्यावेळीं हिंदुस्तानला स्वामिनिष्ठ रहाण्याची शपथ घेतली तेव्हां त्या दिवाणखान्यात टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला आणि त्याच्या ध्वनि-प्रतिध्वनींनी दिवाणखाना दुमदुमून गेला. सुभाषबाबूंचें अंतःकरण इतकें उचंबळून आलें होतें, कीं मध्येंच एकदा बोलता बोलतां त्यांचा कंठ दाटून आला, भावनातिरेकानें कांहीं मिनिटेंपर्यंत त्यांच्या तोंडून शब्दच उमटेना. त्या शपथेतील प्रत्येक शब्द आणि त्या प्रसंगाचें पावित्र्य याचा नेताजींच्या मनावर किती खोल परिणाम झाला आहे हें त्या अकस्मात घडलेल्या त्यांच्या भावनोद्रेकावरून कळून आलें. पुढें त्यांचा आवाज मोठा झाला. तो सौम्यच होता पण नेहमींप्रमाणें निर्धाराचा होता. त्या आवाजात नेताजी वाचू लागले —"ईश्वराला साक्षी ठेवून मी ही पवित्र शपथ घेतों, कीं हिंदुस्तान स्वतंत्र करण्यासाठीं, हिंदुस्तानचे माझे अडतीस कोटी बांधव स्वतंत्र करण्यासाठीं मी, सुभाषचंद्र बोस, हा स्वातंत्र्यलढा माझ्या देहात श्वासोच्छ्वास शिल्लक असेपर्यंत चालू ठेवीन." इतकें वाचून ते थांबले. हे आता उभ्याउभ्याच पडतील कीं काय अशी भीति वाटण्याइतका भावनोद्रेक त्यांना झाला होता. त्या शपथेंतील प्रत्येक शब्द आमच्यातील प्रत्येकजण आपल्या मनाशीं घोकीत होता. आम्ही पुढें वाकून, मान उंचावून नेताजींच्या भव्य मूर्तीशीं बरोबरी साधण्याचा प्रयत्न करीत होतों. सर्व श्रोतृसमुदाय नेताजींच्याशीं तल्लीन झाला होता. टाचणी पडली तर आवाज ऐकूं यावा इतकी स्तब्धता तेथें होती. सर्वांनीं आपले ओठ घट्ट मिटले होते. डोळे घट्ट लावून घेतले होते. शरीरें ताठ उभीं होतीं. नेताजी आपल्या भावनोद्रेकाशीं झगडून

विजयी होण्याची वाट आम्ही पहात होतो. अमळशाने, चर्चमधील एखादे वाद्य वाजू लागावे तशा गंभीरपणें नेताजी पुन्हा बोलू लागले,

"मी नेहमीं हिंदुस्तानचा सेवकच राहीन आणि हिंदुस्तानातील माझ्या बंधु भगिनींच्या हिताची काळजी वाहीन. माझे श्रेष्ठातील श्रेष्ठ कर्तव्य हेंच असेल

"स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतरहि हिंदुस्तानचें स्वातंत्र्य टिकविण्यासाठी माझ्या शरीरातील रक्ताचा शेवटचा बिंदु संपेपर्यंत लढण्यास मी तयार राहीन"

श्रोत्याच्या मनावरील ताण थोडा कमी झाला. पुन्हा स्वस्थपणें श्वासोच्छ्वास करता येऊ लागला.

नंतर त्या प्रचंड सभेपुढें तात्पुरत्या सरकारच्या सभासदांनी येऊन पुढील प्रमाणे आपली शपथ घेतली, "ईश्वराला साक्षी ठेवून मी अशी पवित्र शपथ घेतो, कीं हिंदुस्तान व माझे अडतीस कोटी देशबांधव यांना स्वतंत्र करण्या साठीं आमचे पुढारी सुभाषचंद्र बोस यांच्याशीं मी एकनिष्ठ राहीन आणि त्या कार्यांत माझे जीवित आणि इतर सर्वस्व अर्पण करण्यास नेहमीं सिद्ध राहीन."

नंतर आम्हास जाहीरनामा वाचून दाखविण्यात आला.

हा खलिता पुढील कांहीं महिन्यात हिंदी देशभक्ताच्या रक्तानें हिंदुस्तानच्या इतिहासात लिहिला जाणार असल्यानें मी तो येथें नमूद करून ठेवतो.

"१७५७ मध्ये हिंदी लोकांचा बंगाल्यात पहिला पराभव झाल्यानंतर शंभर वर्षेपर्यंत हिंदी लोकांनीं अविरतपणें अनेक कठोर झगडे केले. अद्वितीय वीरत्व आणि स्वार्थत्याग याच्या उदाहरणांनीं हा कालखंड सचून भरला आहे इतिहासाच्या त्या पानापानांतून बंगालचे सिराजुद्दौला व मोहनलाल, दक्षिण हिंदुस्तानातील हैदरअली, टिपू सुलतान व वेलूथंपी, महाराष्ट्रांतील आप्पासाहेब भोसले व पेशवा बाजीराव, अयोध्येच्या बेगमा, पंजाबांतील सरदार शामसिंग अतारीवाला, आणि शेवटीं झाशीची राणी लक्ष्मीबाई, तात्या टोपे, डुमरावचा कुंवरसिंग, नानासाहेब हीं नावें कायमचीं सुवर्णाक्षरांनी कोरलेलीं आहेत. आमच्या दुर्दैवानें आमच्या या पूर्वजांच्या लक्षात एक गोष्ट आली नाहीं, कीं ब्रिटिश हे साऱ्या हिंदुस्तानलाच एक संकट होतें. हे न कळल्यामुळें शत्रूशीं त्यांनीं

एकजुटीचा सामना दिला नाहीं. शेवटीं वास्तव परिस्थिति ज्यावेळीं हिंदी लोकांच्या लक्षात आली तेव्हा १८५७ सालीं बहादुरशहाच्या नेतृत्वाखालीं स्वतंत्र राष्ट्र या नात्यानें त्यांनीं आपला अखेरचा झगडा केला......

"१८५७ नंतर ब्रिटिशांनीं हिंदी लोकाना निःशस्त्र केलें. त्याच्यावर खूप दहशत गाजवून पाशवी अत्याचारहि केले. काहीं काळ हिंदी लोक लाचार राहिले. पण १८८५ सालीं राष्ट्रीय सभेचा जन्म होताच एक नवी जागृति सुरू झाली. १८८५ पासून गेलें महायुद्ध संपेपर्यंत, आपलें हिरावून गेलेलें स्वातंत्र्य परत मिळविण्यासाठीं सर्व उपाय हिंदी लोकांनीं अवलंबिले. चळवळ, मतप्रचार, ब्रिटिश मालावरील बहिष्कार, दहशतवाद, घातपात, आणि अखेरीस' सशस्त्र बड हे सर्व मार्ग त्यांनीं अनुसरले; पण ते काहीं काळ विफल झाले. अखेरीस १९२० सालीं पराभवाच्या जाणीवेनें वेदना सोशीत असता हिंदी लोक नव्या साधनाचा शोध अंधारात चाचपडून करीत होते त्यावेळीं असहकार आणि सविनय कायदेभग हें शस्त्र घेऊन महात्मा गांधी पुढें आले......

"अशा प्रकारें हिंदी लोकाना राजकीय जागृति प्राप्त झाली, इतकेंच नव्हे तर पुन्हा एकदा राजकीय अस्तित्व आपणास आल्याची जाणीव हिंदी लोकाना झाली. सर्वांच्या समान ध्येयासाठीं एक आवाजानें ते बोलू शकले. एकजुटीनें प्रयत्न करू शकले. १९३७ पासून १९३९ पर्यंत काँग्रेसमन्यांनीं आठ प्रांतात जो कारभार केला त्यामुळें त्यांनीं आपली राज्यकारभार करण्याची पात्रताहि सिद्ध केली. अशा रीतीनें चालू युद्धाच्या आरभीं हिंदी स्वातंत्र्याच्या अखेरच्या झगड्याची वेळ येऊन ठेपलेली आहे.......

"हिंदुस्तानांतील ब्रिटिश सरकारनें हिंदी लोकांना आपल्या ढोंगी वर्तनानें चिडवून बेफाम केलें. लुटीनें त्यांची उपासमार केली व त्याना मृत्यूच्या दरींत ढकललें; म्हणून ब्रिटिश सत्तेबद्दल हिंदी लोकांस मुळींच सदिच्छा उरलेली नसून ब्रिटिश सत्ता आज येथें धोक्याचें जीवन जगत आहे. देशाला गाजणाऱ्या या सत्तेचा शेवटचा हलींचा अवशेष नष्ट करण्यासाठीं एका ज्वाळेचा भडका पुरे आहे. या हिंदी स्वातंत्र्यसेनेचें कार्य ती ज्वाळा भडकवणें हें आहे......

"स्वातंत्र्याची सुप्रभात जवळ आली आहे अशा वेळीं हिंदी लोकांनीं

आपलें स्वतःचें तात्पुरतें सरकार स्थापन करणें हें त्यांचें कर्तव्य आहे. पण स्वदेशांत सर्व पुढारी तुरुंगांत आहेत, जनता पूर्ण निःशस्त्र आहे; म्हणून हिंदुस्तानांत तात्पुरतें सरकार स्थापन करणें व त्या सरकारच्या नेतृत्वाखालीं सशस्त्र लढा चालविणें हें अशक्य आहे. म्हणून पूर्व आशियांतील इंडियन इंडिपेन्डन्स लीगचें कर्तव्य स्वदेशांतील व परदेशांतील हिंदी लोकांच्या पाठिंब्यानें आझाद हिंदचें तात्पुरतें सरकार स्थापन करणें आणि लीगनें निर्माण केलेल्या आझाद हिंद फौजेच्या साहाय्यानें अखेरचा स्वातंत्र्य लढा लढणें हें आहे......

"या तात्पुरत्या सरकारला हिंदीजनतेची स्वामिनिष्ठा मागण्याचा हक्क असून प्रत्येक हिंदी माणसाकडे अशा स्वामिनिष्ठेची मागणी हें सरकार करीत आहे. सर्व नागरिकांना समान हक्क, समान संधी, आणि पूर्ण धार्मिक स्वातंत्र्य हें सरकार देत आहे. सर्व देश आणि त्याचे सर्व भाग यांना सुख आणि सुसंधि मिळवून देणें, परकी सरकारनें भूतकालांत धूर्तपणानें पिकविलेले सर्व भेद बाजूला सारून देशातील सर्व सुपुत्रांचें सारखेंच संरक्षण करणें यासाठीं झटण्याचा दृढ निर्धार हें सरकार जाहीर करीत आहे.

"ईश्वरास साक्षी ठेवून, हिंदुस्तानांतील जनतेला एक राष्ट्र बनविणाऱ्या मागील पिढ्यांना साक्षी ठेवून आणि वीरत्व व स्वार्थत्याग यांच्या परंपरेचा वारसा ज्या हुतात्म्यांनीं आम्हांस दिला त्यांना साक्षी ठेवून हिंदी लोकांना आम्ही आवाहन करतों, कीं हिंदी स्वातंत्र्याच्या झगड्यांत शस्त्राघात करण्यासाठीं आमच्या निशाणाभोंवतीं एकजूट व्हा. हिंदुस्तानांतील ब्रिटिश व त्यांचे दोस्त यांच्याशीं दीर्घ प्रयत्न, शौर्य आणि श्रद्धा यांच्या साहाय्यानें अखेरचा झगडा झगडण्यासाठीं आम्ही त्यांस आवाहन देतों. शत्रु हिंदुस्तानच्या भूमींतून बाहेर हाकलला जाऊन हिंदुस्तान देश पुन्हा स्वतंत्र राष्ट्र होईपर्यंत हा झगडा आपण चालवूं या."

या जाहीरनाम्यावर आझाद हिंदच्या तात्पुरत्या सरकारतर्फे पुढील पुढाऱ्यांच्या सह्या झाल्याः—सुभाषचंद्र बोस, राज्याचे अधिपति, पंतप्रधान आणि युद्ध व परराष्ट्रसंबंध खात्याचे मंत्री; कॅ. मिसेस लक्ष्मी, स्त्रीसंघटना खातें; एस. ए. अय्यर, वृत्तप्रसार आणि मतप्रचार खातें; लेफ्ट. कर्नल. ए.

सी चतर्जी, जमादीरखातें, लेफ्ट कर्नल अझीझ अहमद, लेफ्ट. कर्नल एन एस. भगत, लेफ्ट. कर्नल जे के. भोसले, लेफ्ट कर्नल गुलझारसिंग, लेफ्ट. कर्नल एम् झेड्. कियानी, लेफ्ट. कर्नल ए. डी. लोकनाथन्, लेफ्ट. कर्नल इहसन कादिर, लेफ्ट. कर्नल शहा नवाझ,—हे सर्व सशस्त्र सैन्याचे प्रतिनिधी, ए एम सहाय, मंत्र्याच्या दर्जाचा चिटणीस, रास बिहारी बोस, प्रमुख सल्लागार, करीम गनी, देवनाथ दास, डी एम् खान, ए. यल्लाप्पा, जे थिवी, सरदार ईश्वरसिंग, हे सल्लागार, ए एन सरकार, कायदेपंडित

नेतार्जीनीं केलेल्या भाषणातील कांहीं परिच्छेद मी येथ नादले पाहिजेत —

“ गेल्या कांहीं महिन्यात हिंदुस्तानातील परिस्थिति आम्हाला अधिकाधिक अनुकूल होत आहे अर्थात याचा अर्थ लोकाच्या यातना अधिकाधिक वाढत आहेत हाच आहे पण त्याला इलाज नाहा

“ हिंदुस्तानातील कित्येक प्रातात—मुख्यत बगालमध्य जी दुष्काळाची परिस्थिति पसरलेली आहे तीमुळें राजकीय असतोष अधिकच भडकला आहे हिंदी जनतेची अन्नाची आणि इतर साधनाची ब्रिटनच्या युद्धकार्यासाठा जवळ जवळ चार वर्षेपर्यंत जी निर्दय लूट झाली तीमुळेच हा दुष्काळ उद्भवला आहे यात मुळींच शका नाहीं तुम्हाला माहीतच आहे, कीं आपल्या लीगच्या-तर्फे मीं एक हजार टन तांदुळ उपासमार होणाऱ्या देशबाधवाना साहाय्य करण्याखातीं पहिला हप्ता म्हणून विनशर्त देऊ केले पण ब्रिटिश अधिकाऱ्यानीं ही आमची देणगी स्वीकारली नाहाच उलट त्यानीं आम्हाला शिव्या दिल्या.

“ गेल्या जुलैपासून मलायाच्या मुख्य प्रदेशात सयाम, ब्रह्मदेश आणि इडोचायना या देशात मी अनेकदा फिरून आलो आहे हे बहुधा तुम्हास माहीत असेल आमच्या देशबाधवाच्या ठिकाणीं मला सर्वत्र आढळून आलेला उत्साह मला उत्तेजनकारक वाटला इतकच नव्हे तर माझा आत्मविश्वास आणि आशावाद यात त्यामुळे भर पडली आहे . ,

“ मी आपणास कळवू इच्छितों, कीं येत्या झगड्यासाठींच केवळ आम्ही योजना आखीत आहो व तयारी करीत आहा असे नसून युद्धोत्तर पुनर्घटनेसाठींहि आम्ही तयारी करीत आहो. ॲंग्लो अमेरिकन्स आणि त्याचे दोस्त याची

# हुकुमत-ए-आझाद्-हिंद

आमच्या देशातून हकालपट्टी झाल्यानंतर देशात कोणती परिस्थिति उद्भवलेली असेल याची आम्हास थोडीही कल्पना येऊ शकते म्हणून आम्ही आमच्या मुख्य ठाण्यावर एक पुनर्घटना खातें निर्माण केलें असून युद्धोत्तर पुनर्घटनेच्या प्रश्नाचा अभ्यास तेथे केला जात आहे. लष्करी कार्य जसजसे भराभर उरकत आहे त्याबरोबरच खुद्द हिंदुस्तानात पुनर्घटना करण्यासाठीं लोकांना शिक्षण देण्यात येत आहे थोडक्यात सांगायचें म्हणजे आगामी स्वातंत्र्यलढ्यासाठी आणि लढा सफल्यानंतर आम्हास करावया लागणाऱ्या कार्यासाठीं जरूर लागणारी कोणतीहि तरतूद करण्याचे आम्ही शिल्लक ठवीत नाहीं

"हिंदुस्तानातच जर यावेळा स्वतंत्र सरकार स्थापन झालं असतें आणि त्यानेंच स्वातंत्र्याचा अखेरचा झगडा सुरू केला असता तर स्वाभाविकच ती गोष्ट अत्युत्कृष्ट झाली असती, पण सर्व लोकप्रसिद्ध आणि लोकमान्य पुढारी तुरुंगात आहेत. एकदर इतर परिस्थिति काय आहे तीहि आपण जाणतो त्यामुळे हिंदुस्तानच्या चतुःसीमेंत तात्पुरतें स्वतंत्र सरकार स्थापलें जाण्याची आशा करणे व्यर्थ आहे. तसेच खुद्द हिंदुस्तानातच स्वातंत्र्याचा अखेरचा झगडा उभारला जाणे ही गोष्टहि आज अपेक्षिणे व्यर्थ आहे म्हणून हे थोर कार्य पूर्व आशियातील हिंदी लोकांनीं पत्करिलें पाहिजे

"आम्ही आमचे सैन्य घेऊन हिंदुस्तानचें राष्ट्रीय निशाण फडकावीत ज्यावेळा हिंदुस्तानची सरहद्द ओलांडून जाऊ त्यावेळा हिंदुस्तानात खरीखुरी क्रांति सुरू होईल तीच क्रांति अखेरास हिंदुस्तानातून ब्रिटिश सत्ता नष्ट करील याबद्दल आम्हास मुळाच शंका नाहीं

"पूर्व आशियात चालू असलेल्या सर्व स्वातंत्र्य चळवळीस राष्ट्रीय सैन्याच्या निर्मितीमुळ सत्यता व गांभीर्य आलं आहे जर हें सैन्य उभारलं गेलं नसतें तर पूर्व आशियातील इंडिपेन्डन्स लीग ही नुसतें एक मतप्रचाराचें साधन म्हणून गणली गेली असती राष्ट्रीय सैन्य निर्माण झाल्यामुळ स्वतंत्र हिंदुस्तानचें म्हणजे आझाद हिंदच तात्पुरतें 'सरकार स्थापन करण ही गोष्ट शक्य व अत्यवश्य झाली हे सरकार इंडिपेन्डन्स लीग मधूनच निर्माण

झालें असून हिंदी स्वातंत्र्याचा अखेरचा झगडा सुरू करणें व त्याचें मार्गदर्शन करणें हें या सरकारचें कर्तव्य आहे......

"हें तात्पुरतें सरकार स्थापन करण्यांत आम्हीं एक तर हिंदुस्तानांत उत्पन्न झालेल्या परिस्थितीची विशिष्ट गरज भागवीत आहों; पण त्याचबरोबर इतिहासांत उमटलेल्या पावलांवर पावलें टाकून चाललों आहों. अलीकडल्या काळांत १९१६ मध्यें आयरिश लोकांनीं तात्पुरतें सरकार स्थापन केलें. गेल्या महायुद्धांत झेक जनतेनें तीच गोष्ट केली. मुस्तफा केमालपाशाच्या नेतृत्वाखालीं तुर्कांनीं अनाटोलियांत आपलें तात्पुरतें सरकार स्थापन केलें..."

नेताजींच्या या भाषणानंतर हजारों श्रोत्यांच्या कंठांतून भव्य निनादांत पुढील राष्ट्रगीत उचंबळून आलें.

सब सुख चैनकी बरखा बरसे भारत भाग्य है जागा
पंजाब सिंध गुजरात मराठा द्राविड, उत्कल बंग
चंचल सागर विंध्य हिमालय नीला जमुना गंगा
तेरे हित गुण गाए,
तुझ से जीवन पाये
सब तन पाये आशा
सूरज बन कर जगपर चमके भारत नाम सुभागा
जय हो, जय हो, जय हो
जय, जय, जय, जय हो
सबके दिलमें प्रीत बसाए तेरी मीठी वाणी
हर सुभेके रहनेवाले हर मजहब के प्राणी
सब भेद औ फर्क मिटाके
सब गोदमें तेरी आके
गूँथे प्रेम की माला:
सूरज बनकर जगपर चमके भारत नाम सुभागा

जय हो, जय हो, जय हो,
जय, जय, जय, जय हो !
सुबह सबेरे पांख पखेरू तेरे ही गुण गायें
बास-भरी भरपूर हवायें—जीवनमें ऋतु लायें
सब मिलकर हिंद पुकारें—जय आझाद हिन्द के नारे
प्यारा देश हमारा
सूरज बनकर जगपर चमके भारत नाम सुभागा !
जय हो, जय हो, जय हो,
जय, जय, जय, जय हो भारत नाम सुभागा !

२२ ऑक्टोबर १९४३

आज आमचा दिवस होता. नेताजींनीं निशाण उभारलें, आणि झाशी राणी रेजिमेंटची शिक्षण छावणी सुरू झाल्याचें जाहीर केलें. या दिवसाची निवड चागली झाली होती. झाशीच्या राणीचा जन्मदिवस आजचाच होता. या दिवशीं पूर्व आशियात झाशीच्या अनेक आधुनिक राण्याचा जन्म झाला. त्यावेळीं नेताजींनीं सुईणकर्म केलें.

बरोबर पाच वाजता नेताजी हजर झाले. शोनान स्त्रीविभागाची अध्यक्ष मिसेस सी—हिनें त्याचें स्वागत केलें. आमच्या सन्मानपथकाचें (गार्ड ऑफ ऑनरचें) निरीक्षण नेताजींनीं केलें त्या वेळीं कॅप्टन मिसेस एल्—त्याच्याबरोबर होत्या. नेताजींनीं राष्ट्रीय निशाण उभारलें. आम्ही हातात बंदुका घेऊन आणि पुतळ्यासारख्या उभ्या राहून त्याचें भाषण ऐकलें. रणागणावर सैनिक म्हणून लढण्याला आम्ही अपात्र आहों असें त्याना वाटूं नये म्हणून आम्ही आमचा श्वासहि आवरून ताठ उभ्या राहिलों होतों. आमच्यापुढें जे नवीन जीवन उभें ठाकलेलें दिसत आहे तें पाहून माझा थरकाप होतो. ईश्वराजवळ माझी प्रार्थना आहे, कीं त्या कार्याला मी उणी पडू नये—क्षणभरहि माझ्या ठिकाणीं दुर्बलता येऊ नये. ईश्वरा ! मानहानिपेक्षा मला मृत्यु अधिक पसत आहे.

नेताजी म्हणाले,

झालें असून हिंदी स्वातंत्र्याचा अखेरचा झगडा सुरू करणें व त्याचें मार्गदर्शन करणें हें या सरकारचें कर्तव्य आहे......

"हें तात्पुरतें सरकार स्थापन करण्यात आम्हीं एक तर हिंदुस्तानांत उत्पन्न झालेल्या परिस्थितीची विशिष्ट गरज भागवीत आहों; पण त्याचबरोबर इतिहासात उमटलेल्या पावलावर पावलें टाकून चाललों आहो. अलीकडल्या काळात १९१६ मध्यें आयरिश लोकांनीं तात्पुरतें सरकार स्थापन केलें. गेल्या महायुद्धात झेक जनतेनें तीच गोष्ट केली. मुस्तफा केमालपाशाच्या नेतृत्वाखालीं तुर्कांनीं अनाटोलियात आपलें तात्पुरतें सरकार स्थापन केलें..."

नेताजींच्या या भाषणानंतर हजारों श्रोत्यांच्या कंठातून भव्य निनादात पुढील राष्ट्रगीत उच्चंबळून आलें.

**सब सुख चैनकी बरखा बरसे भारत भाग्य है जागा**
**पंजाब सिंध गुजरात मराठा द्राविड, उत्कल बंग**
**चंचल सागर विंध्य हिमालय नीला जमुना गंगा**
**तेरे हित गुण गाए,**
**तुझ से जीवन पाये**
**सब तन पाये आशा**
**सूरज बन कर जगपर चमके भारत नाम सुभागा**
**जय हो, जय हो, जय हो**
**जय, जय, जय, जय हो**
**सबके दिलमें प्रीत बसाए तेरी मीठी वाणी**
**हर सुबेके रहनेवाले हर मजहब के प्राणी**
**सब भेद ओ फर्क मिटाके**
**सब गोदमें तेरी आके**
**गूँधे प्रेम की मालाः**
**सूरज बनकर जगपर चमके भारत नाम सुभागा**

जय हो, जय हो, जय हो,
जय, जय, जय, जय हो !
सुबह सबेरे पांख पखेरू तेरे ही गुण गायें
बास-भरी भरपूर हवायें–जीवनमें ऋतु लायें
सब मिलकर हिंद पुकारें–जय आझाद हिन्द के नारे
प्यारा देश हमारा
सूरज बनकर जगपर चमके भारत नाम सुभागा !
जय हो, जय हो, जय हो,
जय, जय, जय, जय हो भारत नाम सुभागा !

२२ ऑक्टोबर १९४३

आज आमचा दिवस होता. नेताजींनीं निशाण उभारलें, आणि झाशी राणी रेजिमेंटची शिक्षण छावणी सुरू झाल्याचें जाहीर केलें. या दिवसाची निवड चागली झाली होती. झाशीच्यां राणीचा जन्मदिवस आजचाच होता. या दिवशीं पूर्व आशियात झाशीच्या अनेक आधुनिक राण्याचा जन्म झाला. त्यावेळीं नेताजींनीं सुईणकर्म केलें.

बरोबर पाच वाजता नेताजी हजर झाले. शोनान स्त्रीविभागाची अध्यक्ष मिसेस सी—हिनें त्याचें स्वागत केलें. आमच्या सन्मानपथकाचें (गार्ड ऑफ ऑनरचें) निरीक्षण नेताजींनीं केलें त्या वेळीं कॅप्टन मिसेस एल्—त्याच्याबरोबर होत्या. नेताजींनीं राष्ट्रीय निशाण उभारलें, आम्ही हातात बदुका घेऊन आणि पुतळ्यासारख्या उभ्या राहून त्यांचे भाषण ऐकलें. रणागणावर सैनिक म्हणून लढण्याला आम्ही अपात्र आहों असें त्याना वाटूं नये म्हणून आम्ही आमचा श्वासहि आवरून ताठ उभ्या राहिलों होतों. आमच्यापुढे जें नवीन जीवन उभें ठाकलेलें दिसत आहे तें पाहून माझा थरकाप होतो. ईश्वराजवळ माझी प्रार्थना आहे, कीं त्या कार्याला मी उणी पडूं नये–क्षणभरहि माझ्या ठिकाणीं दुर्बलता येऊं नये. ईश्वरा ! मानहानिपेक्षां मला मृत्यु अधिक पसंत आहे.

नेताजी म्हणाले,

" भगिनींनों !

" झाशीराणी रेजिमेंटची शिक्षण छावणी सुरू करणं हा आमच्या पूर्व आशियातील चळवळीच्या प्रगतींतील महत्त्वाचा दिवस आहे.

" आमच्या राष्ट्राच्या पुनर्जन्माच्या महत्कार्य करण्यात आपण गुतलों आहात. म्हणून आमच्या स्त्रीवर्गात नवजीवन संचारलें जाणें ही अगदीं स्वाभाविक घटना होय.

" आमचा प्राचीन इतिहास भव्य आणि वैभवपूर्ण आहे येथें वैभवपूर्ण कर्तृत्वाची पूर्वपरंपरा नसती तर झाशीच्या राणीसारखी वीर स्त्री हिंदुस्तानच्या उदरीं जन्म पावली नसती हिंदुस्तानच्या प्राचीन इतिहासात मैत्रेयीसारख्या थोर स्त्रिया होऊन गेल्या अहल्याबाईचं स्फूर्तिजनक उदाहरण महाराष्ट्रात घडलं आहे' बंगालची राणी भवानी, रझिया बेगम, नूरजहान या ब्रिटिश अमलापूर्वीच्या, अलीकडील इतिहासात राज्यकारभारनिष्णात अशा स्त्रिया होऊन गेल्या हिंद भूमींत थोर माणसें निपजू शकतात याबद्दल मला पूर्ण विश्वास आहे मला खात्री आहे, की स्त्रीजातींतील सर्वश्रेष्ठ पुष्प मानलेल्या जातील अशा स्त्रिया प्राचीन काळाप्रमाणें सध्याच्या काळींहि निर्माण होतीलच . .

" या ठिकाणीं मी झाशीच्या राणीसंबधानें चार शब्द सांगतो तिनें ज्या वेळीं झगडा सुरू केला त्यावेळा ती अवघ्या वीस वर्षांची होती वीस वर्षांच्या त्या मुलाला घोड्यावर बसून खुल्या मैदानात तरवार परजणें हें किती अवघड काम होत याची तुम्हाला सहजच कल्पना येईल म्हणून केवढे धैर्य व हृदयाचें सामर्थ्य तिच्या ठिकाणा होतें हेंहि तुमच्या सहज लक्षात यईल तिच्याविरुद्ध लढणाऱ्या ब्रिटिश सेनापतीनं नमूद करून ठेविलें आहे का ' हा राणा सर्व बंडवाल्यात शूर आणि श्रेष्ठ होती ' प्रथम ती झाशीच्या किल्ल्यातून लढली किल्ल्याला वेढा पडल्यानंतर बरोबर एक तुकडी घेऊन ती काल्पीला गेली तिथून तिने लढा चालू ठेवला रणांगणापासून माग हटावे लागल्यानंतर तिन तात्या टोपेबरोबर सख्य केल, ग्वाल्हेरच्या किल्ल्यावर हल्ला करून तो काबीज केला आणि त्या किल्ल्याच्या ठाण्यावरून तिने लढा चालू ठेवला त्याच प्रचंड लढ्यात ती अखेर मृत्यु पावली.'

" झाशीच्या राणीचा पराभव झाला हे दुर्दैव होय. तो केवळ तिचाच पराभव नव्हता. तिच्या निमित्तानें हिंदुस्तान पराभूत झाला. राणी मेली पण तिचे तेज अमर आहे. झाशीच्या राणीचे अनेक अवतार या देशात जन्म पावून विजयी होतील."

आज आम्ही आमच्या छावणींत १५६ स्त्रिया आहोत. ही मध्यवर्ति छावणी आहे. सयाम आणि ब्रह्मदेश येथे आणखी छावण्या आहेत. फक्त मलायातून आमचा वाटा म्हणून आम्ही एक हजार स्त्रिया देण्याचे कबूल केले आहे

आज रात्रीं मी घरी आले तेव्हा मोरासारखी मान उंच करून नाचत आले असावे. पी—ने माझी चेष्टा केली, पण मी त्या चेष्टेची पर्वा करीत नाही. सनातनी पुरुषाची ही निवळ ऐटबाजी असते. स्त्री—सैनिकाबद्दल त्या पुरुषाहून कमी दर्जाच्या आहेत अशी एक भावना त्याच्या ठिकाणीं वावरत असते. पी—, थोडा अवधि दे, म्हणजे आम्हीहि दणकट सैनिक आहों ही गोष्ट सिद्ध करू. एखादा लहानसा झुरळ अथवा उंदीर पाहिला कीं जी तुझी पत्नी घाबरून जात असे-ती झाशीची राणी झाली आहे. देशाभिमानाच्या गरजेसाठीं ती शस्त्राघात करण्यासहि डरत नाहीं असे तुला आढळून येईल.

## २३ ऑक्टोबर, १९४३

जपानी सरकारने आमच्या तात्पुरत्या सरकारला मान्यता दिली असून 'पूर्ण स्वातंत्र्य हें जे हिंदुस्तानचे ध्येय त्यासाठीं तात्पुरत्या सरकारनें करावयाच्या प्रयत्नात जपानी सरकार शक्य ते सर्व सहकार्य व पाठबळ देईल' असे आश्वासन जपानी सरकारनें दिले आहे.

मी हल्लीं एका छावणीत आहे. कवाईत, व्याख्याने, निशाणबाजीचें शिक्षण इत्यादि आमचा दैनिक कार्यक्रम सुरू झाला आहे. मला असे सांगण्यात आले आहे, कीं मी जादा वेळ खर्चून अधिकारी होण्याची पात्रता अंगीं आणावी. मी ते करणार आहे.

आमच्या सैन्याचे कूच हिंदुस्तानात जसजसे पुढे पुढे होत जाईल तसतसा जिंकलेल्या मुलखातील कारभार हातीं घेण्यास आवश्यक असे राज्यकारभाराचें

शिक्षण देण्यासाठीं एक शाळा निर्माण करण्यांत आली आहे. अंगीं विशेष पात्रता असलेल्या लोकांनाच या शाळेंत घेण्यांत येतें, त्यांच्यात कायदेपंडित आणि राज्यकारभारतज्ञहि आहेत.

२५ ऑक्टोबर, १९४३

काल रात्रीं १२-५ वा. आमच्या मंत्रिमंडळाच्या दुसऱ्या बैठकींत एक ठराव मंजूर झाला :—

"आझाद हिंदचें हें तात्पुरतें सरकार ब्रिटन आणि अमेरिका याजविरुद्ध युद्ध पुकारीत आहे" हा तो ठराव होय.

ज्यावेळीं पेडँग येथील मेळाव्याच्यापुढें काल संध्याकाळीं प्रचंड म्युनिसिपल बिल्डिंगसमोर नेताजींनीं ही बातमी जाहीर केली त्यावेळीं आरोळ्यांनीं आणि घोषणांनीं आकाश फाटून गेलें. एकामागून एक अशा बेफाम झालेल्या जनतेच्या आरोळ्यांनीं,या बातमीचें स्वागत करण्यात आलें. पन्नास हजाराचा तो लोकसमुदाय पंधरा-मिनिटेंपर्यंत केवळ अनावर झाला होता. कित्येक ठिकाणीं व्यासपीठावर घुसण्यासाठीं जमावानें भोंवतीं घातलेली दोरीहि तोडली. नेताजींनीं ज्यावेळीं श्रोत्यांना जागच्या जागीं उभे राहून संमतीदाखल फक्त हात वर करा असें सांगितलें तेव्हा हातांचें जंगलच उभें राहिलें. नंतर फौजेच्या सैनिकांनीं आपल्या बंदुकी उचलून खांद्यावर घेतल्या. त्यामुळें पुन्हा एक बंदुकींचें जंगल संमतिदर्शक म्हणून उभें राहिलेलें दिसलें; हें दृश्य मी कधींहि विसरणार नाहीं. माझी संगीनहि म्यानाबाहेर काढून ती मीं उंचावर धरली. 'दिल्लीकडे चला' हा घोष आम्ही बेभानपणें ओरडत होतों.

काल पेडँगमध्ये ठाकुरेडुसीसमोर फौजेची एक लष्करी कवाईत सकाळच्या वेळीं झाली. नेताजी अतिशय धक्कशीर आहेत. ते अगदीं साडेदहाला आले. त्याच्याबरोबर त्यांचें मंत्रिमंडळ होतें. त्यांनीं फौजेचें निरीक्षण करून सलामी घेतली. हृदय उचंबळून टाकणाऱ्या आपल्या भाषणानें त्यांनीं सैनिकांचें धैर्य एकदम अतिशय उंचीवर नेलें. आमचें स्त्रियांचें रेजिमेंटहि तेथें होतें. राष्ट्राच्या हितासाठीं तूं आपली मान उतरून दे असें जरी नेताजींनीं मला सांगितलें असतें तरी ती गोष्ट मीं त्यावेळीं केली असती.

**आझाद हिंद सरकारचें मंत्रिमंडळ**

पुढील रांग—(डावीकडून) (१) मेजर जनरल चतर्जी (२) मेजर जनरल भोसले (३) सुभाषबोस, सिपाह-सालार, (४) मेजर डॉ लक्ष्मी स्वामिनाथन् (५) श्री. साहाय (६) श्री. एस् ए आय्यर

मागील रांग—(डावीकडून) (१) मेजर जनरल लोकनाथन् (२) लेफ्ट.कर्नल कादिर, (३) लेफ्ट.कर्नल भगतसिंग, (४) लेफ्ट.कर्नल कियानी, (५) लेफ्ट.कर्नल अझीझ अहमद, (६) लेफ्ट.कर्नल शाह नवाझ, (७) लेफ्ट.कर्नल गुल्झारासिंग



फौजेचे सैनिक ब्रिटन व अमेरिका यांजविरुद्ध युद्ध पुकारण्यांत आल्याच्या घोषणेचें स्वागत करीत आहेत.




"मी, सुभाष चंद्र बोस, अशी प्रतिज्ञा करतो की हा पवित्र स्वातंत्र्य-लढा माझ्या कुडींत प्राण शिल्लक आहे तोंवर मी चालवीन."

— अर्झी-हुकूमत-ए-आझाद हिंद.

(ऑक्टोबर २१, १९४३)

मेजर जनरल ए. डी. लोकनाथन्,
चीफ कमिशनर,
शहीद बेटे



मेजर जनरल ए सी. चतर्जी,
स्वतंत्र झालेल्या हिंदी प्रदेशाचे
गव्हर्नर



## अर्झी-हुकुमत-ए-आझाद हिंदचे चार आधारस्तंभ



मेजर जनरल जे. के. भोसले,
चीफ ऑफ स्टाफ



मेजर जनरल एम्. झेड् कियानी,
सेनापती, गांधी-ब्रिगेड

आपल्या भाषणात नेताजी म्हणाले, "भारतमातेचें दास्यविमोचन हेंच या फौजेचें एकमेव ध्येय आहे. दिल्लीचा लाल किल्ला हेंच या फौजेचें प्रवासाचें उद्दिष्ट होय. कोणाला या सैन्यातून सोडून जायचें आहे काय? पहिल्यानें उत्साहानें.. सैन्यात आलों पण आता बाहेर जावेसे वाटते असे कोणाचें म्हणणें आहे काय? पुनर्विचाराने कोणाचे मत बदलले आहे काय? अशा माणसानें उघडपणें मला कळवावें. त्याला बाहेर जाता येईल. ही फौज संपूर्णपणें स्वयंसेवकाचीच असली पाहिजे याबाबत मुळींहि शंका राहता कामा नये. कोणत्याहि प्रकारची सक्ती वापरली जाऊ नये. मी सगळ्या जगाला जाहीरपणें सांगतो, कीं या सैन्यातील कोणीहि माणूस आपण बाहेर पडू इच्छितो असें सांगत नाहीं.

"ज्यावेळीं आझाद हिंद फौज आपला लढा सुरू करील त्यावेळीं आपल्याच सरकारच्या नेतृत्वाखालीं ती लढा सुरू करील आणि ज्यावेळीं ती फौज हिंदुस्तानात शिरेल त्यावेळीं आमच्या तात्पुरत्या सरकारच्या हातीं जिंकलेल्या मुलखाचा कारभार आपोआपच येईल. ... हिंदुस्तानचें स्वातंत्र्य हिंदी माणसाच्याच प्रयत्नाने व आत्मयज्ञाने आमच्याच फौजेमार्फत मिळविलें जाईल."

*२६ ऑक्टोबर, १९४३*

जालन ॲंड बेसार स्टेडियम येथे नेताजींनीं काल एका नव्या आघाडीवर फार मोठा विजय मिळविला. हृदय उचंबळून आणणाऱ्या त्या घटनेची नोंद मी येथे करून ठेवते.

शोनानमध्यें नेताजी आल्यापासून पैसा आणि देणग्या याचा वर्षाव होत आहे. परंतु मिळणाऱ्या पैशानें नेताजींचे समाधान झालें नाहीं, म्हणून नेताजींनीं स्टेडियममधील श्रीमान हिंदी धंदेवाल्याना विशेष स्वरूपाची विनंती केली.

नेताजी गर्जून म्हणाले,

"या राष्ट्रीय हिंदी सैन्यात स्वयंसेवेनें जे सामील झाले आहेत व आवश्यक असें शिक्षण घेत आहेत त्याच्याकडे एकवार नजर टाका. हिंदुस्तान स्वतंत्र झालेला पहाण्यास आपणापैकीं कोण जिवंत राहील हें त्यांना माहीत नाहीं.

आपल्या रक्तातील शेवटचा बिंदु सपेपर्यंत रक्तदान करीत रहायचें एवढाच निश्चय त्यांनीं केला आहे. स्वतंत्र भारतात प्रवेश करावयाचा अथवा त्या कार्यात प्राणदान करावयाचें एवढ्याचसाठीं त्यांनीं तयारी चालविली आहे. पिछेहाट पत्करण्याचा कार्यक्रम त्यांच्यापुढें मुळींच नाहीं......

हिंदी राष्ट्रीय सैन्याचें शिक्षण चालू असता, आपल्या शरीरातील शेवटचा रक्तबिंदु सपेपर्यंत विजयासाठीं ते तयारी करीत असता 'सबध जमावट' ( टोटल मोबिलायझेशन् ) म्हणजे आमच्या संपत्तीतील दहा टक्के कीं पाच टक्के असा प्रश्न लोक विचारीत आहेत. या टक्केबाजाना मी विचारतों, कीं 'तुम्हीं आपलें दहा टक्के रक्त द्या आणि बाकीचें जपून ठेवा' असें मी या सैनिकाना सांगू शकेन काय ?......

"गरीब जनता स्वेच्छेने आणि उत्साहानें आपलें सर्वस्व अर्पण करण्यास पुढें येत आहे. घड्याळजी, धोबी, न्हावी, लहान दुकानदार, गवळी असे सर्व गरीब हिंदी लोकांचे वर्ग आपली सर्व चीजवस्त आम्हांस देण्यासाठीं आणीत आहेत. शिवाय स्वत. स्वयंसेवक म्हणूनहि कित्येकजण पुढें आले आहेत...

"या गरिबांपैकीं काहीं लोक मजकडे आले. त्यांनीं आपल्या खिशांतील पैसे आम्हाला दिले इतकेंच नव्हे तर आपल्या साऱ्या आयुष्यात त्यांनीं ज्यात शिल्लक टाकली होती तीं सेव्हिंग बँकबुकेंहि त्यांनीं मला दिलीं. 'हिंदुस्तानच्या स्वातंत्र्यासाठीं हें माझें बँकबुक तुम्ही घ्या' असें या गरिबांप्रमाणें देशप्रेमानें म्हणणारे श्रीमान हिंदी लोक मलायात नाहींत काय !......

"हिंदी राष्ट्र हें आत्माहुतीवर श्रद्धा ठेवणारें एक राष्ट्र आहे. हिंदूचें संन्यास हें ध्येय असून फकिरी हें मुसल्मानाचें ध्येय आहे. अडतीस कोटी बांधवाना स्वतंत्र करण्याहून अधिक मोठे, उच्च व पवित्र कार्य दुसरें कोणतें असू शकेल काय ?

"मलायापुढें माझी पहिली मागणी दहा कोटी रुपयांची आहे. मलायातील हिंदी लोकांच्या मिळकतींच्या एकदर किमतीच्या दहा टक्के ही रक्कम भरेल..."

ज्यावेळीं पैसे जमविण्यास सुरुवात झाली त्यावेळीं तेथल्या तेथें जवळ जवळ सत्तर लक्ष डॉलर्स जमा झाले. पुढील चोवीस तासात एकूण एक कोटी तीस लक्ष डॉलर्स जमले.

जर्मन परराष्ट्र मंत्री हर फॉं रिबेन्ट्रॉप यानें जर्मन सरकारतर्फे अधिकृत तार पाठविली असून आझाद हिंदच्या तात्पुरत्या सरकारला मान्यता दिली आहे. स्वतंत्र ब्रह्मदेश सरकार आणि स्वतंत्र फिलिपाइन सरकार यानींहि अशी मान्यता दिली आहे.

२८ ऑक्टोबर, १९४३

कोनान क्लबमध्यें आज रोजीं नेताजींनीं जगातील वार्ताहरासाठीं पुढील विधान केलें :—

नेताजी म्हणतात,

" आझाद हिंदचें तात्पुरतें सरकार स्थापन झाल्याचें माझ्या आयुष्यातील दुसरें स्वप्न सत्यसृष्टींत आलें आहे. राष्ट्रीय क्रांतिकारक सैन्याची उभारणी करणें हें माझें पहिलें स्वप्न होय. तेंहि खरें झालें असून आता फक्त आणखी एक स्वप्न सत्यसृष्टींत यावयाचें आहे. आमच्या स्वातंत्र्यासाठीं लढून तें प्राप्त करून घेणें हें तें स्वप्न होय......

" राष्ट्रवादी हिंदुस्तानचें फार दिवसापासून ब्रिटनशीं युद्धच सुरू आहे हें साऱ्या जगाला ठाऊक आहे. तथापि स्वतंत्र हिंदुस्तानचें तात्पुरतें सरकार आता प्रथमच स्थापन होत असल्यामुळें ब्रिटन व अमेरिका यांच्या-संबंधानें आमचें धोरण काय हें जगाला कळविणें इष्ट आहे. म्हणून या आझाद हिंद सरकारतर्फे इंग्लंड व अमेरिका याजविरुद्ध आम्ही अधिकृतपणें युद्ध पुकारणें हें अवश्य झालें आहे......

" हा युद्धाचा पुकारा म्हणजे केवळ मतप्रचारातील दणकेबाजी नव्हे. आमच्या कृतींनीं आमचें हेतु हे खरे असल्याचें आम्ही सिद्ध करूं. हा निर्णय कृतींत आणणें मला शक्य वाटलें नसतें तर असा निर्णय पुकारण्याची जबाबदारी मीं अंगावर घेतली नसती."

८ नोव्हेंबर १९४३

आयरिश प्रजासत्ताकाकडून नेताजींना गौरवात्मक संदेश आला आहे तो संदेश पाहून नेताजी रोमांचित झाले. तो संदेश आला तेव्हा मी कचेरींत होतें. त्यांनीं तो संदेश आम्हाला वाचून दाखविला आणि 'आयर्लंडच्या रत्नखचित बेटात' (एमरल्ड आइल् ऑफ आयर) त्याना मिळालेल्या अनेक मित्राची आठवण यावेळीं त्याना किती स्पष्टपणें होते हें त्यांनीं आम्हाला सांगितलं. वीराच्या वीरकृत्यांनी पवित्र झालेलीं अनेक स्थळें त्यांनीं पाहिलीं होतीं त्याचीहि आठवण त्यांनीं सांगितली शेवटीं ते म्हणाले, "आमचेंहि कार्य न्यायाचें आहे. आमचींहि मागणी आमच्या जन्मसिद्ध हक्कासाठींच आहे. आम्ही त्याची किंमत देण्यास तयार आहों. म्हणून आम्हीहि विजयी होणारच. हिंदुस्तानचें स्वातंत्र्य आयर्लंडच्या स्वातंत्र्याप्रमाणेच एक दिवस उदित झालेंच पाहिजे."

क्रोआशिया, चीन आणि मॉन्चुक्युओ येथील सरकारानींहि आमच्या तात्पुरत्या सरकारला मान्यता दिला.

८ नोव्हेंबर, १९४३

नेताजी आपल्या अधिकारी मंडळी समवेत—त्यात पी—चाहि समावेश झाला होता—टोकिओला गेले आहेत. बृहत्पूर्व आशियातील राष्ट्रांचा परिषद तेथें भरत आहे सदर परिषदेस एक प्रतिनिधी म्हणून हजर रहाण्याचे नेताजींनीं नाकारलें असून ते तेथें फक्त निरीक्षक म्हणून हजर रहाणार आहेत आम्ही फक्त तात्पुरतें सरकार आहों, भावि हिंदुस्तानच्या वतीनें आम्हा कोणतेहि वचन देऊं घेऊं शक्त नाहीं ही जी आमची भूमिका तिला सुसंगत असेंच हें नेताजींचें वर्तन होते

आदिपद डॉ. बा मॉ यानें हिंदुस्तानच्या स्वातंत्र्यलढ्याला पाठिंबा देण्याचा ठराव मांडला व तो परिषदेनें मान्य केला. हिंदुस्तानच्या प्रश्नां एवढ्यानें तश असा प्रसिद्ध जपानी पंडित डॉ. जुमेरी ओकावा यानें पूर्व

आशियातील शांततेसाठीं हिंदुस्तान स्वतंत्र होणें अवश्य आहे असें आपलें मत तेथें व्यक्त केलें.

जपानी सरकारनें आझाद हिंदच्या तात्पुरत्या सरकारच्या हवालीं अदमान व निकोबार हीं बेटें केलीं आहेत. जनरल टोजोनें अधिकृतपणें ही घोषणा परिषदेंत केली.

नेताजींनीं वृत्तपत्रासाठीं एक मुलाखत दिली. तींत ते म्हणतात,

" हिंदी लोकांच्या दृष्टीनें अदमान बेटें स्वतंत्र होणें ही गोष्ट पहिला हिंदी मुलुख स्वतंत्र झाला असें वाटण्यासारखी आहे. हा मुलुख मिळवून तात्पुरतें सरकार हे केवळ नांवानेंच नव्हे तर प्रत्यक्ष वस्तुस्थितींतहि राष्ट्राचें सरकार बनलें आहे. अदमान स्वतंत्र होणें या गोष्टीला राष्ट्रीय स्वातंत्र्य-लढ्याच्या विजयाचें प्रतीक या दृष्टीनें विशेष महत्त्व आहे. राजकीय बंद्यांचा तुरुंग म्हणून या अदमान बेटाचा उपयोग ब्रिटिशांनीं केला. ज्यांना ब्रिटिश साम्राज्य उलथून पाडण्याच्या कटासाठीं सक्त मजुरीची शिक्षा देण्यांत आली असे बहुतेक शेकडों बंदी या बेटातच कोंडण्यात आले. पॅरिसमधील बॅस्टाइल तुरुंग फ्रान्सच्या राज्यक्रांतींत पहिल्यानें फोडला गेला आणि त्यातील राजबंदी स्वतंत्र करण्यात आले. आमच्या या स्वातंत्र्ययुद्धांत देशभक्तांच्या यातनाचे ठिकाण अशीं अदमान बेटें प्रथम स्वतंत्र होत आहेत. हप्त्याहप्त्यानें हिंदुस्थानचा मुलुख यापुढें स्वतंत्र होईल. पण पहिल्यानें जिंकलेल्या मुलुखाचें महत्त्व केव्हाहि मोठेंच आहे...या अदमान बेटांना आम्ही शहीद बेटें असें नांव हुतात्म्यांच्या स्मरणासाठीं देत आहों. तसेंच निकोबार बेटांना स्वराज्य बेटें असें मानण्यात येईल..."

आमचीं शिरें ताठ आहेत. पूर्वेकडील देशात अथवा पश्चिमेकडील देशात असणाऱ्या कोणाहि राष्ट्रापुढें दुय्यम ठरेल अशी भूमिका आम्हीं घेणार नाहीं.

इटालियन सरकारनें आमचें तात्पुरतें सरकार मान्य केलें आहे.

*२ डिसेंबर, १९४३*

मलाया शाखेचे श्री. टी—यांच्याबरोबर पधरा दिवसाच्या दौऱ्यावर मी गेलें होतें.

आमच्या लढ्याच्या या शेवटच्या अवस्थेंत मलायाच्या लीगला विशेष जिव्हाळ्याचें कार्य करावयाचें आहे. आमच्या सैन्यांतील कांहीं भाग उत्तरेकडे कूच करीत असून त्याला ब्रह्मदेशात ठेवण्याचें ठरलें आहे. ब्रिटन व अमेरिका यांचेशीं आमच्या सरकारनें युद्ध पुकारलें असून तडजोड हा शब्द आमच्या शब्दकोशांतून खोडून टाकण्यात आला आहे. मलाया हें पिछाडीचें मुख्य ठाणें होणार आहे. येथून आझाद फौजेसाठीं स्वयंसेवक अखंड प्रवाहानें पुरविण्यात यावयाचे असून आमचें सरकार व आमचें सैन्य यांचें कार्य चालण्यासाठीं पैसा पुरविण्यात येणार आहे. नेताजी येथें आल्यापासून आय्. आय्. एल्. चें कार्य भक्कम पायावर सुरू झालें आहे. आय्. आय्. एल् च्या शाखा व उपशाखा यांचीहि पुनर्घटना सुरू झाली आहे. नेताजींनीं फौजेसाठीं मलायांतून येत्या सालीं वीस हजार स्वयंसेवक मिळावे असें ठरविले आहे. प्रत्येक हिंदी माणसाला लष्करी शिक्षण देण्यास आम्हीं सुरुवात केली आहे. मग तो फौजेंत स्वयंसेवक म्हणून येणारा असो अथवा नसो. ब्रिटिशांनीं गेल्या शंभर वर्षांत जी गोष्ट हिंदी लोकांना नाकारली ती गोष्ट आमच्या जनतेच्या सरकारनें प्रत्येकाला बिनशर्त देऊ केली आहे. हिंदी लोकांना आपण लढाऊ जमात बनविलें पाहिजे. आमच्यावर ब्रिटिशांनीं जो कलंक टाकला आहे तो नाहींसा केला पाहिजे. तसेंच पुढें येणाऱ्या अनेक प्रसंगासाठींहि एकंदरीनें आमची ही सर्वांगीण तयारी चालली आहे असेंहि मला वाटतें.

आमच्या आय्. आय्. एल्चे सभासद बरेच वाढले आहेत. प्रत्येक हिंदी माणसानें सभासद व्हावें असें नेताजींचें म्हणणें आहे. आतापर्यंत शोनान मधील चौपन्न टक्के हिंदी लोक, जोहोरमधील सासष्ट टक्के हिंदी लोक आणि मलाक्कामधील साठ टक्के हिंदी लोक लीगचे सभासद झाले आहेत.

आय्. आय्. एल्.च्या शाखांचें काम जनतेची सेवा, राजकीय मतप्रचार, रिक्रूट मिळविणें, फंड जमा करणें, सांस्कृतिक कार्ये करणें, इत्यादि प्रकारचें आहे. मीं गेल्या वेळीं भेट दिली त्यानंतर या वेळसचेलों हिंदुस्तानीचे वर्ग अधिक वाढलेले आढळून आले. हिंदी लोकांच्या प्रत्येक वसाहतींत हे वर्ग चाललेले आहेत. ही भाषा शिकण्यासाठीं स्त्रीपुरुष मेहनत करीत नाहींत असें

एकहि जागा मला सापडली नाहीं. अतर्भागातील लोक मुलात. तामीळ असल्यानें हिंदी भाषा शिकण्याचा त्याच्यातील हा उत्साह म्हणजे राष्ट्रवादाच्या भावनेला फार मोठी भरती आल्याचें तें चिन्ह होय. कौलालूंपरमध्यें हिंदुस्तानीचे धडे आकाशवाणीमध्येंहि सांगण्यात येतात.

याचा अर्थ तेथें मुलाना तामीळ भाषा शिकण्यासाठीं शाळा नाहींत असा नव्हे. हिंदुस्तानी प्रचाराचें कार्य रामकृष्ण मिशन करतें आणि आय् आय् एल्. ला इतर अनेक प्रकार तें मिशन साहाय्यहि करतें. हिंदुस्तानांतील हे मिशनरी खरोखर मोठे देशाभिमानी असून दु:खी मानवजातीबद्दल त्यांना वाटणारी आस्था व कळकळ युरोपियन मिशनऱ्यांशीं बरोबरी करणारी आहे.

श्री. के—आम्हाला जोहोर व मलाया येथील दौऱ्यात भेटला. तो प्रमानी धक्का आहे. तो म्हणाला, सभासदत्वाच्या फितींची मागणी फार मोठी आहे. सभासदाची संख्या दोन लक्ष पचवीस हजार पर्यंत गेली आहे. 'कार्यकर्ता' असा शिक्का असलेली व भोवतीं निळी रेषा असलेली नवी फीत आय्. आय्. एल्. च्या कार्यकर्त्यांसाठीं सुरू करण्यात आली आहे. एकन्या मलायांत अशा पधरा हजार फिती वाटण्यात आल्या असें श्री. के—नें सांगितलें. त्याच्या चौवीस तास काम करणाऱ्या स्वयंसेवकानाच ही फीत मिळते. ही फीत धारण करणारे सर्वजण एकमेकांच्या बरोबरीचे मानले जातात, त्याच्या कामाच कमी अधिक महत्त्व लक्षात न घेता समान बंधुत्वाच्या नात्यानें त्यांना रहावें लागतें.

आय् आय् एल् च्या सीलोनच्या खात्यानें काम सुरू केलं आहे.

'पूर्ण स्वराज्य' हें आमचें दैनिक पत्र अतिशय लोकप्रिय झालें आहे. हिंदी लोक वाचू शकतील अशा अगदीं कोनाकोपऱ्यापर्यंतहि तें पत्र जातें. 'जय हिंद' साप्ताहिक हि लोकप्रिय आहे. पेनँग येथील सभेंत दहा मिनिटांत मीं शंभर प्रती विकल्याचें मला आठवतें. शिवाय विकणारे मी एकटीच नव्हतें. केवढीतरी मोठी तुकडी हें पत्र विकण्याचें कार्य करीत होती.

**१० डिसेंबर, १९४३**

आमच्या आय् आय् एल्. च्या कार्यांत सर्व जमातींचे आणि वर्गाचें

मोठें एकजीव असें मिश्रण झालें आहे. नीटपणें विचार करू लागलें तर यात काहीं आश्चर्यहि वाटत नाहीं. जातीय भेदभाव आमच्यात नाहींच मुसलमान, हिंदु, खिस्ती, ज्यू, डुगरा—असे आम्ही सर्वजण एकत्र रावतों आहों.

आमच्या छावण्यातून जातीय प्रश्न आम्ही खरोखर आश्चर्यकारकपणें सोडवला आहे. झाशी–शिक्षण–छावणींत आम्ही सर्वजण एका रांगेत जेवायला बसतों. शाकाहारी व मांसाहारी असे सरमिसळ बसतो प्रथम शाकान्न सर्वांना वाढलें जातें. नंतर मांसान्न खाणारांना मांस व मासे यांच्या थाळ्या देण्यांत येतात. आम्ही सर्व मिसळून बसत असल्यामुळे अन्न खाण्यातलि रिकामी ऐटबाजी अशा रीतीनें मोठ्या दाडगाईनें नष्ट करण्यात आली आहे. अगदीं पहिल्यानें हा मोठा अवघड प्रश्न आहे असें आम्हाला वाटलें, पण आय्. आय्. एल् नें अनेक सभा घेऊन आणि स्वदेशाभिमान हा कोणत्याहि इतर भावनेपेक्षा श्रेष्ठ आहे या मुद्यावर जोर देऊन लोकमत अनुकूल करून घेतलें. ब्रिटिशांच्या भेदनीतीला बळी पडलेल्या हिंदी लोकांचे डोळे उघडण्यास आमचा हा विजय अतिशय उपयोगी पडेल. स्वातंत्र्याचें ध्येय समोर उभें राहिलें म्हणजे जातीयवाद ठार होतो. १९२१ च्या असहकारितेच्या आणि खिलाफतीच्या दिवसात हिंदूंना मुसलमानांच्या मशिदींत आणि मुसलमानांना हिंदूंच्या समारभात बोलावलें जात नव्हतें काय? ज्याना राजकीय ध्येय नाहीं, ज्याना स्वातंत्र्याची आकांक्षा नाहीं अशा गुलामांच्या अंतःकरणात जातीय वाद रुजतो. स्वदेशाचे शत्रु असणाऱ्या आळशी श्रीमंतांची चैन म्हणजे हा जातीयवाद होय.

मला अपशकुनी बातम्या ऐकू येत आहेत. त्या श्री के—नें मला सांगितल्या. त्यामुळे त्या खोट्या असाव्या असें वाटत नाहीं. सुभाषबाबूंच्या नेतृत्वाखालीं आय्. आय्. एल्. चें जें प्रचंड सामर्थ्य वाढलें त्याची जपान्यांना भीति वाटू लागली आहे. हिंदी स्वातंत्र्यासबंधानें नेताजी इतकी शुद्ध राष्ट्रवादी भूमिका घेतील अशी जपान्यांची कल्पना नव्हती. ज्या ज्या वेळीं आपणाला बाहुलें बनविण्याचा प्रयत्न होत आहे असा नेताजींना संशय येतो त्या त्या वेळीं नेताजी जीं धोरणें अवलंबतात त्या त्या प्रत्येक धोरणामुळें

आपला आशाभंग होत आहे असें जपान्याना वाटतें. जपान्याच्या या भीतीचा एक विशिष्ट परिणामहि होतो. चाळीस हजाराहून आमचें सैन्य अधिक का वाढत नाहीं याचाहि यामुळें खुलासा होतो. जपानी ही संख्या अधिक वाढूंच देत नाहींत. तसेंच फौजेंतील सैनिकाच्या रोजच्या गरजासाठीं लागणारा कारखान्यातील माल मिळविण्यात अडचणी येतात. आमच्या सैन्यालाहि मालाचा तुटवडा पडत आहे अशी सबब जपानी सागतात. हें सर्व का ते आता कळतें. जपान्याच्या सबबीस उत्तर म्हणून नेताजींनीं बाजारातील मालाच्या साठ्याकडे बोट दाखविलें तेव्हा नागरिकाची गरज, बाजाराचें नियत्रण आणि वाटप इत्यादी सबबी जपान्याना सागितल्या. श्री. के—मला म्हणाला, आमच्या या अडचणीसबधानें नेताजी अतिशय चिंताग्रस्त आहेत. गेल्या खेपेस झाशीराणी रेजिमेंटला जीं ब्लँकेटें मिळालीं तीं काळ्या बाजारातून घेतलीं होतीं.

*२७ डिसेंबर, १९४३*

९ नोरिस रोड येथें शोनान नॅशनल स्कूलच्या बक्षिस समारभास नेताजी हजर राहिले. त्या शाळेतर्फे एक छोटें पत्रक काढण्यात आलें होतें. त्यावरून त्या शाळेचा राष्ट्रवादी दृष्टिकोन व्यक्त होत होता. तेथें पुढील विषय शिकविण्यात येत होते ......

हिंदुस्तानी, हिंदुस्तानचा राष्ट्रीय इतिहास, गांधीजी, टिळक, पितापुत्र नेहरू, सी. आर. दास इत्यादि राष्ट्रीय पुढाऱ्याचीं चरित्रें, हिंदुस्तानचा भूगोल, सगीत व राष्ट्रीय गीतें, निसर्गाचा अभ्यास, चित्ररेखन आणि हस्तव्यवसाय, गणित, आरोग्यविज्ञान, बागायत, नैतिक शिक्षण, शारीरिक व्यायाम व खेळ, साबण व शाई करण्याच्या पद्धति, इलेक्ट्रो प्लेटिंग, पाणी शुद्ध करणे, सायकल, ग्रामोफोन आणि घड्याळें दुरुस्त करणें. कवायतीमध्यें पायदळ पलटणीस अवश्य असणारें शिक्षणहि देण्यांत येतें.

सदर शाळा स्त्रीपुरुषाना सहशिक्षण देते. बारा वर्षांवरील मुलेमुली घेण्यात येतात. सध्याकाळीं दोन तास चालणाऱ्या वर्गांत प्रौढाना साक्षर बनविण्याचें शिक्षण देण्यात येतें.

एक डॉलरची लहानशी फी होती; पण आतां तीहि फाडून टाकण्यांत आली आहे......

क्रांतिकारक सैन्य या नात्यानें आमची फौज अतिशय काटकसरीनें रहाते. कर्नलचा पगार दरमहा अडीचशें रुपये. मेजरला १८५ रुपये मिळतात. फौजेमधील सर्व सैनिकांना अन्न व कपडे पुरविण्यांत येतात. पण आम्ही क्रांतिकारकांसारखे रहातों. आम्ही शिल्लक टाकतों त्यांतील प्रत्येक पै आय्. आय्. एल्. फंडाला देतों.

या वर्षाच्या अखेरपर्यंत आमचा फंड ७७२७१४७ डॉलर झाला आहे. एकंदर मलायांत सोनानचा नंबर पहिला असून सोनानमध्यें २११४००० डॉलर जमले.

यामध्यें जवाहिरांचा तसेंच देणगी म्हणून दिलेल्या चांदीच्या सामानाचा समावेश नाहीं. तें ८६,००० डॉलर किंमतीचें आहे. आमचे मुख्य हिशेबनीस श्री. एम. यांजपासून मी हे आकडे मिळविले...

अलीकडे पेनँगला नेताजींनी भेट दिली तेव्हां जाहीर सभेमध्यें त्यांनी तात्पुरत्या सरकारसाठीं फंडाची मागणी केली. एक घरकाम करणारा नोकर श्रोत्यांतून पुढें आला व त्यानें चांदीची फुलदाणी नेताजींना नजर केली. त्याच्याजवळ असलेलें सगळें जवाहीर तें एवढेंच होय असें त्यानें सांगितलें. आपल्या कै. मातोश्रींच्या स्मरणानें तें पवित्र झालें आहे असेंहि तो म्हणाला. त्या फुलदाणीचा इतिहास श्रोत्यांना सांगून नेताजींनी तिचा लिलाव केला. २५,००० डॉलरहून कमी किंमतीला ही फुलदाणी मी विकणार नाहीं असें त्यांनी सांगितलें. किंमतीचा [illegible] पाऊस पडला. शेवटीं त्या फुलदाणीचे १,०५,००० डॉलर आले.

*३० डिसेंबर, १९४३*

स्वतंत्र हिंदुस्थानच्या भूमीवर नेताजींनी पाय ठेवला तो स्वतंत्र [illegible] [illegible] बेटांत ठेवला. तेथे पोर्ट ब्लेअरवर त्यांनी हिंदी राष्ट्रध्वज फडकविला.

याच शहीद बेटावर हिंदी क्रांतिकारकांचा अतिशय छळ होऊन त्यांना फारच यातना सोसाव्या लागल्या. जय हिंद !

४ जानेवारी १९४४

कर्नल बी—नें राणी झाशी रेजिमेंटच्या छावणीला भेट देऊन लष्करी शिस्तीवर एक व्याख्यान दिलें.

कर्नल एल्—यानें रेजिमेंट पाहाण्यास येणाऱ्या लीगच्या प्रतिनिधींना या रेजिमेंटसाठीं पुष्कळ सुशिक्षित मुली मिळवून देण्याची विनंती केली.

राणी झाशी छावणीला सेलँगोर संस्थानातून आज सहा नवे रिक्रूट मिळाले. त्यातील दोन कौलालपूरमधून आले आहेत. कौलालपूरमध्यें जिल्ह्याची दुःखनिवारण छावणी स्थापन करण्यात आली असून त्यात सुमारें हजाराहून अधिक माणसें शुश्रूषा करण्यासाठीं ठेवलीं आहेत. सेवाकेंद्राच्या हॉस्पिटलमध्यें गेल्या महिन्यात ४४१ नवीन माणसें शुश्रूषेसाठीं घेण्यात आलीं. औषधी मदत करणें हा प्रश्न आमच्या तुटपुंज्या साधनांच्या दृष्टीनें फार अवघड होऊन बसला आहे.......क्विनीनचा साठा आम्हाला मिळतो न मिळतो तोंच खलास होत आहे.

मी माझ्या कामात फार गोंधळ करतें याबद्दल कॅ. एल्—हिनें मला खडसावलें. तिचं म्हणणें बरोबर आहे. आजवर असें काम मीं कधीं केलेंच नाहीं. माझा जुना इतिहास मला केव्हा केव्हा आठवतो मी एक ऐटबाज अशी धर्ममंदिरातील मुलगी होतें. माझ्या कपडे करण्याच्या टेबलावर प्रिन्स ऑफ वेल्सचें चिन्ह असून त्यावर 'प्रिंसेस भेट' अशी अक्षरें होतीं माझ्या चालण्याच्या स्वरात एक प्रकारचा रसिकपणा असे. एखाद्या तेवढ्याशा गोष्टीनें माझें मन दुखावत असे. आज माझ्यात इतका बदल झाला आहे कीं तीच मी आहें अशी कोणाला ओळखहि पटणार नाहीं.

काल आम्हीं 'चलो दिल्ली' नावाचें छोटें नाटक पाहिलें. लारिस येथील रिक्रूटांनीं तें केलें होतें भारतपुत्रम् आणि जालियनवाला बाग या नावाचीं दोन नाटकेंहि करण्यात आलीं. हीं सर्व नाटकें लोकशिक्षण आणि मतप्रचार या दृष्टीनीं

फार चागलीं आहेत. त्या नाटकामध्यें जनरल डायर ज्यावेळीं गोळीबाराचा हुकूम देतो तो पाहून माझें पित्त खळवळून उठलें. नटाचा अभिनय अत्युत्कृष्ट होता. आमच्या आधुनिक लेखकात साहित्यिकीय गुणांचें पुनरुज्जीवन झालें आहे असें मला वाटते आपण लिहू शकू असे ज्याना कधींच वाटल नाहीं अशानींहि मोठीं स्फूर्तिदायक काव्यें व नाटकें लिहिलीं आहेत परिस्थिति लेखक निर्माण करते हेच खरे. एरवीं असे लेखक यावेळीं का निर्माण व्हावेत, याचा खुलासाच लागत नाहीं. ...

चाळीस हजाराहून अधिक फौज वाढवू नये अशा स्वरूपाची जी बंदी घालण्यात आली आहे तिला बगल देण्याची युक्ति आय् आय्. एल् ने काढली आहे. छावणींतच लष्करी शिक्षणाचा थोडासा शिक्षणक्रम ठेवण्यात आला असून हिंदी स्त्रीपुरुषाना तो घेण्यास सागण्यात येत आहे. सयाम, ब्रह्मदेश आणि मलाया यातील पुष्कळसे लोक आले आहेत. आधुनिक शस्त्र कशीं वापरावी याचें ज्ञान प्रत्येक हिंदी माणसाला असलेच पाहिजे ही नवी घोषणा आहे. प्रत्येकानें आपला लष्करी बाणा परत मिळविला पाहिजे. ल्हान मुलांनींसुद्धा लष्करी बनल पाहिजे म्हणजे मग ब्रिटिश साम्राज्यवादी असोत किंवा जपानी साम्राज्यवादी असोत कोणीच आम्हाला गुलाम करू शकणार नाहींत.

## "चलो दिल्ली"

*८ जानेवारी, १९४४*

अखेरीस आम्ही रगूनला तर आलो. लढणाऱ्या आघाडीच्याजवळ आम्हीं असावें म्हणून ब्रह्मदेशात आमचें आघाडीचें मुख्य ठाणें आणण्यात आलें आहे.

शिवाय दुसरेंहि कारण आहे. नेताजी व दुसरे अधिकारी यांना असा सशय येत आहे, कीं ब्रह्मदेशातून आझाद हिंद फौजेनें तातडतोब चढाई करावी ही गोष्ट जपानी लष्करी अधिकाऱ्याना फारशी आवश्यक वाटत नसावी. पण नेताजींचा त्याबद्दल विशेष आग्रह असल्यानें आम्ही रगूनला येऊन ठाणें दिलें

आहे. जपान्याची कल्पना अशी, कीं इंफाल त्यांनीं प्रथम घ्यावें आणि मागून आझाद हिंद फौजेनें साहाय्य करावें. आमच्या दृष्टीनें ही कल्पना भयंकर आहे. हिंदुस्तानात प्रवेश करण्याची चढाई आझाद हिंद फौजेनें केली पाहिजे, तें आमचें रणांगण आहे.

जनरल लोकनाथन् याला आमच्या तात्पुरत्या सरकारनें शहीद बेटाचा चीफ कमिशनर नेमलें आहे.

२६ जानेवारी, १९४४

आज आम्हीं स्वातंत्र्यदिन साजरा केला. नेताजींनीं मोठें स्फूर्तिदायक भाषण केलें. श्रोतृसमुदाय ६० हजारपर्यंत होता. सात ते दहा मैलांवरून लोक सभेसाठीं चालत आले होते.

सभास्थानीं घडलेली एक घटना नोंदून ठेवावी अशी आहे.

सभेच्या आरंभीं नेताजींना पुष्पहार घालण्यात आला. बोलण्याचे वेळीं त्यांनीं तो पुष्पहार आपल्या हाताभोंवती बांधला. त्याचें तें क्षोभजनक भाषण झाल्यानंतर श्रोत्यांचा उत्साह उतू आला. तो पाहून नेताजींना एक कल्पना सुचली. हा पुष्पहार कोणी विकत घेणार आहे का असा त्यांनीं सवाल टाकला. मिळणारा पैसा फौज फंडात सामील करण्यात येईल असें त्यांनीं सांगितलें. पहिलीच बोली एक लाख रुपयांची आली. कांहीं मिनिटांतच हा आंकडा फुगत गेला. एक लाख—दीड लाख—चार लाख—सव्वाचार लाख—पांच लाख सहा लाख—सात लाख.

एका तरुण पंजाबी धनिक इसमानें पहिली बोली घातली होती. सव्वाचार लाखांवर बोली जाताच तो पांच लाख म्हणून ओरडला. शेवटची बोली सात लाख अशी जाहीर होत असतां तो त्रस्त झालेला दिसला त्याचे अंतःकरणांत खळबळ उडालेली दिसली. हार विकला गेला असें जाहीर करण्यात येणार इतक्यात त्यानें व्यासपीठावर उडी मारली आणि तो मोठ्यानें म्हणाला, "मी माझी सर्व संपत्ति देतों —जे जे कांहीं माझ्याजवळ आहे तें तें देतों. अखेरची पैहि देऊन टाकतों." त्या तरुणाचा थरथरणारा हा

सुभाषबाबूंनीं आपल्या दोनही हातांनीं पकडला. ते म्हणाले, " पुरे, पुरे, हा हार तुझा आहे. आमची फौज जो विजयाचा मुकुट मिळवील तो धारण करण्याची योग्यता तुझ्यासारख्या देशभक्ताची आहे. "

त्या तरुणाला यांतलें कांहींहि ऐकू येत नव्हतें. त्यानें तो पुष्पहार हातानं आवळून धरला आणि आपल्या डोळ्यावर, आपल्या छातीवर तो सारखा दाबीत होता. तो ओरडून म्हणाला, " माझ्या सर्व ऐहिक मिळकतीपासून मी आज स्वतंत्र झालों आहे. मला फौजेचा सदस्य व्हायचें आहे. आमच्या राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या कार्यांत मी माझें जीवित अर्पण करतों. "

* ऐदी धनिक वर्गांतील तरुणाच्या अंतःकरणात केवढा हा चमत्कार घडला. आमच्या नेताजींनींच सरोसर ही स्फूर्ति दिली. आतापावेतों तो पुष्पहार वाळूनहि गेला असेल. त्यातील फुलें मलूल होऊन विस्कटून गेलीं असतील. त्याला आता निर्माल्याचा वास येऊ लागला असेल. उद्या याच फुलांची मृतावस्था त्या तरुणालाहि प्राप्त होईल. पण त्यानें केलेल्या त्यागानें तो सुखी झाला, प्रफुल्लित झाला. तो पुष्पहार घेऊन जाताना त्याच्या डोळ्यात तेज उभें राहिलें.

मला मामिओ मिलिटरी हॉस्पिटलमध्यें ठेवण्यांत आलें आहे. झांशी राणी रेजिमेंटला नर्सिंग आणि रेडक्रॉस हें कार्य देण्यांत आलें आहे. त्यासबंधीं एक सभा आज सध्याकाळीं आम्हीं भरविली. कॅ. एल्—अध्यक्ष होती. आघाडीच्या मागील बाजूस सुरक्षितपणें शुश्रूषा करण्याचें काम आम्हीं पत्करलें नसून रणांगणावरील प्रत्यक्ष कार्य आम्हीं पत्करलें आहे. परंतु अखेरीस तूर्त मामिओलाच जावें असें आम्हीं ठरविलें. प्रथम आम्हीं आशा पाहू आणि मग आमच्या विरोधी मागाच्या मांडू.

माझ्या दुर्दैवलेल्या येण्याबद्दल पी—नें माझी थोडीशी थेट्टा केली तेव्हां मी त्याच्याशीं जवळ जवळ भांडलेंच. मला अतिशय राग आला आहे पण मी आत्मदमन केलें पाहिजे.

१५ फेब्रुवारी, १९४४

मामिओ हॉस्पिटलमध्ये आम्ही स्थायिक झालों आहों. फौजेनें चढाई सुरू केली. जखमी झालेल्या सैनिकांचा पहिला हप्ता आमच्याकडे आला आहे. चढाईच्या कामीं फौजेला यश आलें आहे. ४ फेब्रुवारीला पहिली चकमक उडाली. आजपर्यंत फौजेनें बरीच प्रगति केली आहे.

आम्ही नेताजींकडे पुढील अर्ज धाडला आहेः—

"आमचें शिक्षण समाधानकारक झालें आहे, पण आम्हाला आघाडीवर जाऊं देण्यात येत नाहीं. परिचारिकांची तुकडी एवढाच दर्जा आम्हाला मिळाला आहे. हें अगदींच अयोग्य आहे. आम्हाला अशी वागणूक का मिळते? आम्हाला शूर झांशीची राणी असें नाव तुम्हीं दिलेंत. शोनान येथें ज्यावेळीं प्रथम तुम्हीं आमची लष्करी छावणी उघडली त्यावेळीं आम्ही रणगर्दीत जाऊन त्या शूर राणीप्रमाणें लढू शकूं असें तुम्हीं आम्हाला आश्वासनपूर्वक सांगितलें. आम्ही लढणाऱ्या सैनिकांत असल्याचें शत्रूच्या नजरेस पडलें, कीं शत्रूचा धीर खचेल आणि ब्रिटिश सैन्यांतून हिंदी सैनिक मागें जातील असें तुम्हीं म्हटलें. आतां आम्हाला रणांगणाच्या आघाडीवर जाण्यासाठीं तुम्ही ताबडतोब हुकूम द्या अशी आमची आपणाजवळ विनंती आहे......

"भारतमातेला स्वतंत्र करण्याच्या कार्यांत आम्ही प्राणत्यागास तयार आहों. हा आमचा दृढनिश्चय तुम्हांपुढें सिद्ध करण्यासाठीं या अर्जावर आमच्या रक्तानें आम्हीं सह्या केल्या आहेत."

अर्जावर सह्या करणारींत दोन महाराष्ट्रीय ब्राह्मण स्त्रिया, दोन बंगाली ब्राम्हण स्त्रिया आणि दोन गुजराती वाणी स्त्रिया होत्या. या सहाहि विनलढाऊ जमातींतील होत्या. आम्हीं आमचीं बोटें कापून त्यांतील रक्त सह्या करण्यास वापरलें होतें.

आम्हाला लवकरच उत्तर येईल अशी अपेक्षा आहे. नेताजींवर आमची श्रद्धा आहे. ते आम्हास अंतर देणार नाहींत.

२ मार्च, १९४४

आनंदीआनंद ! चाललों, आम्ही रणावर चाललों. नेताजींचे हुकूम आले असून राणी झाशी रेजिमेंटपैकीं दोन तुकड्याना आघाडीवर जाण्यास फर्माविण्यात आलें आहे. आघाडीवरील परिस्थिति अतिशय बिकट असल्याचा इषाराहि आम्हास देण्यात आला आहे.

पी—! मी चाललें. मी जर परत आलें नाहीं तर दुःख करूं नको. तूं दुसरें लग्न कर. तेंच मला पसत पडेल. पण माझी एक सूचना आहे. राणी झाशी रेजिमेंटमधीलच एकादी कार्यकर्ती तू निवड. रग· फासणारी, ओठ रंगविणारी एकादी बाहुली हल्लींच्या तुझ्या जीवनक्रमानतर तुला उपयोगी पडणार नाहीं.

पंजाबमध्यें दूर असलेल्या माझ्या बाळा ! तुझाहि मी निरोप घेते...

२२ मार्च, १९४४

तात्पुरत्या सरकारनें नवीन विमुक्त झालेल्या प्रदेशावर कर्नल चतर्जीना गव्हर्नर नेमलें आहे. माझ्या कानावर घाणेरडा कुजबुजाट येत आहे. जपानी लोक लबाडीनें वागत आहेत. फौजेतील वीस हजार सैनिक ब्रह्मदेशात आहेत. त्यापैकीं फक्त दहा हजार आज आघाडीवर आहेत. पण त्यातीलहि फक्त पाच हजार प्रत्यक्ष लढत आहेत. त्याचेहि लहान लहान खड पाडून तामू, कोहिमा, पालेमा, टिडिम वगैरे निरनिराळ्या दहा बारा ठिकाणीं त्याना लढाईत गुतविण्यात आलें आहे. सर्व फौज एकाच क्षेत्रात आपली शक्ति का एकवटत नाहीं ? बंगाल व आसाममध्यें एकदम आम्हास त्यामुळेंच घुसता येणार नाहीं काय ? आणि आमचे शिपाई रणागणावर जाण्यासाठीं आतुर झाले असतांना जागच्या जागीं ऐदीपणानें पाय आपटीत बसण्याची ही सक्ती त्याच्यावर काय म्हणून ?

२१ मे, १९४४

आघाडीवरील माझ्या जीवनासंबंधीं मीं आजपर्यंत काहीं लिहिलें नाहीं. माझ्या हातावर आणि डोक्यावर जखम झाली आहे म्हणून आजवर तें अशक्य

"आमचें शिक्षण समाधानकारकपणें व परिपूर्ण होत आहे"

# 'झांशीची राणी'—रेजिमेंट

"आम्हांला आघाडीवर जाऊं देण्यांत येत नाहीं; आम्हांला फक्त शुश्रूषापथकाएवढाच दर्जा दिला आहे, हें असें कां?"

"आमचें पहिलें शिक्षण-शिबिर उघडतांना 'झांशीच्या राणीप्रमाणें रणांत लढण्याची संधि तुम्हांस मिळेल' असें आश्वासन तुम्हीं आम्हांस दिलें."

## 'झांशीची राणी'—रेजिमेंट

"या अर्जांवर आम्ही आमच्या रक्तानें सह्या केल्या आहेत... हिंदुस्तानच्या स्वातंत्र्याच्या कार्यांत प्राणार्पण करण्यास आम्ही सिद्ध आहों असा याचा अर्थ आहे."

झालें. तेथे आम्हाला अहोरात्र अविश्रांत काम करावें लागलें. घडलेल्या हकिगतीचें एकत्र टाचण देतें.

आम्ही आघाडीवर पोचलों त्यावेळीं तेथील परिस्थिति खरोखर अतिशय कठीण होती अन्न, कपडे, दारूगोळा सर्वांचाच पुरवठा कमी होता. पण आम्हीं त्याची पर्वा केली नाहीं. रणांगण म्हणजे एक प्रचंड जंगल होतें. लहान लहान टेकड्या आणि अरुंद अरुंद खिंडी तेथें खूप होत्या. ज्या खेड्यांत आमचें मुख्य ठाणें होतें तेथील खेडुतांनीं लढाऊ स्त्रिया कधींच पाहिल्या नव्हत्या. त्यामुळें आम्ही तेथें प्रदर्शनीय वस्तु बनलों. आमच्यासंबंधींची बातमी पसरतांच दुरून दुरून माणसें आम्हाला पहायला आलीं. पहान्यावर असलेले शत्रूचे सैनिक आम्हीं कैद केले. त्यांनीं सांगितल्यावरून आमच्यासंबंधींची बातमी शत्रूलाहि कळली असल्याचें दिसून आलें.

त्या खेड्यात काहीं दिवस कंटाळवाण्या स्थितींत पाय आपटीत घालविल्यानंतर अखेरीस एकदा लढाईवर जाण्याचा हुकूम आम्हाला मिळाला. बरेंच लांब अंतर चाल करून जावयाचें होतें सकाळीं ३ वा. आम्ही निघालों. पहाटेचा काळोख त्यावेळीं होता. दिवे मुळींच नव्हते आवाज करायचा नाहीं, घोषणा करायच्या नाहींत, अगदीं मुकाट्यानें भराभर चाल करावयाची असा आम्हाला हुकूम होता.

कित्येक मैल आम्ही चालून गेलो असू आतां ही वाट संपणार तरी कधीं असें आम्हाला झालें शेवटीं एका टेकडीजवळ आम्ही पोचलों लढण्यासाठीं निरनिराळ्या भूमिका घेऊन आम्हीं तेथें बसावयाचें होतें ब्रिटिश सैन्य तेथून दूर अंतरावर असून त्याच्यां व आमच्यामध्ये सुमार एक मैलाचा प्रदेश कोणाच्याच राज्यांतील नव्हे असा होता. आम्ही येथें चाल करून येऊं अशी शत्रूला कल्पना नव्हती. म्हणून आमचे सैन्य उभें होतें त्या खिंडींत त्यांनीं सरळ प्रवेश केला. गोळीबार सुरु करण्याचा हुकूम आम्हास मिळणार तरी केव्हां हेंच आम्हाला कळेना शत्रूवर हल्ला करण्याची सुसंधि हातची जाणार कीं काय अशी आम्हास भीति वाटली पण शेवटीं आम्हाला हुकूम मिळाला.

"आम्हांपैकीं कोण जगेल हा प्रश्न गौण आहे."–आसामच्या पहाडांत आझाद हिंद सेना.

सुभाषचंद्र आपल्या अधिकाऱ्यांसंगतीं मोहिमेच्या योजना तपासीत आहेत.

झालें. तेथें आम्हांला अहोरात्र अविश्रांत काम करावें लागलें. घटनेच्या हकिगतीचें एकत्र टांचण देतें.

आम्ही आघाडीवर पोचलों त्यावेळीं तेथील परिस्थिति खरोखर अतिशय कठीण होती. अन्न, कपडे, दारुगोळा सर्वांचाच पुरवठा कमी होता. पण आम्हीं त्यांची पर्वा केली नाहीं. रणांगण म्हणजे एक प्रचंड जंगल होतें. लहान लहान टेकड्या आणि अरुंद अरुंद खिंडी तेथें पुष्कळ होत्या. ज्या खेड्यांत आमचें मुख्य ठाणें होतें तेथील खेडुतांनीं लढाऊ स्त्रिया कधींच पाहिल्या नव्हत्या. त्यामुळें आम्ही तेथें प्रदर्शनीय वस्तु बनलों. आमच्यासंबंधींची बातमी पसरतांच दुरून दुरून माणसें आम्हांला पहायला आलीं. पहाऱ्यावर असलेले शत्रूचे सैनिक आम्हीं कैद केले. त्यांनीं सांगितल्यावरून आमच्यासंबंधींची बातमी शत्रूलाहि कळली असल्याचें दिसून आलें.

त्या खेड्यांत कांहीं दिवस कंटाळवाण्या रितीत पाय आपटीत घालविल्यानंतर अखेरीस एकदा लढाईवर जाण्याचा हुकूम आम्हांला मिळाला. बरेंच लांब अंतर चाल करून जावयाचें होतें. सकाळीं ३ वा. आम्ही निघालों. पहाटेचा काळोख त्यावेळीं होता. दिवे मुळींच नव्हते. आवाज करावयाचा नाहीं, घोषणा करायच्या नाहींत, अगदीं मुकाट्यानें भराभर चाल करावयाची असा आम्हांला हुकूम होता.

कित्येक मैल आम्ही चालून गेलों असूं. आतां ही वाट संपणार तरी कधीं असें आम्हांला झालें. शेवटीं एका टेकडीजवळ आम्ही पोचलों. लढण्यासाठीं निरनिराळ्या भूमिका घेऊन आम्हीं तेथें थांबावयाचें होतें. ब्रिटिश सैन्य तेथून दूर अंतरावर असून त्याच्या व आमच्यामध्यें सुमारें एक मैलाचा प्रदेश कोणाच्याच राज्यांतील नव्हे असा होता. आम्ही येथें चाल करून येऊं अशी शत्रूला कल्पना नव्हती. म्हणून आमचें सैन्य उभें होतें त्या दिशेनें त्यांनीं सरळ प्रवेश केला. गोळीबार सुरू करण्याचा हुकूम आम्हांस मिळणार तरी केव्हां हेंच आम्हांला कळेना. शत्रूवर हल्ला करण्याची सुसंधि हातची जाणार कीं काय अशी आम्हांस भीति वाटली. पण शेवटीं आम्हांला हुकूम मिळाला.

आम्ही स्त्रिया आहोंत याचा आम्हाला विसर पडला. यंत्रातील चाकाप्रमाणें आम्ही अगदीं आपोआप कार्यमग्न झालों होतों. बंदुका, तोफा झाडाव्या, पुन्हा दारू ठासावी, पुन्हा गोळीबार करावा, पुन्हा दारू ठासावी पुन्हा गोळीबार करावा, असा क्रम सतत चालला होता. अखेर सगिनी चढवा असा हुकूम झाला आणि पाठोपाठ हल्ला चढविण्याचाहि हुकूम आला......

मी पुढें मान करून टेकडीच्या उतारानें भरधाव धावू लागलें. माझ्यासमोर चाललेली एक सैनिक भगिनी खालीं आपटली. पण माझा वेग मला थांबवेना. तिच्या लांब पसरलेल्या हातावर माझा पाय पडला. तोंडानें वेड्याप्रमाणें 'जय हिंद'ची घोषणा करीत मी टेकडीच्या उतारानें बेफाट धावत होत्यें. शेजारच्या दुसऱ्या टेकड्यावर सर्वत्र सभोंवार दाट जंगलामध्यें आमचे सैनिक लपून बसले असावेत असें दिसलें. 'इन्किलाब झिंदाबाद' आणि 'आझाद हिंद झिंदाबाद' या आरोळ्या मारीत आम्ही चाललों असतां टेकड्यामधून ध्वनिप्रतिध्वनि निघू लागले. नंतर मला एक टोला बसला आहे असें वाटलें. मी ठेचाळून पडलें. बहुधा मी बेशुद्ध झालें. ज्यावेळीं मी शुद्धीवर आलें त्यावेळीं मला स्ट्रेचरवरून पिछाडीस नेण्यात येत होतें असें मला आढळून आलें. कण्हण्याचा आवाज होऊं नये म्हणून मी दातखिळी घालून राहिल्यें. बिचाऱ्या डोक्याला मात्र भयंकर वेदनांनीं भोंवळ येत होती. पण माझा अहंकार माझ्या वेदनांपेक्षा दुर्दम होता.

मीं डोळे मिटले. स्ट्रेचर वाहून नेणारे लोक दांडगट होते असें मला वाटलें. स्ट्रेचरच्या हालण्यानें मला जोराचे धक्के बसत होते. कितीतरी वेळ गेल्यानंतर मला जमिनीवर ठेवण्यात आलें. रणांगणावरील हॉस्पिटलमध्यें आम्ही गेलों होतों. आता माझ्या जखमा बऱ्या झाल्या आहेत. मी इकडे तिकडे हिंडू फिरू शकतें. पुढें मला कळून आलें कीं आमच्या सगिनींच्या हल्ल्यांची जरूरी नव्हती. शत्रु शरण आला होता. आमच्यातील बरेच लोक घायाळ झाले पण आम्हीं एक बराच महत्त्वाचा विजय मिळविला होता. हिंदुस्तान व ब्रह्मदेश यामधील प्रत्यक्ष सरहद्दीवरच आम्ही आलों होतों आणि त्या दिवशींच्या विजयानें आम्ही हिंदुस्तानच्या सरहद्दींत प्रवेश केला......

# "चलो दिल्ली"

या मामिओ हॉस्पिटलमधून मला रंगूनला परत पाठविण्यांत येत आहे. रंगूनमधील मुख्य ठाण्यावर जाण्याचा मला हुकूम आहे.

मागील तारखेची डायरी मीं लिहिल्यानंतर दरम्यान बऱ्याच हकिगती घडल्या आहेत.

१८ मार्च रोजीं आझाद हिंद फौजेनें हिंदी-ब्रह्मी सरहद्द यशस्वितेनें ओलांडून हिंदुस्तानात प्रवेश केला. त्या दिवशीं हिंदी सैनिकांनीं भारत मातेला 'साष्टांग नमस्कार' घालून तिच्या मृत्तिकेचें चुंबन घेतलें असें मला सांगण्यात आलें. तो देखावा हृदयाला अतिशय चटका लावणारा होता. भारतमातेची मृत्तिका हातात घेऊन 'या झगड्यात आम्ही कच खाणार नाहीं; हिंदुस्तान स्वतंत्र होईपर्यंत आम्ही विसावा घेणार नाहीं,' अशा शपथा त्यांनीं घेतल्या.

दुसऱ्याहि कांहीं चकमकी झाल्या. इंफाळला वेढा पडला. आझाद हिंद फौज व जपानी सैन्य यानीं मोराई, कोहिमा व कित्येक खेडीं घेतलीं. पावसाळा आणि वैमानिक पाठिंब्याचा अभाव या दोन मुख्य अडचणी आल्या. जपानचें वैमानिक दळ कुठें गडप झालें ? आमच्या फौजेजवळ एकहि विमान नाहीं. मणिपुरातून आम्हाला माघार घ्यावी लागली. असें का व्हावें ? विमानदळें नाहींत, अन्न नाहीं, वाहतुकीचीं साधनें नाहींत, इतर रणसाहित्य नाहीं. या सर्वांला जबाबदार कोण ? ऐन संकटाच्या वेळीं जपानी आम्हाला दगा देत आहेत असें मी ऐकतें. परंतु ब्रिटिश सैन्याशीं आमच्या फौजेला ज्या पहिल्या चकमकी करायला मिळाल्या त्यावरून एक गोष्ट निःशंकपणें सिद्ध झाली आहे कीं योग्य संधि मिळाल्यास ब्रिटिशाचा पराभव करून त्याना आम्हीं हांकून लावूं शकू. बिनलढाऊ नागरिकांतून घेतलेल्या रिक्रुटांनीं—कारकून, व्यापारी व मजूर अशानींहि—जें धैर्य, जी चिकाटी व जो रणोत्साह दाखविला त्यामुळें लढाऊ जमाती आणि बिनलढाऊ जमाती या विषयींचे ब्रिटिशाचे सिद्धांत दशदिशा उधळून गेले आहेत. कर्तव्यनिष्ठा आणि शौर्य याचीं अत्यंत थोर अशीं कित्येक उदाहरणें दाखवितां येतील. कपडे पुरेसे नाहींत, धड अन्न नाहीं, दारूगोळा अपुरा आणि वैमानिक संरक्षण तर जवळ जवळ मुळींच नाहीं अशा स्थितींत आझाद हिंद फौजेनें उत्तम शस्त्रसंपन्न अशा ब्रिटिश सैन्याम्

मार्ग हटविले. हातघाईच्या लढाईमध्यें आमचे सैनिक अजिंक्य ठरले असें मी ऐकलें आहे. जंगलांतील माघाच्या चिकाटीनें ते लढले. एकंदरीनें वाघाचें चिन्ह आम्हीं जें पत्करलें तें अखेरीस निरर्थक ठरलें नाहीं. आराकान, इंफाळ, पालेल येथील टेकड्यांतून आमच्या घोषणांचा प्रतिध्वनि कायमचा दुमदुमत राहील. ती भूमि आमच्या रक्तानें शिंपली आहे. आमच्या मरणोन्मुख वीरांच्या श्वासोच्छ्वासानें तेथील हवाहि पवित्र झाली आहे.

२६ मे, १९४४

इंफाळच्या आघाडीवरील चकमकींत घडलेली एक बोधप्रद कथा मीं ऐकली.

एका रणक्षेत्रात ब्रिटिश सैन्यातील हिंदी सैनिक आमच्या फौजेशीं लढत होते.

आमच्या फौजेनें एक फलक, मजकूर लिहून, वर उभारला. 'आमच्या बाजूला या आणि आपल्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं लढा' असा मजकूर त्यावर समोरच्या सैनिकास उद्देशून लिहिला होता.

समोरच्या तुकडींतील हिंदी सैनिकांनी आपल्या बाजूनें एक फलक उभारला. त्यावर 'तुम्ही जपानचे गुलाम आहां. तुम्हांला अन्नाचा तुटवडा आहे. आमच्या बाजूला या म्हणजे पोटभर जेवाल' असें लिहिलें होतें.

तावडतोब आमच्या फौजेकडून उत्तर मिळालें. 'आम्ही जपानचे गुलाम नाहीं. सुभाषबाबूंच्या हुकुमाखालीं आम्ही लढत आहों. अन्नाविषयीं म्हणाल तर गुलामगिरींतील तूपरोटी खाण्यापेक्षां स्वातंत्र्यांतील गवत खाणेंहि अधिक चांगलें'

नंतर आमच्या मावळ्यांनी संग्रामीत गर्जून म्हटलें,

सर पर तिरंगा झंडा जलवा दिखा रहा है
कौमी तिरंगी झंडे ऊंचे रहो जहां में

"चलो दिल्ली"

हो तेरी सरेबंदी ज्यों चाँद आस्माँ में
तू मान है हमारा। तू शान है हमारी
तू जीत का निशाँ हो। तू जान है हमारी
हर एक बसर की लूट पर झंडी है ये दुवाएँ
कौमी तिरंगी झंडा हम शौख से उडाएँ
आकाश और जमीन पर हो तेरा बोलबाला
झुक जाये तेरी पग पर हर ताज तख्तवाला
हर कौम की नजरमें तू आमन का निशाँ हो
हो ऐसी मुअस्सर साया तेरा जहाँ हो
मुश्ताक भी नवाबी खुश हो के गा रहा है
सर पर तिरंगा झंडा जलवा दिखा रहा है
कौमी तिरंगी झंडा ऊँचे रहो जहाँ में

उलट बाजूकडून टाळ्याचा प्रचंड कडकडाट ऐकू आला. नंतर आम्हांला बातमी समजली कीं ब्रिटिश आघाडीवरील ती हिंदी तुकडी मागें घेण्यांत येऊन तेथें ब्रिटिश सैनिकाची तुकडी आणण्यांत आली.

२ जून, १९४४

मी रंगूनला परत आलें आहे. मला घेऊन जाण्यास पी—मामिओ हॉस्पिटलध्यें आला होता. परत येताना आगगाडीमध्यें त्यानें अनेक गंमती सांगितल्या:

आमच्या तात्पुरत्या सरकारच्या दरबारीं जपानचा वकील नेमण्यात आला. तो रंगूनला आल्यावर त्यानें नेताजींची भेट मागितली. नेताजींकडून ताबडतोब उत्तर गेलें, "आमच्या परराष्ट्रमंत्र्याकडे तपासणीसाठीं तुमचीं अधिकारपत्रें पाठवा." त्या वकिलानें उत्तर पाठविलें, "पण माझे कागदपत्र

मागें टोकिओंत राहिले आहेत." पण नेताजींचें उत्तर निश्चयाचें होतें. "तुमचीं अधिकारपत्रें पाहिल्यावाचून तुम्हाला भेट मिळणार नाहीं."

अखेरीस टोकिओहून जरूर ते कागदपत्र येईपर्यंत त्या बिचार्‍या वकिलाला वाट पाहात बसावें लागलें.

आमच्या तात्पुरत्या सरकारच्या नियमाचें बंधन तोडलें जाऊ नये याबद्दल नेताजी नेहमीं काळजी घेतात.

पी—सांगतो, ज्या ज्या वेळीं एकादा जपानी अधिकारी नेताजींच्या समोर येतो त्या त्या वेळीं त्याना तो लवून सलाम करतो, इतकेंच नव्हे तर आपल्या बादशहाच्या फोटोसमोरून जाताना तो जसा सलाम करतो तसा सलाम तो नेताजींच्या फोटोसमोरून जातानाहि करतो.

डॉ. जे—च्या सुटकेची हकिगत पी—नें मला सांगितली. त्याची बायको इंग्रज होती. म्हणून डॉ. जे—हा इंग्रजाचा गुप्त हेर आहे असा संशय घेऊन जपान्यानीं त्याला तुरुंगात ठेवले. त्याला सोडवून घेण्याचे सर्व प्रयत्न फसले. शेवटीं नेताजींकडे अर्ज करण्यात आला. त्या अर्जावर नेताजींनीं लिहिलें, 'तो खरोखरच गुप्त हेर असेल तर त्याला गोळी घालण्याचा अधिकार जपानी सरकारला आहे. पण असें विधान करण्यास कांहींहि आधार नसेल तर तो हिंदी नागरिक आहे या नात्यानें त्याची ताबडतोब सुटका करावी असें मी फर्मावतों.' त्यानंतर डॉ. जे—ची सुटका झाली.

४ जून, १९४४

मी पुन्हा रंगूनला आलें आहे. इंफाळला वेढा पडला त्यावेळीं आमच्या माणसानीं गाजविलेल्या शौर्याची एक हकिगत श्री. के—हा सांगतो.

कांहीं जपानी तुकड्या आणि आमच्या फौजेंतील कांहीं लोक पालेल अगदीं जवळ विमानतळाशीं जाऊन पोंचले होते. रात्रींच्या वेळीं तो विमानतळ उडवून देण्यात यावा असें ठरलें होतें.

आमच्या सैनिकाजवळ अन्नाचा तुटवडा होता. थोडासा तांदुळाचा वाटा

आणि बाकी जंगलातील कदमुळें व रानटी फळ यावर ते तगून राहिले होते. आमच्या फौजेच्या सेनापतीनें त्याच्याच दर्जाच्या जपानी सेनापतीकडे निरोप पाठवून निदान एकवेळचें जेवण शिजवितां येईल एवढा अन्नाचा वाटा जपानच्या साठ्यातून द्या अशी मागणी केली. जपानी सेनापतीनें सभ्यपणें उत्तर धाडलें, "आमच्याजवळहि अन्न कमीच आहे. आज रात्रीं आम्ही जेथे चढाई करणार आहों तेथें अन्न खूप पडलेलं आहे."

आमचा सेनापति चिडला. काहीं झाले तरी रात्र पडण्यापूर्वी आमच्या सैनिकाना मी अन्न मिळवून देणारच अशी त्यानें प्रतिज्ञा केली. आपल्या सैनिकाना एकत्र आणून तो त्याना म्हणाला, "आमच्या समोरच्या विमानतळावरच अन्न मिळणार आहे. आमच्यासाठीं मूठभरहि अन्न जपानी देऊं शकत नाहीत. आम्हीं जपान्याना असें दाखवूं या, कीं आम्ही हिंदी सैनिक आमचे अन्न आमचे आम्ही मिळवू शकतों. उपाशीपोटीं लढूनहि आम्ही विजयी होऊ शकतों. नतर मग आम्हीच उलट त्याना अन्न देऊ. तुमची समति असेल तर आताच आपण विमानतळावर चाल करून जाऊ या."

'जय हिंद'ची प्रचंड घोषणा करून आमच्या फौजेतील सैनिकांनीं त्या विमानतळावर भडिमार केला. हल्ला इतका अचानक आणि भयानक झाला, कीं ब्रिटिश सैनिकाना जमवाजमव करता येण्यापूर्वीच आमच्या सैनिकांनीं विमानतळ काबीज केला.

अशा रीतीनें आम्हीं आमच्या शौर्यानें अन्नहि मिळविले आणि कीर्तिहि मिळविली.

श्री. के—च्या बरोबर श्री. ए—चीं बारा वर्षांची मुलगी होती. ती फार सुदर गाते. तिचा आवाज अतिशय मजुळ आहे. आमचे पुढील चालगीत तिनें गाऊन दाखविलें.

कदम कदम बढाए जा<br>खुशी का गीत गाये जा

जय हिंद

यह जिंदगी है कौम की
तो कौम पै लुटाये जा !
तू शेरे हिंद आगे बढ
मरने से फिर भी तू न डर
आसमाँ तक उठा के सर
जोशे वतन बढाये जा !

तेरी हिम्मत बढी रहे
खुदा तेरी सुनता रहे
जो सामने तेरी चढ़े
तो खाक में मिलाये जा

चलो दिल्ली पुकार के
कौमी निशाँ सम्हाल के
लाल किले गाड़ के
लहराये जा, लहराये जा !

मोइर्या अलीकडील लढण्याच्या काळचें चित्र माझ्या मनापुढें उभें राहिलें. आमच्या स्वातंत्र्यासाठीं किती बहुमोल अशा हिंदी माणसाचें जीवित अर्पण करण्यात येत आहे ! पण आम्ही कचरणार नाहीं. अगदीं असेरच्या सैनिकाच्या हातीं कुन्हाड उरली तरी आम्ही लढत राहू.

"यह जिंदगी है कौम की
तो कौम पै लुटाये जा."

५ जून, १९४४

श्री. आर्—नें सकाळीं चहाच्या वेळीं आमची भेट घेतली. एप्रिलच्या आरभीं आमची आझाद हिंद राष्ट्रीय बँक कशी स्थापन झाली याचें त्यानें वर्णन केलें.

## "चलो दिल्ली"

रंगूनमधील एका कोट्यधीशाशीं नेताजी जमाबंदीच्या प्रश्नाची चर्चा करीत होते. नेताजींनीं त्याला सुचविले, कीं आपली स्वतःची एक बँक असली पाहिजे. स्वतःच्या बँकेवाचून सरकार निर्माण होणें ही गोष्ट अभूतपूर्व आहे. तसेंच इंफाळ जिंकताच आमच्या सरकारला आपले नाणें पाडावें लागेल त्यावेळीं बँक ही अतिशय उपयुक्त ठरेल. अशा बँकेसाठीं तुमच्या सूचना काय आहेत असें नेताजींनीं त्या कोट्यधीशाला विचारलें.

त्यानें उत्तरादाखल नेताजींना विचारलें, "किती भांडवल आरंभीं घालून ही बँक तुम्ही चालू करू इच्छिता?" सुभाषबाबू म्हणाले, "पन्नास लक्ष रुपये असले म्हणजे पुरे." त्याने तात्कडतोब उत्तर केले, "एवढीच तुमची मागणी ? मग मी स्वतः तीस लाख रुपये देतों आणि बाकीचे वीस लाख रुपये एका आठवड्याच्या आत तुम्हापुढें ठेवण्याची हमी घेतों."

आणि खरोखर एक आठवड्याच्या आतच आमच्या बँकेनें कायदेशीर स्वरूप धारण करून व्यवहारासाठीं दरवाजे उघडले. पन्नास लाखाचे भाग काढण्यात आले, त्यापैकीं पंचवीस लाख भरणा करण्याचें भांडवल ठरविण्यात आलें. ब्रह्मदेशाच्या रजिस्ट्रेशन कायद्यान्वयें बँक नोंदण्यात आली. चलनी नोटा आज जशा बाजारात मानल्या जातात त्याप्रमाणें या बँकेवरचे चेकहि आज मान्यता पावले आहेत. सर्व व्यापारी ते चेक स्वीकारतात इतकेंच नव्हे तर जपानी चलनापेक्षा हे चेकच अधिक पसंत करतात.

लोकाचा विश्वास पूर्ण मिळाला असून आमची पत इतकी स्थिर झाली आहे, कीं आतां बँकेच्या तीन शाखा निघाल्या आहेत. आणखी पाच शाखा काढाव्या अशी मागणीहि आहे. सरकारची सर्व रोकड व रोकड मिळविण्याचे मार्ग बँकेनें आपल्या हातीं ठेवले आहेत.

पी—ने गेल्या मे महिन्यातील एक कथा सांगितली. एका तांतडीच्या कामासाठीं नेताजी शोनानला जाण्याकरिता विमानतळावर गेले. ते बरेच व्यग्र दिसले. त्यांच्या मनाला यावेळीं कसली व्यथा आहे याची त्याना भेटायला गेलेल्या आमच्या पुढाऱ्याना कल्पना येईना. एक धनवान चेट्टियर नेताजींच्या

जवळ गेला आणि तुमच्या चिंतेचें वारण करूं शकेल काम असें त्यानें त्याना विचारलें. नेताजी म्हणाले, " खर्चाला पैसा कुठून आणावा हा प्रश्न आहे. तुम्ही रंगूनमधील लोक माझी अडचण भागवूं शकाल असें वाटत नाहीं. मला आताच एका रकमेनें वीस लाख रुपये पाहिजेत. फौजेच्या गरजेसाठीं ही रक्कम हवी आहे फौजेवरचा सध्याचा प्रसंग आणीबाणीचा असून तिला तातडीनें कुमक पाठविली पाहिजे."

दरम्यान विमान निघून जाण्यासाठीं तयार झालें आणि नेताजी त्यात जाऊन बसले, पण कांहीं अज्ञात कारणामुळें त्या विमानाला दहा मिनिटें उशीर झाला इकडे त्या चेट्टियरनें जमलेल्या पुढाऱ्यापुढें हा प्रश्न टाकला. भराभर निर्णय ठरविण्यात आले आणि सुभाषबाबूंचें विमान सुटण्यापूर्वीं वीस लाख रुपये कोण कोण मिळून देणार त्याची यादी सुभाषबाबूंपुढें ठेवण्यात आली. तेथें हजर असलेल्या लोकांनींच ती सर्व रक्कम देण्याचें ठरविलें होतें.

४ जुलै हा नेताजींनीं पुढारीपण स्वीकारल्याचा वाढदिवस होता. त्या दिवशीं नेताजींची जवाहिरानीं तुळा करावी अशी मीं सूचना केली. स्त्रियानीं आपल्या बांगड्या, माळा आणि आंगठ्या द्याव्या अशा आशयाचें विनंतिपत्रक स्त्रियाना उद्देशून काढण्याचें ठरलें. श्री. सी—च्या मतें ही सूचना फार चांगली आहे. आमच्या स्त्रीशाखेला ती सूचना घेण्यासंबंधीं मी लिहीत आहें.

डॉक्टर मला हिंडूं फिरूं देतील व काम करूं देतील तर फार बरें होईल. हा बरें होण्याचा काळ अतिशय जिकिरीचा आहे.

जपानी सैनिक कोहिमातून मार्गे हटले काय ? दिल्ली रेडिओ असें सांगतो. पी—कडून खरी हकिगत समजून घेतली पाहिजे.

ब्रह्मदेशात जेथें जेथें हिंदी लोकांच्या वसाहती आहेत तेथें तेथें पहारा करण्याचें काम फौज करीत आहे. हिंदी जीवित व वित्त याचें कोणत्याहि संकटापासून आम्ही रक्षण करूं.

—

१३ जून, १९४४

आज रोजीं मिसेस् एच्—तिच्या दोन मुली व मुलगा यानीं मला भेट दिली. मी येथून गेलें असतांच्या काळात बऱ्याच गमतीच्या गोष्टी घडल्या असें

दिसतें. नेताजींच्या सूचनेवरून सर्व पूर्व आशियाभर एक बालकसेना उभारण्यात आली आहे. मी त्या मुलाच्याशीं बोललें त्यावरून ही बालकसेना खरोखर मुलांमध्यें क्रांति घडवून आणीत आहे असें मला दिसून आलें.

मिसेस एच—ने तिचा शेजारी डॉ. पी—याची हकिगत सांगितली. जपानी सैन्यानें त्याना पकडून अटकेंत ठेवलें होतें. जपानी लष्करी अधिकाऱ्याना डॉ. पी—चा संशय आला होता. त्याची बायको अतिशय दु:खग्रस्त झाली. काय करावें हें तिला सुचेना. अनेक उपाय करून झाल्यानंतर मिसेस एच्—नें तिला नेताजींकडे नेलें. त्यानीं तिची कथा ऐकली. नतर तिच्या अर्जासोबत डॉ. पी—च्या सुटकेच्या मागणीचें एक पत्र नेताजींनीं पाठवलें. जेव्हा मिसेस पी—नेताजींचें पत्र घेऊन जपानी पोलीस इन्स्पेक्टरकडे गेली तेव्हा तो गुरगुरून म्हणाला, "हिज एक्सलन्सी मि. बोस याना आमच्या कार्यांत हस्तक्षेप करण्याचा कांहींहि अधिकार नाहीं."

'तुम्ही आपल्या वरिष्ठांचा सल्ला' घ्या असें मिसेस पी—नें त्या अधिकाऱ्याला सुचविलें. त्यानें त्याप्रमाणें सल्ला घेतला. वरिष्ठानें तिला भेटीस बोलावलें. नतर पोलीस कमांडरनेंहि तिला बोलावणें पाठवलें व तो म्हणाला, "माझ्या इन्स्पेक्टरनें काढलेल्या उद्गाराबद्दल मी तुमची माफी मागतों. हिज एक्सलन्सी मि. बोस यानीं तुमच्या अर्जावर एकदां सही केल्यानतर आमच्या बादशहानें सही केलेल्या अर्जाइतकाच अधिकार त्या अर्जासहि प्राप्त होतो. डॉ. पी—च्या सुटकेचा मी हुकूम देत आहें."

ही कांहीं एकुलती एक नवी कथा नव्हे. शोनानला जेव्हा नेताजी प्रथम आले तेव्हा पुष्कळ हिंदी लोकाची अशीच सुटका झाली. इग्रजाचे गुप्त हेर असल्याच्या संशयावरून चारशें हिंदी लोक तुरुगात खितपत पडले होते. त्याना कठोर रीतीनें वागविण्यात आलें, त्याचा छळ झाला, त्याची उपासमार करण्यात आली आणि त्यांना धक्काबुक्कीहि सोसावी लागली. सुभाषबाबूंनीं पहिली गोष्ट केली ती ही, कीं त्याच्यावरील आरोप समजून घेण्याची मागणी केली. प्रत्येक आरोपाचा त्यानीं विचार केला. कांहीं बद्याना ते स्वत. भेटले. बाकीच्याच्या

भेटीस त्यांनीं आमच्या पुढाऱ्यांना पाठविलें. नंतर आय्. आय्. एल्. ला पाठिंबा देतों असें आश्वासन देणाऱ्या प्रत्येकाला मुक्त करण्यात आलें. ज्या मूठभर लोकांनीं असें वचन दिलें नाहीं त्याचासुद्धा छळ होऊ नये अशी तरतूद नेताजींनीं केली.

२० जून, १९४४

अमेरिकन सुपर फोर्ट्रेसेसनीं जपानच्या मुख्य बेटावर हल्ला केल्याची बातमी आहे. पण नुकसान फार झालें नसल्याचें समजतें.

४ जुलैला नेताजींची जवाहिरांनीं तुळा करावी ही माझी सूचना मान्य झाली आहे. एका मद्रासी स्त्रीनें आपले सर्व दागिने देऊन टाकले. मी माझे सर्व झूल आणि हार देऊन टाकले आहेत. बांगड्यांचे दोन जोड ठेवून बाकीच्या मीं देऊन टाकल्या.

श्री. एम्—सांगतो, आय्. आय्. एल्. चा फंड १,३३,५०,००० रुपये झाला आहे. एका मे महिन्यात जवळ जवळ चौदा लाख रुपये एकट्या मलायात मिळाले. मलायामध्यें आय्. आय्. एल्. च्या शाखा आणि उपशाखा सत्तर झाल्या आहेत. मीं आज मुख्य ठाण्यास भेट दिली. तात्पुरत्या सरकारचीं संपूर्ण एकोणीस खातीं तेथें काम करीत आहेत.—कोणाचा विश्वास तरी बसेल का ह्यावर ? पण मीं तीं स्वतः मोजून पाहिलीं. मुख्य खातीं म्हणजे पुरवठा, जमाबंदी, हिशेब, रिक्रूटिंग आणि रिक्रूटांचें शिक्षण, वृत्तपत्रें आणि मतप्रचार, स्त्री विभाग, शिक्षण, सार्वजनिक आरोग्य, समाजसेवा आणि पुनर्घटना हीं होत. ब्रोनानमध्यें पिछाडीचें मुख्य ठाणें आहे तेथें हींच सर्व खातीं मलाया, सुमात्रा, जावा, आणि बोर्निओ यासाठीं चालतात.

मला असें समजतें, कीं ब्रह्मदेशातील शाखा आणि उपशाखांची संख्या मलायांतील शाखांच्या संख्येपेक्षां मोठी आहे. येथें शभर शाखा आहेत. सयाम-मध्यें चोवीस शाखा असून सुमात्रा, जावा आणि बोर्निओ येथेंहि स्वतंत्र शाखा आहेत. फौजेच्या शिक्षणछावण्यांची संख्याहि वाढली आहे. आतां मलायांत

चार शाखा असून एका वेळीं सात हजार सैनिकाना त्या शिक्षण देतात. ब्रह्मदेशांत चार शाखा असून त्या तीन हजाराना एकदम शिक्षण देऊं शकतात. सयाममध्यें एक शाखा असून एक हजाराच्या शिक्षणाची सोय तेथे होते. या सामान्य सैनिकाच्या शिक्षण शाखा होत. अधिकाऱ्याच्यासाठीं दोन शाखा आहेत; एक शोनानमध्ये व दुसरी येथें रंगूनमध्ये. आतापर्यंत जवळजवळ दोन हजार अधिकाऱ्याना शिकवून तयार करण्यात आलें आहे.

मुल्की अधिकाऱ्याच्या शिक्षणासाठीं शोनान व रंगूनमध्यें पुनर्घटना खात्यामार्फत दोन केंद्रें सुरू करण्यात आलीं आहेत. जो मुलुख स्वतंत्र करण्यात येईल तेथें तात्पुरत्या सरकारचे प्रतिनिधी म्हणून हीं माणसें कारभार करतील. आमच्या चळवळीचा मुख्य आधार खरोखर मलाया हाच आहे. आमच्या मलायातून आम्ही वीस हजार नागरिक दिले आहेत. पैसा आणि इतर साहित्य याबाबत ब्रह्मदेश, सयाम अथवा पूर्व आशियातील कोणताहि भाग यापेक्षा आमची देणगी अधिक मोठी आहे.

दुःखनिवारणाच्या कार्यासंबंधानें बोलावयाचें तर मलायामध्यें एक मोठी योजना पार पाडण्यात आली आहे. सुमारें वीस हजार एकर जंगल तोडण्यात येऊन आमच्या वसाहतकाराना तेथे मळे करण्यासाठीं जमीन देण्यात आली आहे. अतिशय चांगलें पीक देणारी ती जमीन आहे. आमच्या मलाया शाखेनें या लोकाना मळे करण्यासाठीं जरूर लागणारीं हत्यारें, बीं—बियाणें, घरें बांधण्याला सोयीसवलती आणि काहीं कर्ज दिलें आहे. यामुळें त्याना आपलें नवीन जीवन सुरू करता येईल. आमच्या दुःखनिवारण केंद्रावरील भार यामुळें कमी झाला आहे.

आज मी आमच्या शिक्षणखात्यात गेले होते. तेथें श्री. ए—शीं माझी भेट झाली. एकट्या ब्रह्मदेशात पासष्ट शाळा आहेत असें त्यानें मला सांगितलें. प्रत्येक प्रदेशात आता राष्ट्रीय शाळा सुरू आहेत. मलायात पन्नास आहेत. मुलें आणि प्रौढ याना हिंदुस्तानी शिकवणें हे या शाळाचें मोठें आश्चर्यकारक कार्य आहे. श्री. ए—म्हणाला शिक्षणखात्याच्या अदमासानें हिंदुस्तानी भाषा आ

घरोघरीं पोंचली आहे. नुसतें बाजारी हिंदुस्तानी नव्हे तर शिक्षकाजवळ बसून शिकलें जाणारें हिंदी इतकें प्रसृत झालें आहे, आमच्या लोकसंख्येपैकीं पुष्कळसा भाग तामिळी मजुराचा आहे हें लक्षात ठेवलें पाहिजे. केवढें राष्ट्रोद्धारक कार्य हें !

ब्रह्मी लोकाना त्याच्या छावण्यामधून लष्करी शिक्षण देण्याचे कार्य आमचे लष्करी अधिकारी करीत आहेत. आम्हाला शक्य आहे ती मदत आम्ही करीत आहों. आमचें तुटपुंजे अन्न आणि युद्धसाहित्य यातहि त्याना भागीदारी देत आहों. जपान्यानीं हिंदी लोकाइतकीहि ब्रह्मी लोकाची काळजी केली नाहीं. पण आजकाल हेंच चालू आहे. यात विशेष काहीं वाटत नाहीं.

## २१ जून, १९४४

आज कर्नल ए—ची भेट झाली. आमच्या फौजेतील जातीय भावना नष्ट करण्यासंबधानें योजलेल्या उपायाविषयीं त्यानें फार प्रशंसा केली. पजाबी व मद्रासी याना वेगळे स्वैंपाक असत. हा व असले प्रकार आजिबात बद करण्यात आले आहेत. सर्व रिक्रूट एका रागेत व एकत्र बसतात. प्रत्येक रिक्रूटाला एक थाळी देण्यात येतें. शाकाहारी माणसाला पहिल्यानें वाढण्यात येतें. वाढपी दुसऱ्या खेपेस येतात तेव्हा मास खाणाराठीं मास आणतात. जेवणारे सर्व सरमिसळ बसतात. फौजेंतील वातावरण फार मजेदार आहे. कर्नल ए—म्हणाला, अशा फौजेसाठीं मी प्राणार्पणाहि करीन. ही खरोखर वैराग्यसपन्न वीराची सेना आहे. येथें घाणेरड्या लैंगिक चर्चा इतर सैन्यातल्या प्रमाणें चालत नाहींत. उच्च तत्त्वाला वाहिलेले सैनिक येथें आहेत. त्या उच्च तत्त्वामुळें त्याना हुरूप रहातो. भाडोत्री सैनिक हे पैसा आणि बेताल जीवन यांचेंच चिंतन करीत असतात. अशा भाडोत्र्याहून या सैनिकाची भूमिका खचित वेगळी असणारच. या फौजेंत एकहि दारुडा नाहीं. जो दारू पिईल त्याची खरडपट्टी काढून त्यास हाकून लावण्यात येतें हें प्रत्यकास माहीत आहे. येथें सर्व कारभार लोकशाही पद्धतीनें चालतो. एकाच समान कार्यात राबणारे सर्व बधू शिस्त जी पाळतात ती अधिकाऱ्यांची ऐटबाजी आणि सर्व याचें

समाधान करण्यासाठीं नसून संघटना चालण्यासाठीं शिस्त अवश्य आहे म्हणून पाळतात.

मी मुख्य ठाण्यावर आज सकाळीं गेलें होतें. आरोग्य आणि समाजसेवा खात्यामध्यें मी शिरलें. डॉ. मिस् जे—तेथें मला भेटली. आय्. आय्. एल्. नें पत्करलेल्या राजकीय कार्याइतकेंच तिनें पत्करलेलें समाजसेवा कार्यहि महत्त्वाचें आहे हा मुद्दा तिनें मला विशेष जोर देऊन समजावून सांगितला. ती म्हणाली, आय्. आय्. एल्. नें जर हें खातें बंद केलें तर विपत्ति आणि रोगराई यांनीं आमची लोकसंख्या घटून जाऊन आमच्या राजकीय कार्याला पाठबळ मिळविणें अशक्य होईल. ती म्हणाली, " आम्ही शेकडों डॉक्टराना जागोजाग पाठवून मलायांतील दूरवरच्या जंगलात व ब्रह्मदेशात विपद्ग्रस्ताना साहाय्य देण्याचीं केंद्रें स्थापन केलीं आहेत. आम्ही औषध फुकट वाटतों. जेथें जेथें जरूर पडेल तेथें तेथें मोफत अन्नछत्रें घालतों. शेकडों पौंडाचे क्विनीन आम्हीं वाटलें आहे. कौलालंपूरच्या एका दुःखनिवारण—छावणींत रोज एक हजार स्त्रिया, पुरुष व मुलें याना साहाय्य देण्यात येतें. त्या छावणीचा महिन्याचा खर्च ७५००० डॉलर्स आहे. सर्व ब्रह्मदेशभर व मलायाभर जागोजाग शेकडों मोफत दवाखाने आहेत. शिवाय आमचीं हॉस्पिटलें व विश्रामकेंद्रें आहेत. कालेवा येथील आमच्या आरोग्यकेंद्रानें हजारों लोकाना मदत केली आहे. सयाममध्यें हिंदी लोकासाठीं सर्व साहित्यानें भरलेलें एक मोफत हॉस्पिटल आहे. मामिओ हॉस्पिटलची जपानी व ब्रह्मी यानींहि प्रशंसा केली आहे. आम्हाला औषधें नव्हतीं; उपचाराचीं साधनें नव्हतीं, तरीहि आम्हीं मोठें यश मिळविलें."

१ जुलै, १९४४

आज श्री. के—जेवणास आला होता. तो आमचा ऑडिटर–जनरल आहे.

या माझ्या पाहुण्यासंगतीं बसून एका ब्रह्मी माणसाला आपलें जमाखर्ची खातें कसें चालवतो हें त्यानें समजावून सांगितलेलें मीं ऐकलें. तो म्हणाला,

" सार्वजनिक सभातून होणाऱ्या लिलावांनीं वगैरे 'मिळणाऱ्या ऐच्छिक देणग्या या आमच्या उत्पन्नाचा मोठा वाटा आहेत. पण तेवढ्यानें आमचा सर्व खर्च निभत नाहीं. निदान पधरा कोटी रुपयाची गरज आहे. म्हणून तात्पुरत्या सरकारनें हिंदी लोकांवर कर बसविला आहे. त्या त्या सालीं झालेल्या उत्पन्नावर अथवा मिळविलेल्या नफ्यावर हा कर आकारण्यात येत नाहीं. या कराची पद्धत अशी —प्रत्येक हिंदी माणसाचें भांडवल किती आहे याचा अदाज करण्यासाठीं प्रथम प्रमुख व्यापाऱ्यांची एक समिति नेमण्यात आली. नतर त्या मिळकतींतील दहा टक्के रक्कम सरकारी कर म्हणून भरावी असें ठरविण्यात आलें. सरकारला हा कर किती हप्त्यांनीं भरावयाचा हेहि त्या समितीनेंच ठरविलें. आझाद हिंद राष्ट्रीय बँकेनें हे सर्व कर सरकारच्या नावानें स्वीकारले.

हा कर फक्त हिंदी लोकांकडूनच वसूल करण्यात आला. कर चुकविणाराचीं उदाहरणे घडलीं. काहींनीं आपण ब्रह्मी आहों म्हणून करापासून मुक्त रहाण्याची मागणी केली. दुसऱ्यांनीं काहीं खऱ्या खोट्या सबबी सांगितल्या. जे ब्रह्मी होते त्यांच्याकडून कर घेतला नाहीं. मात्र आझाद हिंद फौज यापुढें त्यांचें रक्षण करणार नाहीं असेंहि त्याना कळविण्यात आलें. सबबी सागणाराना अपिलें करावीं लागलीं आणि थोड्या दिरगाईनतर अखेरीस त्याना कर भरावे लागले. ब्रह्मदेशातून आठ कोटी रुपये वसूल होतील असा अदाज आहे. पैकीं सुमारें साडेतीन कोटी रोकड आणि चाळीस लाखाचा माल वसूल झाला आहे.

" आमचीं पोटें मोकळीं आहेत. पोटावरचे पट्टे आम्ही आवळले आहेत. तरीपण जपान्यांकडून अथवा दुसऱ्या कोणत्याहि सरकारकडून आम्ही कर्जें काढलेलीं नाहींत. आम्हाला एक गोष्ट माहीत आहे. आज जर आम्हीं कर्जें काढलीं तर आमच्या राष्ट्राचें उद्यांचें आर्थिक स्वातंत्र्य आम्ही सकटात टाकीत आहों. म्हणून आमच्या मित्रांकडूनहि आम्ही कर्जें घेत नाहीं, दुसना पैसा आम्ही काढीत नाहीं. एका मूलभूत सिद्धातावर आमचें जमाखर्चाचें धोरण आधारलेलें आहे. हिंदी लोक हे स्वतःच्या पायावरच उभे राहतात. दुसऱ्यांनीं दिलेलें टेकण ते स्वीकारणार नाहींत यामुळें जपानशीं आमच्या वागण्यात



"निविड अंधार असो अथवा प्रकाश असो, दुःख असो की सुख असो,
असोत का विनय असा मी तुमच्या बरोबर राहीन, अशी तुम्हाला खात्री दे



"ईश्वराचें नामस्मरण करून मी शपथ घेतें कीं हिंदुस्तान व त्यांतले माझे ४० कोटि देशबांधव यांना स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठीं झटण्याची मी प्रतिज्ञा करतें."

— मेजर लक्ष्मी स्वामिनाथन्.

आम्हाला खूपच स्वातन्त्र्य मिळालें आहे. तसेंच आमच्या शत्रूनाहि आमच्या राष्ट्राचें भावि स्वातन्त्र्य आम्हीं विकून टाकलें असें म्हणण्याला काडीइतकाहि आधार आम्हीं ठेवलेला नाहीं.

" आमच्या छावणींत जपानी शिक्षक नाहींत अथवा आमच्या अधिकारी मंडळात जपानी किंवा जर्मन तज्ञ नाहींत किंवा आमच्या सैनिकाना रणांगणावर मार्गदर्शन करण्यास जपानी अधिकारी नाहींत या सर्वांचें हें कारण आहे. आमची फौज नखशिखान्त हिंदी आहे "

४ जुलै, १९४४

सुभाषबाबू २ तारखेस आघाडीवरून आले. गेले दोन महिने ते सर्व आघाडीवर हिंडत असून फौजेच्या सैनिकाना व्यक्तिशः उत्तेजन देत आहेत.

आज नेताजी सप्ताह सुरू झाला. गेल्या वर्षी आजच्या दिवशीं शोनान परिषदेमध्यें पूर्व आशिया चळवळीचें नेतृत्व सुभाषबाबूंनीं स्वीकारलें. ४ जुलै! गेल्या वर्षी ४ जुलै या दिवशीं तीस लाख हिंदी लोक सुभाषबाबूंच्या पाठीशीं उभे राहिले आणि त्यांनीं ' स्वातन्त्र्यप्राप्ती अथवा आत्मार्पण ' हीच आपली घोषणा राहील अशा शपथा घेतल्या.

आज पुन्हा एकदा ज्युबिली हॉल गच्च भरून गेला होता. रस्त्यावर लाउडस्पीकर्स लावले होते त्या सर्व भागात दगडाऐवजीं माणसाच्या डोक्यानीं भूपृष्ठ बांधून काढलें आहे असें तें दृश्य दिसत होतें. बाहेरची सडक, इमारतीच्या पायऱ्या, दिवाणखाना व त्याजवळच्या खोल्या व प्रत्येक कोनाकोपरा गर्दी करून झगडणाऱ्या माणसांनीं भरून गेला होता.

सुभाषबाबूंनीं पुढीलप्रमाणें भाषण केलें —

" गेल्या बारा महिन्यातील आमची कामगिरी पुढीलप्रमाणें सारांश रूपानें सांगता येईल.

१ 'सबंध जमावट' ('टोटल मोबिलायझेशन्') या तत्वाच्या कार्यक्रमाप्रमाणें माणसें, पैसा व साहित्य आपण जमवूं शकलों आहों.

२ आधुनिक युद्धाला योग्य असें आमचें सैन्य शिकवून तयार करून आम्हीं तें खूप वाढविलेंहि आहे.

३ आमच्या सैन्यात झाशी राणी रेजिमेंट या नावाची एक तुकडी आम्हीं तयार केली आहे.

४ आर्ही हुकुमत ए-आझाद हिंद नावाचें आमचें स्वतःचें सरकार आम्हीं स्थापन केलें असून नऊ मित्रराष्ट्राकडून आम्हीं मान्यता मिळविली आहे.

५ अंदमान व निकोबार बेटात आम्हीं प्रथम स्वतन्त्र मुलुख मिळविला.

६ आम्हीं ब्रह्मदेशात आमचें ठाणें नेलें आणि १९४४ च्या फेब्रुवारी-मध्यें आमचें स्वातन्त्र्ययुद्ध आम्हीं सुरू केलें, २१ मार्च रोजीं आम्ही हिंदुस्तानात पोचलो आहों असें आम्ही जगाला जाहीर करूं शकलों.

७ वृत्तपत्रें, मतप्रचार व प्रकाशन या खात्याचें कार्य आम्हीं पुष्कळ वाढविलें आहे.

८ स्वतंत्र हिंदुस्तानची पुनर्घटना व राज्यकारभार याची जबाबदारी घेण्याकरिता आझाद हिंद-दल नावाची एक नवी संघटना आम्हीं स्थापन केली आहे.

९ आमच्या स्वत.ची एक बँक—नॅशनल बँक ऑफ आझाद हिंद लिमिटेड—आम्हीं ब्रह्मदेशात स्थापन केली असून स्वतन्त्र हिंदुस्तानात चालविण्या-करिता आमचें स्वत.चें नाणें पाडण्यासाठींहि आम्हीं हुकूम दिला आहे.

१० रणक्षेत्राच्या प्रत्येक विभागात आम्ही आमची कामगिरी उत्तम बजावली आहे. आमचे सैनिक हिंदुस्तानात लढत लढत शिरत असून सर्व अडचणींना व संकटांना न जुमानता हळूहळू पण निश्चयानें प्रगति करीत आहेत......

## "चलो दिल्ली"

"एक काळ असा होता, कीं हिंदी राष्ट्रीय सैन्य रणांगणावर जाईल कीं नाहीं आणि गेलें तर शत्रुसैन्याचा पराभव करील कीं नाहीं याबद्दल लोकांना शंका असे. या कसोटीस आम्ही उतरलों आहों. त्यामुळें आमच्या ठिकाणीं अमर्याद उत्साह उत्पन्न झाला आहे......

"हिंदुस्तानच्या भूमीवर युद्ध सुरू झाल्यानंतर आता हें युद्ध खरोखर आमचें युद्ध झालें आहे, या भावनेनें आमच्या युद्ध लढणाऱ्या सैनिकांच्या ठिकाणीं नवा उत्साह जागृत झाला असून लढणाऱ्या सैनिकांच्या पाठीशीं असणाऱ्या लोकांतहि उत्साहाचें भरतें आलें आहे.

"आतांपावेतों आमच्या सैनिकांकडून त्यांना सोसाव्या लागणाऱ्या यातनांबद्दल एकहि तक्रार आली नाहीं. तक्रार एकच ऐकूं येते तीहि. सैनिकांना पुढें जाण्यास हुकूम मिळण्यास विलंब लागतो तेव्हा ऐकूं येते. उदाहरणार्थ, मी नुकताच एका हॉस्पिटलमध्यें गेलो होतों. तेथें जखमी झालेले, अथवा मलेरिया किंवा दुसरा कांहीं रोग झालेले सैनिक होते. या सर्व सैनिकांनीं आपण बरे होताच आपल्याला आघाडीवर पाठवा अशी विनंति केली. हीं सर्व माणसें आघाडीवर लढलीं असून तेथील परिस्थिति त्यांना माहीत आहे. तरी पण ते अत्यंत आनंदी व आशावादी होते. मुळींच अतिशयोक्ति न करतां मी सांगूं शकतों, कीं ही अमर्याद आशावादाची भावना पूर्व आशियांतील सर्व हिंदी लोकांत पसरली आहे.......

"आमचा आशावाद अधिक बळकट होण्याचें आणखी एक कारण आहे. हिंदुस्तानांतील अंतर्गत परिस्थिति हें तें कारण होय. तुम्हाला माहीतच आहे, कीं काँग्रेसपक्ष आणि ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें समेट झालेला नाहीं. कांहीं दिवसापूर्वी महात्मा गांधींची जेव्हा अचानक सुटका झाली त्यावेळीं ही सुटका केवळ आजारीपणामुळें आहे कीं समेटाची ती केवळ प्रस्तावना आहे याबद्दल तर्कवितर्क चालले होते. आतां एक गोष्ट स्पष्ट झाली आहे, कीं गांधींची सुटका त्यांच्या आजाराच्या कारणामुळेंच झालेली असून तींत कोणताहि राजकीय हेतु नाहीं. महात्मा गांधी आणि ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें जोंवर तडजोड झालेली,

नाहीं तोंपर्यंत आम्हाला चिंता करण्याचें कारण नाहीं...कॉंग्रेस आणि ब्रिटिश सरकार याच्या दरम्यान हिंदुस्तानात समेट न होईल तर आमचें कार्य अधिक सुकर होणार आहे. अजूनपर्यंत तरी समेटाचीं मुळींच चिन्हें नाहींत आणि आम्हाला विशेष उत्तेजन वाटण्यासारखी गोष्ट ही, कीं दोन वर्षांपूर्वी 'हिंदुस्तानातून चालते व्हा' हा ठराव करताना जी भूमिका गांधींनीं घेतली ती भूमिका बदलण्याचें आपणास कांहींहि कारण नाहीं ही एकच गोष्ट गांधीजी आपल्या अनेक विधानामधून सांगत आहेत . ...

"म्हणून मी असें अनुमान काढतों, कीं हिंदुस्तानांतील परिस्थिति आम्हाला अतिशय अनुकूल आहे. जोंवर कॉंग्रेस समेट करीत नाहीं व ब्रिटिश सरकार शरण जात नाहीं तोंपर्यंत लोकाची एकदर मनोवृत्ति ब्रिटनविरोधीच राहील. आमची चढाई जसजशी पुढें जाईल तसतसें लोकाना कळून येईल कीं स्वातन्त्र्यासाठीं लढल्यावाचून तें मिळत नाहीं. त्यावेळीं आमच्या युद्धात भाग घेण्याचा आणि आम्हाला युद्ध चालविण्यात सहाय्य करण्याचा निर्धार लोक करतील."

नेताजींचें हें भाषण लोकानीं जादूनें भारल्याप्रमाणें ऐकलें. सभा संपल्यानंतर लोकाच्या गर्दीची पांगापांग होण्यास जवळजवळ दीड तास लागला. केवढा उत्साह !

५ जुलै, १९४४

नेताजीसप्ताहाचा दुसरा दिवस आज होता. रंगूनमध्यें फौजेची परेड झाली. सुभाषबाबूंनीं तिची सलामी घेतली. तो देखावा मोठा मनावर छाप टाकणारा होता. आमच्या रेजिमेंटची क्वाईत उत्कृष्ट होती. सुभाषबाबूंनीं आमचा मोठा गौरव केला.

फौजेच्या सैनिकांना सुभाषबाबू म्हणाले,

"आम्ही आझाद हिंद फौज स्थापन केली यामुळें आमच्या शत्रूला मोठी चिंता आणि जिगजीग वाटू लागली आहे. पहिल्यानें आमची फौज निर्माण झाली

ही गोष्ट त्यांनीं लक्षांतच घेतली नाहीं. पण फार दिवस बातमी दडपून टाकणें शक्य नाहीं असें दिसलें तेव्हां त्याचें मतप्रचारसाधन असा जो, दिल्लीचा ऑल इंडिया रेडिओ त्यानें प्रचार सुरू केला, कीं हिंदी युद्धकैदी जपानच्या नियंत्रणाखालीं असून त्याना सक्तीनें सैन्यात सामील करण्यात येत आहे. हा मतप्रचार अर्थात् फार काळ चालूं शकला नाहीं; कारण पूर्व आशियातील सर्व मुलुखातून पुष्कळच बिनलढाऊ नागरिक आझाद हिंद फौजेंत सामील होत आहेत ही बातमी हिंदुस्तानात पसरली. या हिंदुस्तानविरोधी रेडिओंतील तज्ञाना यामुळें आपले डावपेंच बदलावे लागले. नंतर त्यांनीं ताज्या बातम्या उठवल्या, कीं हिंदी युद्धकैद्यांनीं आझाद हिंद फौजेंत सामील होण्याचें नाकारल्यामुळें बिनलढाऊ नागरिकाना सक्तीनें सैन्यात घेण्यांत येत आहे. पण या दिल्लीच्या दांड शहाण्याच्या लक्षांत बहुधा ही गोष्ट आली नाहीं, कीं युद्धकैद्याला सैन्यात सक्तीनें आणणें जर अशक्य होतें तर स्वतंत्र बिनलढाऊ नागरिकाला सक्तीनें सैनिक बनविणें त्याहूनहि अधिक अशक्य आहे......

"थोडीहि अक्कल असलेल्या माणसाच्या लक्षांत ही गोष्ट सहज येईल कीं भाडोत्री सैन्य सक्तीनें निर्माण होऊं शकेल, पण स्वयंसेवकाची सेना सक्तीनें निर्माण होणार नाहीं. तुम्ही एकाद्या माणसाला सक्तीनें खांद्यावर बंदुक घ्यायला लावाल पण जें कार्य त्याचें स्वतःचें आहे असें त्याला वाटत नाहीं त्यासाठीं प्राणार्पण करण्याची सक्ति तुम्ही त्याच्यावर करूं शकणार नाहीं.

"पहिल्या पहिल्यानें आझाद हिंद फौज हें सैन्यच नव्हे—ही फक्त मतप्रचारांतील दणकेबाज बातमी आहे, हें सैन्य कधीं लढणारच नाहीं असें आमचे शत्रु म्हणत. नंतर दिल्लीच्या हिंदी विरोधी रेडिओनें प्रचार सुरू केला, कीं आझाद हिंद फौजेनें हिंदुस्तानची सरहद्द ओलांडलीच नाहीं. आता ही सरहद्द ओलांडली गेली आहे. हिंदुस्तानच्या भूमीवर हिंदुस्तानच्या स्वातंत्र्याचा झगडा सुरू झाला तेव्हा शत्रूच्या मतप्रचारकानीं हताश होऊन शेवटची एक कपटी युक्ति अवलंबिली आहे. आम्ही दिल्लीस अमूक तारखेस पोंचणार अशा तारखा आम्हीं दिल्याचें जगाला खोटेंच सांगून त्या तारखांना आम्ही दिल्लीस पोंचलों नाहीं म्हणून हे आम्हाला शिव्या देत आहेत.......

" मी तुम्हाला सांगितलेंच आहे, कीं आझाद हिंद फौज ही सैन्यातून बाहेर पडलेल्या सैनिकाची आणि बिनलढाऊ नागरिकाचीहि आहे तुम्हाला मी आणखी सागतों, कीं या सैन्यात केवळ पुरुषच नसून स्त्रियाहि आहेत...

" बाधवहो, आझाद हिंद फौज ही केवळ हिंदी लोकाचीच आहे इतकेंच नव्हे तर हिंदी लोकांनींच शिकवून ती तयार केली आहे. आज हिंदी अधिकाऱ्याच्या हाताखालींच ती लढत आहे.

" आझाद हिंदच्या तात्पुरत्या सरकारचें आझाद हिंद फौज हें लष्करी अग आहे. तात्पुरतें सरकार आणि त्याचें सैन्य हे हिंदी राष्ट्राचे नोकर आहेत. हिंदुस्तान स्वतत्र करण्यासाठीं लढून, तो स्वतत्र करों हें त्याचें काम आहे. हिंदुस्तान स्वतत्र झाल्यानतर लोकाना कोणतें सरकार हवें याचा विचार हिंदी लोकांनीं करावयाचा आहे. हें तात्पुरतें सरकार स्वतत्र हिंदुस्तानच्या कायम सरकारची स्थापना झाल्यावर बरखास्त होईल. स्वतत्र हिंदुस्तानचें कायमचें सरकार हिंदी लोकाच्या मताप्रमाणें स्थापन होईल. त्या वैभवशाली दिवसासाठीं आम्ही झगडत आहों. त्यासाठीं घाम गाळीत आहों आणि त्यासाठीं लढत आहों."

हजारों मुखातून 'जय हिंद'च्या घोषणा उठल्या. सैनिकांनीं बदुका उचलून आपल्या खाद्यावर उच धरल्या व 'चलो दिल्ली' आणि 'जय हिंद' या घोषणांनीं आकाश दुमदुमून टाकलें नतर नेताजींनीं आराकानच्या लढ्यातील आमच्या शूर सैनिकाच्या पराक्रमाचा उल्लेख केला, आणि मेजर एम्— यांना सरदार ए जग हें पदक आराकान आघाडीवर फौजेचें उत्कृष्ट नेतृत्व केल्याबद्दल दिलें, तसेंच लेफ्ट पी—याला त्याचा उच्च दर्जाचा देशाभिमान आणि ५ फेब्रुवारी रोजीं त्यानें दाखविलेलें धैर्य व कर्तव्यनिष्ठा याबद्दल वीर ए हिंद या पदकानें विभूषित केलें.

६ जुलै, १९४४

आज नेताजींनीं गांधींना उद्देशून रेडिओवर भाषण केलें

आपल्या नेताजींशीं अगदीं अत करणापासून बोलावें, आपलीं हृदयातील

सुखदुःखें मुळींच न लपविता बोलावें त्या प्रमाणें—पण योडीशी विभिन्न विचारसरणी होती ती न लपविता हें भाषण केलें.

माझ्या लघुलेखनाचा येथें फार उपयोग झाला. माझा मुलगा मोठा होईल तेव्हा त्यानें हें भाषण वाचावें अशी माझी इच्छा आहे. या रोजनिशींत एकामागून एक पानें लिहीत असता जें नोंदून ठेवण्यासाठीं मी एकसारखी झगडतें आहे तें या भाषणात एकाच उच्छ्वासात त्याला सगळें पाहायला मिळेल.

" महात्माजी,

" श्रीमती कस्तुरबा गांधी यांचा तुरुंगात दुःखदायक मृत्यु घडल्यानंतर तुमच्या प्रकृतीसंबधानें राष्ट्रातील जनतेला चिंता वाटावी हें स्वाभाविक होतें. हिंदुस्तानाबाहेरील जनतेच्या दृष्टीनें साधन पद्धतींतील आपले मतभेद हे केवळ घरगुती भांडणासारखे आहेत. १९२९ च्या डिसेंबरला लाहोर कॅांग्रेसमध्यें तुम्ही स्वातंत्र्याच्या ठरावाचा पुरस्कार केला तेव्हापासून हिंदी राष्ट्रीय सभेच्या सदस्यां-पुढें सर्वांना समान असें एकच ध्येय आहे. हिंदुस्तानाबाहेरील हिंदी लोकांच्या दृष्टीनें, हिंदुस्तानातील हल्लींच्या जागृतीचे जनक तुम्हीच आहा...हिंदुस्ताना-बाहेरील हिंदी लोक आणि स्वातंत्र्याचे विदेशीय मित्र तुमच्या संबधानें अतिशय आदर बाळगीत असून तुम्हीं १९४२ च्या ऑगस्टमध्यें ' हिंदुस्तानांतून चालते व्हा ' असें इंग्रजांना सांगण्याचा ठराव मोठ्या शौर्यानें पुरस्काराला तेव्हापासून तुमच्याबद्दल त्यांचें असलेलें उच्च मत शंभरपट अधिक उच्च झालें आहे...

" ब्रिटिश सरकार आणि ब्रिटिश लोक यामध्यें फरक आहे असें मानणें ही आमच्या दृष्टीनें अगदीं आत्मघातक अशी चूक ठरेल. इंग्लंडात व अमेरिकेंत ध्येयवादी लोकांचा एक लहानसा गट आहे हें खरें. हिंदुस्तान स्वतंत्र व्हावा अशी त्यांची इच्छा आहे. या ध्येयवाद्यांना त्यांचे देशबांधवच मुक्कड म्हणून लेखतात. हे गट इतके लहान आहेत, कीं सूक्ष्मदर्शक यंत्रानेंहि ते दिसण्याची पंचाईत पडेल. प्रत्यक्ष व्यवहाराच्या दृष्टीनें पहातां हिंदुस्तानपुरतें बोलावयाचें तर ब्रिटिश सरकार व ब्रिटिश लोक हे दोघे एकच आहेत.

अमेरिकेच्या युद्धध्येयासंबधानें मी इतकेंच सांगतों, कीं वॉशिंग्टनमधील राज्यकर्त्या गटाला जागतिक आधिपत्याचीं स्वप्नें पडत आहेत. हें शतक अमेरिकेचें आहे अशी भाषा तेथील राज्यकर्ता गट आणि त्याचे बौद्धिक वकील हे वापरात आहेत. यात काहीं एकांतिक विचाराचे लोक आहेत. ते ब्रिटन हें अमेरिकेतील ४८ संस्थानानंतरचें ४९ वें संस्थान आहे असेंहि बोलतात ..

" महात्माजी, मी आपणास खात्रीपूर्वक सांगतों, कीं हल्लींचें धाडशी मत पत्करण्यापूर्वी मीं कित्येक दिवस, आठवडे आणि महिने या घटनेचा सर्व बाजूनीं विचार केला. माझ्या देशबांधवाचीं सेवा माझ्या शक्तीप्रमाणें इतका काळ केल्यानंतर आता त्या योजनेचा विश्वासघात करावा अथवा मी विश्वास घातकी आहें असा आरोप माझ्यावर करण्यास कोणाला सबब मिळू द्यावी अशी इच्छा मला होणें अशक्य आहे.. माझ्या देशबांधवाचें औदार्य आणि प्रेम यामुळें हिंदुस्तानातील कोणाहि जनतासेवकाला मिळू शकणारा जास्तींत जास्त मोठा मान मला मिळाला होता. ज्याची माझ्यावर अढळ श्रद्धा आहे अशा एकनिष्ठ सहकाऱ्याचा एक पक्षहि मला बनवावा लागला. परदेशामध्यें एका अत्यंत धोक्याच्या कामगिरीवर जाताना मी माझें जीवित आणि माझी सर्व भावि कारकीर्द धोक्यात आणीत होतों, इतकेंच नव्हे तर सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे माझ्या पक्षाचें भवितव्यहि मी धोक्यात आणीत होतों. मला जर परदेशातील एकाद्या कार्यावाचून हिंदुस्तानचें स्वातंत्र्य मिळविण्याची थोडीहि आशा असती तर देशाच्या आणीबाणीच्या प्रसंगीं मीं देशत्याग कधींहि केला नसता. आमच्या ह्यातींत आणखी एकादी संधि, स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याची सुवर्णसंधि—जी या युद्धानें दिली आहे अशी संधि—मिळण्याची आशा मला असती तर मीं स्वदेश सोडला असता कीं नाहीं याची मला शकाच आहे...

" ॲक्सिस राष्ट्रांसबधानें विचारला जाणारा जो एक प्रश्न त्यासबधीं मला उत्तर दिलें पाहिजे. मला त्यानीं फसवलें असेल काय ? माझ्या मतें सर्व जगाला एक गोष्ट मान्य असेल, कीं ब्रिटिश मुत्सद्यामध्यें अतिशय हुशार व धूर्त मुत्सद्दी सापडतील. ज्यानें सर्व आयुष्यभर कार्य करून ब्रिटिश मुत्सद्यानीं

झगडा दिला आहे त्याला जगातील कोठल्याहि मुत्सद्दी फसवूं शकणार नाहीं. ब्रिटिश मुत्सद्दी जर मला भुरळूं शकले नाहींत अथवा माझ्यावर सक्ती करू शकले नाहींत तर दुसऱ्या कोठल्याहि मुत्सद्यांना तसें करता येणार नाहीं; आणि ज्या ब्रिटिशानीं मला दीर्घकाळ तुरुंगात डांबलें, माझा छळ केला, माझ्या-वर अत्याचार केले त्या ब्रिटिशानाहि माझा नैतिक अधःपात करणें शक्य झालें नाहीं तर जगातील दुसऱ्या कोठल्याहि शक्तीला तो करता येणार नाहीं... माझ्या राष्ट्राचा स्वाभिमान, दर्जा अथवा हितसंबंध यास कमीपणा येईल अशी कोणतीहि गोष्ट मीं कधींहि केलेली नाहीं...

"एक काळ असा होता, कीं जपान हें आमच्या शत्रूचें मित्र होतें. अँग्लो जपानी तह जिवंत असेपर्यंत मी जपानला आलों नाहीं. जोंवर या दोन राष्ट्रांचे राजकीय संबंध शिल्लक होते तोंवर मी जपानकडे गेलों नाहीं. जेव्हां जपाननें इंग्लंड व अमेरिका याजविरुद्ध युद्ध पुकारलें, माझ्या दृष्टीनें जपाननें आपल्या इतिहासात अत्यंत प्रचंड अशी ही घटना घडवून आणली तेव्हां जपानकडे स्वेच्छेनें जाण्याचें मीं ठरविलें...माझ्या अनेक बांधवाप्रमाणें १९३७-३८ सालीं मीं चुंगकिंगमधील चिनी सरकारबद्दल सहानुभूति दाखवीत होतों. आपल्या लक्षात असेलच, कीं डिसेंबर १९३८ मध्यें चुंगकिंगला शुश्रूषापथक पाठविण्यास काँग्रेसचा अध्यक्ष या नात्यानें मीच कारण झालों होतों....

"महात्माजी, नुसत्या आश्वासनासंबंधानें हिंदी लोक किती संशयग्रस्त असतात ही गोष्ट दुसऱ्या कोणाहिपेक्षा तुम्ही अधिक जाणता. जपाननें केलेल्या आपल्या धोरणाची घोषणा ही नुसती कागदी आश्वासनासारखी असती तर निदान मजवर तिचें वजन मुळींच पडलें नसतें.......

"आता आम्ही स्थापन केलेल्या तात्पुरत्या सरकारसंबंधानें दोन शब्द मी बोलूं इच्छितों. या तात्पुरत्या सरकारचें एकच एक ध्येय सशस्त्र युद्ध करून हिंदुस्तान ब्रिटिश साम्राज्याच्या जोखडातून स्वतंत्र करणें हें आहे. एकदां आमच्या शत्रूंना हिंदुस्तानबाहेर हाकलण्यात आलें आणि शांतता व सुव्यवस्था स्थापन झाली म्हणजे तात्पुरत्या सरकारची कामगिरी संपेल.......आमच्या यातना आणि आमचा स्वार्थत्याग व आमचे हे प्रयत्न यासाठीं आम्हांला जें

एकच एक बक्षिस हवें आहे तें हें कीं आमची मातृभूमि स्वतंत्र हिंदुस्तान स्वतंत्र होताच राजकीय कार्यक्रमातून आम्हांपैकीं व्हावयाचें आहे......

"हिंदुस्तानातील आमचे देशबांधव केवळ आपल्या होऊ शकले तर अथवा ब्रिटिश सरकारनें तुमचा 'च। स्वीकारून त्याची अमलबजावणी करण्याची कबूली त्यांनीं ि इतका आनंद कोणालाहि होणार नाहीं. तथापि या दे नाहीं असें धरून चालून सशस्त्र युद्ध हें अपरिहार्य आहों......हिंदुस्तानचें अखेरचें स्वातंत्र्ययुद्ध सुरू फौजेचीं सैन्यें हिंदुस्तानच्या रणभूमीवर लढू लागलीं अडचणी व संकटें समोर दिसत असताहि ती आहे. अखेरचा ब्रिटिश माणूस हिंदुस्तानातून दिल्लीतील व्हाइसरॉयच्या मंदिरावर तिरंगी राष्ट्री तोंपर्यंत हा सशस्त्र लढा चालू राहील.

"आमच्या राष्ट्राचे पिताजी, हिंदी स्वातं आशीर्वाद व तुमची सदिच्छा याची मी आपणाक

एक मुस्लिम कोट्यधीश श्री. एच्—यानें घोषणा आज नेताजींनीं हजारों श्रोत्यासमोर केली. आपली इस्टेट आणि इतर मालमिळकत—सर्वांची ि रुपये भरेल—आय्. आय्. एल्. च्या रवा नेताजींनीं त्याना सेवक-ए-हिंद हें पदक अर्पण केलें. पहिला मान त्याचा आहे.

पी—म्हणतो, हिंदुस्तानांतील बातमी मोठी आमच्या अधिकाऱ्यांना ब्रिटिश हिंदुस्तानातून

असा लढा लढावा लागेल असें वाटतें. ब्रिटिश आपलें साम्राज्य टिकविण्याच्या या शेवटच्या प्रयत्नात निकरानें लढणारच. कारण ब्रिटिश साम्राज्यातून हिंदुस्तान वजा केल्यास ब्रिटन हें अगदीं तिसऱ्या दर्जाचें राष्ट्र ठरतें. ब्रिटिशांना हें माहीत आहे.

सुभाषबाबू जेव्हा विजयासंबधानें बोलतात, तेव्हा त्याची भाषा अतःस्फूर्त वाटते. त्याची श्रद्धा खोल आहे. तो सर्व विचार मनात येऊन माझा थरकाप होतो. आमच्या योजनात कोठें काहीं बिघाड झाला तर? सुभाषबाबू खचून जातील काय? त्याना जबर धक्का बसेल काय? त्यानीं सगळीं अंडीं एकाच टोपलींत ठेवलीं आहेत. आझादी—या एकाच ध्येयावर त्याची सर्व भिस्त आहे. पूर्व आशियातील आम्ही सर्वजण हेंच करीत आहों. ईश्वर आमचें रक्षण करीलच करील.

१० जुलै, १९४४

जाहीर मेळाव्यापुढें सुभाषबाबूंनीं मोठें दणदणीत भाषण केलें. जवळ जवळ तीस हजार लोकसमुदाय होता. आमच्या चळवळीची रणनीति कशी आहे याची रूपरेषा त्यानीं पुढीलप्रमाणें सागितली:—

"जोंवर हिंदुस्थानातील ब्रिटिश सैन्यावर देशाबाहेरून हल्ला झाला नाहीं तोंवर देशातील क्रातिकारक चळवळ दडपून टाकण्यास सरकार नेहमींच समर्थ राहील. म्हणून हिंदुस्तानच्या स्वातंत्र्ययुद्धात आझाद हिंद फौजेनें दुसरी आघाडी सुरू केली आहे. ज्यावेळीं आम्ही हिंदुस्तानात आणखी थोडी प्रगति करूं आणि हिंदुस्तानचे लोक स्वतःच्या डोळ्यानीं ब्रिटिश सैन्यें मागें हटत आहेत हें पाहातील तेव्हा ब्रिटिशाचा निःपात अगदीं जवळ आला याबद्दल हिंदी लोकाना खात्री वाटेल. त्यावेळीं आपल्या माना धोक्यात घालून देशाचें स्वातंत्र्य मिळविण्याकरिता हिंदी लोक आमच्या सैन्याला येऊन मिळतील. नंतर आम्ही सर्वजण एकजुटीनें ब्रिटिशाचा पाठलाग करूं आणि त्याना हिंदुस्तानच्या भूमींतून हाकलून लावू...मित्रहो, आमच्या शत्रूची शक्ति कमी आहे असें एकाद्या मूर्खाचेंच मत असेल. आराकानमध्यें, कलादनमध्यें, हाका क्षेत्रात, टिडिम

एकच एक बक्षिस हवें आहे तें हें कीं आमची मातृभूमि स्वतंत्र झाली पाहिजे. हिंदुस्तान स्वतंत्र होताच राजकीय कार्यक्रमातून आम्हापैकीं अनेकांना सेवानिवृत्त व्हावयाचें आहे.......

"हिंदुस्तानातील आमचे देशबांधव केवळ आपल्या प्रयत्नानें स्वतंत्र होऊं शकले तर अथवा ब्रिटिश सरकारनें तुमचा 'चाल्ते व्हा' हा ठराव स्वीकारून त्याची अमलबजावणी करण्याची कबूली त्यानीं दिली तर—आमच्या इतका आनंद कोणालाहि होणार नाहीं. तथापि या दोहोंपैकीं काहींहि घडणें शक्य नाहीं असें धरून चालून सशस्त्र युद्ध हें अपरिहार्य आहे असें आम्ही मानीत आहों.......हिंदुस्तानचें अखेरचें स्वातंत्र्ययुद्ध सुरू झालें आहे...आझाद हिंद फौजेचीं सैन्यें हिंदुस्तानच्या रणभूमीवर लढू लागलीं आहेत आणि सर्व तऱ्हेच्या अडचणी व संकटें समोर दिसत असताहि ती हळूहळू पण धीरानें प्रगति करीत आहे. अखेरचा ब्रिटिश माणूस हिंदुस्तानातून हाकलला जाईल आणि नव्या दिल्लीतील व्हाइसरॉयच्या मंदिरावर तिरंगी राष्ट्रीय झेंडा फडकविला जाईल तोंपर्यंत हा सशस्त्र लढा चालू राहील.

"आमच्या राष्ट्राचे पिताजी, हिंदी स्वातंत्र्याच्या या धर्मयुद्धांत तुमचे आशीर्वाद व तुमची सदिच्छा याची मी आपणाकडे मागणी करतों."

## ९ जुलै, १९४४

एक मुस्लिम कोट्यधीश श्री. एच्—यानें केलेल्या प्रचंड त्यागाची घोषणा आज नेताजींनीं हजारों श्रोत्यासमोर केली. त्यानें आपलें जडजवाहीर, आपली इस्टेट आणि इतर मालमिळकत—सर्वांची किंमत जवळ जवळ एक कोटि रुपये भरेल—आय्. आय्. एल्. च्या स्वातंत्र्यलढ्याला अर्पण केली आहे. नेताजींनीं त्याना सेवक-ए-हिंद हें पदक अर्पण केलें. हें पदक मिळविण्याचा पहिला मान त्याचा आहे.

पी—म्हणतो, हिंदुस्तानातील बातमी मोठी आशादायक आहे; पण आमच्या अधिकाऱ्याना ब्रिटिश हिंदुस्तानातून जाण्यापूर्वीं दीर्घकाळ व दुर्घट

असा लढा लढावा लागेल असें वाटतें. ब्रिटिश आपलें साम्राज्य टिकविण्याच्या या शेवटच्या प्रयत्नात निकरानें लढणारच. कारण ब्रिटिश साम्राज्यातून हिंदुस्तान वजा केल्यास ब्रिटन हें अगदीं तिसऱ्या दर्जाचें राष्ट्र ठरतें. ब्रिटिशांना हें माहीत आहे.

सुभाषबाबू जेव्हां विजयासंबधानें बोलतात, तेव्हा त्यांची भाषा अंत:स्फूर्त वाटते. त्यांची श्रद्धा खोल आहे. तो सर्व विचार मनात येऊन माझा थरकाप होतो. आमच्या योजनात कोठें कांहीं बिघाड झाला तर? सुभाषबाबू खचून जातील काय? त्याना जबर धक्का बसेल काय? त्यांनीं सगळीं अंडीं एकाच टोपलींत ठेवलीं आहेत. आझादी—या एकाच ध्येयावर त्यांची सर्व भिस्त आहे. पूर्व आशियातील आम्ही सर्वजण हेंच करीत आहों. ईश्वर आमचें रक्षण करीलच करील.

१० जुलै, १९४४

जाहीर मेळाव्यापुढें सुभाषबाबूंनीं मोठें दणदणीत भाषण केलें. जवळ जवळ तीस हजार लोकसमुदाय होता. आमच्या चळवळीची रणनीति कशी आहे याची रूपरेखा त्यांनीं पुढीलप्रमाणें सांगितली:—

"जोंवर हिंदुस्थानातील ब्रिटिश सैन्यावर देशाबाहेरून हल्ला झाला नाहीं तोंवर देशातील क्रांतिकारक चळवळ दडपून टाकण्यास सरकार नेहमींच समर्थ राहील. म्हणून हिंदुस्तानच्या स्वातंत्र्ययुद्धात आझाद हिंद फौजेनें दुसरी आघाडी सुरू केली आहे. ज्यावेळीं आम्ही हिंदुस्तानात आणखी थोडी प्रगति करूं आणि हिंदुस्तानचे लोक स्वत:च्या डोळ्यांनीं ब्रिटिश सैन्यें मागें हटत आहेत हें पाहातील तेव्हा ब्रिटिशाचा नि:पात अगदीं जवळ आला याबद्दल हिंदी लोकाना खात्री वाटेल. त्यावेळीं आपल्या माना धोक्यात घालून देशाचें स्वातंत्र्य मिळविण्याकरिता हिंदी लोक आमच्या सैन्याला येऊन मिळतील. नंतर आम्ही सर्वजण एकजुटीनें ब्रिटिशाचा पाठलाग करूं आणि त्याना हिंदुस्तानच्या भूमींतून हाकलून लावूं...मित्रहो, आमच्या शत्रूची शक्ति कमी आहे असें एखाद्या मूर्खाचेंच मत असेल. आराकानमध्यें, कलादनमध्यें, हाका क्षेत्रात, टिडिम

मणिपूर आणि आसाम. येथें आमच्या शत्रूचीं विविध सैन्यें आम्हीं पाहिलीं आहेत. आम्हीं पूर्वी अदाज केल्याप्रमाणें त्याचा अन्नपुरवठा आणि त्याची साहित्यसज्जता आमच्यापेक्षा अधिक चांगली आहे. कारण आमच्याशीं लढण्यासाठीं ते नेहमीं हिंदुस्तान लुटीत आहेत. तथापि आम्हीं त्याचा सर्वत्र पाडाव केला आहे. आम्ही ज्या प्रकारच्या परिस्थितींत लढतों आहों तशाच परिस्थितींत जगातील सर्व क्रांतिकारक सैन्यांना लढावें लागतें; तरी पण अखेरीस हीं क्रांतिकारक सैन्येच विजयी होतात. त्याच्या अंगीं असलेली शक्ति बीर आणि रम् अथवा डनाबद असें गोमांस यापासून उत्पन्न होत नाहीं तर शौर्य, धैर्य, त्याग आणि श्रद्धा यापासून उत्पन्न होत असते. ब्रिटिश सैन्याला अडचणी आणि कष्ट यांच्या एकांतिक परिस्थितींत लढण्याचें शिक्षण मिळालेलें नाहीं, पण तें आझाद हिंद फौजेला मिळालेलें आहे आणि ही आझाद हिंद फौज अडतीस कोटि हिंदी लोकांना कधींहि अंतर देणार नाहीं......"

•

११ जुलै, १९४४

आज दिल्लीचा शेवटचा बादशहा बहादुरशहा याच्या थडग्यासमोर एक समारंभाची परेड झाली.

नेताजींनीं आपल्या भाषणांत १८५७ च्या झगड्याची चर्चा केली. तो झगडा का फसला याची चर्चा करून आजच्या आमच्या झगड्याशीं त्याची तुलना केली आणि आम्ही स्वातंत्र्याच्या वेदीवर आत्माहुति द्यावी अशी निकराची विनंति आम्हाला केली.

"१८५७ मधील घटनांचा अभ्यास करीत असतां आणि त्या क्रांतीनंतर ब्रिटिशांनीं केलेल्या अत्याचारावर विचार करीत असतां माझें रक्त कढू लागतें. आम्ही जर पुरुष असू तर १८५७ चे आणि नंतरचे वीर— ज्यांनीं ब्रिटिशांच्या दहशतवादामुळें आणि पाशवीवृत्तीमुळें भयंकर यातना सोसल्या त्याच्याबद्दल आम्हीं योग्य सूड घेतला पाहिजे. सूड घेणें ही हिंदुस्तानची मागणी आहे. हिंदुस्तानांतील निरपराधी स्वातंत्र्यप्रेमी लोकांचे रक्त त्यांनीं केवळ त्या युद्धकाळांतच नव्हे तर त्या युद्धानंतरहि सांडलें, आणि अमानुष

प्रकारें लोकांचा छळ केला त्या ब्रिटिशांनीं आपल्या गुन्ह्याचें प्रायश्चित भोगलें पाहिजे. आम्ही हिंदी लोक शत्रूचा पुरेसा द्वेष करीत नाहीं. अतिमानुष असें धैर्य व शौर्य आपल्या देशबांधवांनीं गाजवावें असें जर तुम्हांस वाटत असेल तर तुम्ही त्यांना केवळ स्वदेशावर प्रेम करण्यासच शिकवून भागणार नाहीं तर शत्रूचा द्वेष करण्यासहि शिकविलें पाहिजे......

"म्हणून मी रक्ताची मागणी करतों. केवळ शत्रूच्या रक्तानेंच त्याच्या भूतकाळातील गुन्ह्याचा सूड घेतला जाणार आहे. पण आम्ही रक्त देण्यास तयार असूं तरच आम्ही रक्त घेऊ शकतों. म्हणून आमचा भावि कार्यक्रम रक्तदान हा आहे. आमच्या वीरांच्या रक्तानें आमचीं जुनीं पातकें धुऊन टाकलीं जातील. आमच्या वीरांचें रक्त हीच आमच्या स्वातंत्र्याची किंमत असेल. आमच्या वीरांचें रक्त त्यांचें शौर्य आणि वीरत्व हेंच ब्रिटिशांनीं हिंदी लोकांवर केलेला जुलूम व अत्याचार याचा सूड घेईल.

## १२ जुलै, १९४४

आमच्या शत्रूनें मतप्रचारात अवलंबिलेल्या डावपेचासंबंधीं सुभाषबाबूंनीं आमच्या स्त्रियांच्या विभागापुढें भाषण केलें तें मोठें बोधप्रद होतें.

"गेल्या महायुद्धात ब्रिटिश मतप्रचार खात्यानें जो मतप्रचार केला तो स्पष्ट शब्दात लिहून ठेवण्यात आला आहे. 'सीक्रेटस् ऑफ क्र्यूज् हाऊस' व 'वॉरटाइम फॅलसहुडस्' हीं पान्सॉन्बीचीं पुस्तकें वाचणाराला सहज कळून येईल कीं ब्रिटिश प्रचारखातें कितीहि खोटें बोलूं शकतें. गेल्या महायुद्धात जर्मन लोक मेलेल्या सैनिकांच्या शरीरापासून चरबी काढतात अशी अफवा ज्या ब्रिगेडियर चार्टरिसनें उठविली होती तो एक इंग्लिश सेनापति होता. हें अगदीं जाणून बुजून पिकविलेलें असत्य आहे असें त्याला स्वताला माहीत होतें. युद्धानंतर त्यानें कबुलीहि दिली, कीं आपला हा मतप्रचार मूळ धरील अशी आपल्या स्वतःलाहि आशा नव्हती; पण जगातील भोळ्या लोकांना वाटलें, कीं ब्रिटिश सेनापति खोटें बोलणार नाहीं; आणि ही लबाडी त्यावेळीं यशस्वी होऊ शकली.

"चित्त्याच्या आगावरील ठिपके बदलूं शकणार नाहींत. आपल्यावर कोणीहि विश्वास ठेवणार नाहीं असें एकाद्या खोट्या माणसास कळलें तरी तो खोटें बोलणें सोडीत नाहीं. खरोखर कितीहि अशक्य असलें तरी त्याला आशा वाटत असतेच, कीं आपण ज्याना फसवू शकू असे पुरेसे लोक जगात मिळतीलच, म्हणून अजूनहि ब्रिटिश लोक खोटें बोलणें आणि दमबाजी करणें हा आपला खेळ चालू ठेवीतच आहेत याचें मला मुळींच आश्चर्य वाटत नाहीं......

"पुष्कळ काळेपर्यंत शत्रूच्या प्रचारखात्यानें आझाद हिंद फौज ही जपानचें युद्ध लढण्यासाठीं उभारलेली गुलामसेना आहे असा प्रचार केला. पण अखेरीस त्याना कळून आलें, कीं ही लबाडी यशस्वी होत नाहीं. गुलाम सैन्य इतक्या शौर्यानें आणि नेटानें लढेल कसें अशी शंका पुष्कळजण स्वाभाविकपणेंच काढीत. आता हे डावपेंच बदलण्यात आले आहेत. आता जगाला सांगण्यात येत आहे, कीं अपुरें अन्न आणि अपुरी शस्त्रसज्जता याच्या आधारावर हा एक मिथ्याचा गळाठा उभारण्यात आला आहे... ...

"जगात कोठेंहि—आयर्लंड, इटाली, रशिया अथवा इतर देशात क्रांतिकारक सैन्याला अशाच परिस्थितींत लढावें लागलें आहे आणि सर्वत्र अखेरीस त्याचाच विजय झाला आहे. असेच आम्हीहि विजयी होऊं. पण प्रथम आम्हाला विजयाची किंमत आमच्या रक्तानें द्यावी लागेल.

"हल्लीं एक नवी हूल उठविण्यात आली आहे. आम्ही मुस्लिमविरोधी असून मुसल्मानाचा छळ येथें होत आहे ही ती हूल होय. हें केवढें असत्य आहे पहा! आमच्या तात्पुरत्या सरकारमध्यें, आय्. आय्. एल्. मध्यें मुसल्मान आहेत. फौजेंतील मुसल्मान अधिकारी हे अगदींच क्षुल्लक लोक नाहींत. प्रसिद्ध घराण्यातील तीं माणसें असून डेहराडूनच्या ल्ष्करी ॲकेडमीमध्यें त्यांनीं शिक्षण घेतलें आहे. नाहीं, या मतप्रचारकाच्या खोट्या मतप्रचाराचा आमच्यावर परिणाम होणार नाहीं. जगहि त्यांच्यावर विश्वास ठेवणार नाहीं.

**१ ऑगस्ट, १९४४**

आज आम्ही टिळक जयंति साजरी केली. आय्. आय्. एल्. नें सूचना पाठवल्या होत्या. देशभक्ताच्या सभा आणि जाहीर सभेतील देशनिष्ठेसंबंधींच्या शपथा अशा कार्यक्रमानीं हा दिवस पाळण्यात यावा अशा सूचना आय्. आय्. एल्. च्या मुख्य ठाण्याकडून सर्व शाखाना पाठविण्यात आल्या होत्या.

सध्याकाळीं आय्. आय्. एल्. च्या मुख्य ठाण्यावर आम्हा सर्व कार्यकर्त्यांचें एक सहभोजन झालें. कोणी एकानें सुभाषबाबूंना विचारलें, 'तुमच्या आणि गाधींच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या साधनातील झगडा कसा मिटेल?' सुभाषबाबूंनीं उत्तर केलें, " हिंदुस्तानला स्वातंत्र्य प्राप्त करून देण्यासाठीं आम्हीं एक स्पष्ट योजना आखली आहे. ही योजना चागली असो वा नसो, जोंवर दुसरी एकादी योजना पुढें येत नाहीं तोंवर आमची योजनाच कायम असेल. दुसरी एकच असलेली योजना चर्चिली गेली आहे. कॉंग्रेसच्या 'चालते व्हा' ठरावात ती अतर्भूत आहे. ती योजना यशस्वी होईल तर आमच्या योजनेची जरूरी नाहीं असें ठरेल. तसें घडल्यास माझ्याइतका आनद कोणालाच होणार नाहीं.

" पण दुर्दैवानें गाधीजींची योजना झिडकारण्यात आली आहे आणि फसली आहे. आता फक्त आमच्याच योजनेवर हिंदी स्वातंत्र्याच्या आशेची सर्व भिस्त आहे. गाधीजींची योजना आमच्याहून कमी अतर चालावें लागणारी आहे, पण ब्रिटिशानींच ती नापसत केली आहे. आता गाधीजींची योजना यशस्वी होण्यासाठींहि आमच्या योजनेच्या यशाची जरूरी आहे; कारण ब्रिटिशावर त्यामुळेंच सक्ती होऊं शकेल. ब्रिटिशाना जर आमची योजना विफल करावयाची असेल तर त्यानाहि एकच उपाय आहे. 'चालते व्हा' ठरावाची भूमिका स्वीकारून कॉंग्रेस व गाधी याच्याशीं समेट करणें हा तो उपाय होय. जर ब्रिटिश हिंदुस्तान सोडून गेले तर तबडतोब सैन्य बरखास्त करा अशी मी तुम्हाला विनती करीन."

जपान्यानीं इफाल आणि मिटकीना खाली केलें काय? म्हणजे [illegible] झाली म्हणायची कीं काय?

# ओहोटीचा काल

१२ ऑगस्ट, १९४४

नेताजींनीं आयू. आय. एल्. च्या मुख्य टाण्यावर प्रमुख कार्यकर्त्योसाठीं भाषण केलें. त्या वेळीं सर्व खात्याचे वरिष्ठ आणि मंत्री व सल्लागार हे हजर होते.

युद्ध परिस्थितीसबधीं नेताजींनीं हकिकत सांगितली. ते म्हणाले,

" आम्हीं युद्धकार्य फार उशीरा सुरू केलें. पावसाळा आम्हाला प्रतिकूल ठरला. आमचे रस्ते सर्व पाण्यात, चिखलात बुडून गेले. नद्यातून करावयाची वाहतुक प्रवाहाच्या उलट दिशेनें करावयाची होती. उलट, शत्रूला उत्तम प्रकारचे रस्ते मिळाले. पावसाळ्याच्या पूर्वी इंफाल घेणें हा एकच यशाचा मार्ग होता. आम्हाला जर विमानाचें पाठबळ मिळालें असतें आणि शत्रूला अखेरचा मनुष्य मरेपर्यंत लढा अशी विशेष समज देण्यात आलेली नसती तर आम्हाला यश आलें असतें. आम्हीं जर जानेवारींत चढाई सुरू केली असती तर आम्ही यशस्वी झालों असतों. पाऊस पडू लागेपर्यंत प्रत्येक रणक्षेत्रात आम्हीं शत्रूला थोपवून धरलें अथवा प्रगतिहि केली. आराकानमध्यें शत्रूला थोपविलें होतें. कलादानमध्यें शत्रूचा धुव्वा उडवून आम्हीं प्रगति केली. टिडिममध्यें आम्हीं प्रगति केली. पालेल व कोहिमा येथेंहि आम्हीं प्रगतिच केली. हाका क्षेत्रात आम्हीं त्याना अडवलें. हा सर्व पराक्रम आमच्यापेक्षा शत्रूची संख्या मोठी, साहित्यसज्जता मोठी आणि अन्नपुरवठा मोठा असे असताहि आम्हीं केला.

" पाऊस पडू लागल्यानंतर इंफालवरील हल्ला आम्हाला लांबणीवर टाकावा लागला. शत्रूला यांत्रिक शस्त्रास्त्रांनीं सज्ज अशा तुकड्या पाठविणें शक्य होऊन त्यानीं कोहिमा–इंफाल रोड घेतला. मग आपली आघाडी कोठें रोवून आपण उभें राहायचें हा प्रश्न उत्पन्न झाला. त्या वेळीं आम्हापुढें दोन मार्ग होते. एक बिरानपुर–पालेल रस्त्यावर शत्रूला रोखून धरून त्याची चढाई खुटाविणें अथवा मागें हटून एकादी अधिक अनुकूल जागा धरून राहाणें...

"या मोहिमेपासून आपण कोणते धडे शिकलों ! आम्हाला अमेरिदिग्याचा संस्कार मिळाला. दारूगोळा संपल्यानंतर एका नागरिक सैन्याच्या तुकडीला आम्हीं मागें हटण्यास सांगितलें. पण त्या तुकडीनें मागें न हटतां चढाई करण्याचाच निश्चय केला. संगिनी चढवून शत्रूवर हल्ला केला व विजय मिळवून ते परत आले......

"आमच्या सैन्याला खूप आत्मविश्वास आला आहे. शत्रूकडील हिंदी सैन्य आमच्याकडे येण्यास राजी आहे असें आम्हास कळलें आहे. हें सैन्य आमच्याकडे घेण्याची तरतूद आता आम्हाला केली पाहिजे. शत्रूचे डावपेंच आता आम्हाला कळले आहेत. शत्रूचे कागदपत्र आमच्या हातीं आले आहेत. आमच्या सेनापतींनीं मिळविलेला अनुभव केवळ बहुमोल आहे. ही मोहीम सुरू होण्यापूर्वी जपान्याना आमच्या सैन्याबद्दल विश्वास वाटत नव्हता म्हणून त्या सैन्याचे लहान लहान गट पाडून जपानी सैन्यास जोडण्यात यावे अशी त्याची योजना होती. माझी इच्छा एक आघाडी स्वतंत्रपणें आमच्या सैन्याला मिळावी अशी होती. अखेरीस ती मिळाली. आमच्या विभागसेनापतींना व इतर अधिकाऱ्याना या मोहिमेपासून पुष्कळ अनुभव मिळाला आहे.

"आमचे दोषहि आम्हाला कळले आहेत. मुलुख अवघड असल्यामुळें आमचीं वाहतुकीचीं साधनें सदोष ठरलीं आणि पुरवठा कमी पडला. आघाडीवरील रणक्षेत्रासंबंधींचा मतप्रचार आमच्याजवळ नव्हता. आम्हीं यासाठीं माणसें तयार केलीं होतीं. परंतु वाहतुकीचीं साधनें नसल्यामुळें त्या माणसांचा उपयोग आम्हाला करतां आला नाहीं. यापुढें आझाद हिंद सैन्याच्या प्रत्येक तुकडीबरोबर मतप्रचारकाची एक तुकडी ठेवण्यात येईल. आम्हाला लाउडस्पीकर्स हवे होते पण जपान्यांनीं ते आम्हाला दिले नाहींत. आता ते आमचे आम्ही तयार करीत आहों."

**२१ ऑगस्ट, १९४४**

आमचे सरसेनापति, नेताजी यांनीं आजच्या दिवशीचा संदेश प्रसिद्ध केला असून पावसाळ्यामुळें लष्करी हालचाली बंद केल्या आहेत. प्रत्येकानें चढाईसाठीं तयार असावें असेंहि त्यांनीं फर्माविलें आहे.

मिसेस बी—नें हिंदी स्वातंत्र्यासाठीं दिलेल्या देणग्या व केलेला स्वार्थत्याग याबद्दल सेवक-ए-हिंद हें पदक एका जाहीर सभेंत नेताजींनीं तिला दिलें.

१० सप्टेंबर, १९४४

गेला सर्व आठवडाभर ब्रह्मदेशच्या आय्. आय्. एल्. शाखेचें अधिवेशन चालू होतें. ७४ शाखांतून १८० प्रतिनिधी आले आहेत. परिषद नुकतीच संपली. आय्. आय्. एल्. चा जनरल सेक्रेटरी श्री. जी—मला म्हणाला, ही बैठक अतिशय व्यवस्थितपणें पार पडली. अनेक अडचणी निवारल्या गेल्या.

नेताजींनीं भारतमातेची केलेली ही सेवा हिंदी जनतेच्या लक्षात कधीं येणार ! कलकत्ता, जमशेदपूर, मद्रास आणि इतर दाट वस्तीच्या शहरावर हल्ला होऊन त्याचा विध्वंस होण्याचें नेताजींनीं टाळलें हें हिंदी जनतेला कधीं समजेल काय ! श्री. आर—मला म्हणाला, आमच्या आझाद हिंद सरकारनें जपानला या कामीं थोपवून धरलें. हिंदुस्तानच्या नाशाची जबाबदारी आम्ही पत्करणार नाहीं. एखाद्या पिकलेल्या फळाप्रमाणें हिंदुस्तान आमच्या हातीं अलगद पडलें पाहिजे असा आमच्या सरकारनें आग्रह धरला होता.

माझी रोजनिशी तोकडी होऊ लागली आहे. पण आता माझ्या इतर कामामुळें मला वेळच मिळत नाहीं....

२२ सप्टेंबर, १९४४

आम्ही जतीनदासचा याददिवस आणि हुतात्मादिन काल पाळला. ज्युबिली हॉल इतका खचून भरला होता कीं तेथें श्वासोच्छ्वास करणें कठीण झालें होतें. एकामागोमाग एक बोलल्लेल्या वक्त्यानीं 'इन्किलाब झिंदाबाद' ही घोषणा करीत भगतसिंग, राजगुरु व सुखदेव यानीं फाशीच्या शिक्षेला तोंड कसें दिलें याची हकिगत सांगितली. अमरकीर्ति चंद्रशेखर आझाद, बंगालमधील डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटवर गोळी झाडणाऱ्या सुनीति आणि शांति, कलकत्याच्या युनिव्हर्सिटी कॉन्व्होकेशन हॉलमध्यें बंगालच्या गव्हर्नरवर गोळी झाडणारी

बीणा दास इत्यादींच्या आठवणी वक्त्यांनी काढल्या. भारतभूमीतील अनेक क्रांतिकारकांच्या नामावलीचा उच्चार झाला. लाहोरच्या तुरुंगांत तसूतसूनीं प्राणोत्क्रमण पावणाऱ्या प्रायोपवेशनी जतीनदासची हकीगत सांगण्यांत आली.

पुनः पुन्हा आमचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. क्रांतिकारकांच्या छळांच्या हकिगती ऐकून अनेकांना हुंदके आले.

नंतर नेताजींचें भाषण झालें.

" आमची भारतमाता स्वातंत्र्य मिळवूं पाहात आहे. आतां ती स्वातंत्र्यावांचून जगूं शकणार नाहीं. पण स्वातंत्र्यासाठीं स्वातंत्र्यवेदीवर आहुती द्यावी लागते. तुमची शक्ति, तुमची संपत्ति आणि तुमचें बहुमोल सर्वस्व या सर्वांचें निःशेष हवन स्वातंत्र्यदेवता मागत आहे. भूतकालीन क्रांतिकारकांप्रमाणें तुम्हींहि आपलें स्वास्थ्य, ऐषआराम, सुखें, पैसा व मालमत्ता यांचें हवन केलें पाहिजे. तुम्ही आपले मुलगे रणांगणावर सैनिक म्हणून दिलेले आहेत. पण एवढ्यानें स्वातंत्र्यदेवता संतुष्ट होत नाहीं. ती कशानें संतुष्ट होते याचें रहस्य मी तुम्हांला सांगतों. तिला आज फौजेसाठीं सैनिक व लढवय्ये एवढ्यांचाच पुरवठा करून समाधान होत नाहीं. तिला आज बंडवाले हवे आहेत—स्त्री-पुरुष बंडवाले हवे आहेत. आत्माहुती देणाऱ्या तुकड्यांत सामील होणारे बंडवाले हवे आहेत. या तुकड्यांतील सैनिकांना मृत्यु हा निश्चित येणार हें माहीत असेलच. शत्रूला रक्तांत बुडवून ठार करायचें आहे पण शत्रूची ही हत्या त्याला आमच्या स्वतःच्या रक्तांत बुडवून करावयाची आहे हें माहीत असून त्यासाठीं तयारी असणारे बंडवाले हवे आहेत.

तुम हमको खून दो
मैं तुमको आझादी दूंगा !

" तुम्ही मला तुमचें रक्त द्या. मी तुम्हांला स्वातंत्र्य मिळवून देतों. स्वातंत्र्यदेवतेची ही मागणी आहे."

श्रोत्यांतून आपोआप आरोळ्या उठल्या. " आम्ही तयार आहों. आम्ही रक्त देतों; आताच तें घ्या."

नेताजी पुढें म्हणाले, "माझें म्हणणें नीट ऐकून घ्या. केवळ भावनोद्रेकानें हो म्हणू नका. आत्माहुति देणाऱ्या तुकडीची शपथपत्रिका ही येथें आहे. तिजवर येथें येऊन सही करणारे बहाद्दर मला हवे आहेत. हा सहिता म्हणजे स्वातंत्र्यदेवीच्या वेदीवर मेणाऱ्या मृत्यूचें हें आमंत्रण आहे."

"आम्ही सही करण्यास तयार आहों" असें उत्तर त्या दिवाणखान्याच्या कोनाकोपऱ्यातून आलें.

"पण तुम्ही साध्या शाईनें या आमंत्रणावर सही करू शकणार नाहीं. स्वतःच्या रक्तानें तुम्हीं ती सही केली पाहिजे. छाती असेल त्यानीं व्यासपीठावर चढावें. मातृभूमीच्या स्वातंत्र्यावर आपल्या रक्ताचा शिक्का कोण मारतो हें मी पाहाणार आहें."

सर्व श्रोतृसमुदाय अकस्मात् उभा राहिला. बेभान झालेलीं तीं माणसें व्यासपीठाकडे येण्यासाठीं गर्दी करू लागलीं. व्यासपीठाच्या पायथ्याशीं आम्ही बसलों होतों मोठ्या बळानें आम्हाला दूर ढकलण्यात आलें आणि पहिल्यानें सही करू इच्छिणारे व्यासपीठावर चढले. सुऱ्या आणि टाचण्या यानीं भराभर रक्त निघत होतें. पहिल्या सह्या झाल्या. सतरा स्त्रियानीं पहिल्या सह्या केल्या. आपल्या तुकडीच्या सह्या होईपर्यंत त्यानीं पुरुषाना सह्या करूच दिल्या नाहींत. एक तासपर्यंत त्या दिवाणखान्याच्या प्रत्येक विभागात हें सह्याचें काम चाललें होतें. स्वतःच्या रक्तानें मृत्यु हें आपलें भवितव्य ते लोक लिहून ठेवीत होते.

श्रोत्याचा उत्साह इतका होता, कीं तो सागितला तर खराहि वाटणार नाहीं. जिकडे तिकडे तेजस्वी चेहेरे दिसत होते. डोळ्यात स्फुल्लिंग चमकत होते प्रसिद्ध केसरिया समारभात रजपूत वीर शत्रूवर तुटून पडले त्यावेळीं ते कसे दिसले असतील त्याची मला कल्पना आली. अशा राष्ट्राला स्वातंत्र्य कोणींहि नाकारू शकणार नाहीं. ब्रिटिश साम्राज्या! तुझा नाश करणारे वीर हे येथें जमले आहेत......

मी घरीं आल्यावर पी—च्या मोटावर मी कापल्याची जखम पाहिली. माझ्यापासून ती जखम तो लपवीत होता. माझी त्या जखमेवर नजर गेली आणि माझ्या सर्व लक्षात आलें. आत्माहुती देणाऱ्या तुकडीच्या शपथपत्रिकेवर त्यानें

सही केली होती. क्षणभर माझ्या हृदयाचा थरकाप झाला. डोळे अश्रूंनी भरून आले; पण ही घबराट लवकरच थांबली. मी त्या वीराला आलिंगन दिलें आणि त्याचें चुंबन घेतलें......

काल रात्रभर मला झोप आली नाहीं. आता पी--शिवाय सारा जन्मभर या जगात मला एकटें रहावें लागणार कीं काय या भीतीनें मला घेरलें आहे. तूं आपला निश्चय बदल असें मी त्याला म्हणणार नाहीं. तें अशक्य आहे. माझ्यापुढें फक्त एकच प्रश्न आहे. मींहि जर अशीच सही केली तर माझ्या मुलाचें काय होणार ? खरोखर पी—नेंच हा विचार करायला हवा होता. त्याच्याऐवजीं मी मरू शकलें असतें. माझ्यावाचून तितकेंसें अडणार नाहीं......

पी--, खरोखर इतकें निकराचें धाडस अवश्य होतें काय ? पण याचा निर्णय तुझा तूच घेतला पाहिजेस. पी—, आजवर मला कधीं कल्पनाहि आली नाहीं अशा कठीण कसोटीवर तू माझी परीक्षा पाहात आहेस. पण माझ्या वीरा, मी ह्या कसोटींत तुझ्यापुढे फसणार नाहीं......

२७ सप्टेंबर, १९४४

आज मुख्य ठाण्यावर सुभाषबाबूंना मी भेटलें. मी आत शिरत होतें व ते बाहेर येत होते. मी एकदम कवायतींत उभी राहिलें व 'जय हिंद' म्हणून त्याना सलामी केली. ते थांबले. माझ्या जखमाची त्यांनीं विचारपूस केली आणि पी--संबधानें ते बरेच गौरवात्मक बोलले. 'तुम्हाला दिल्ली रेडिओ स्वप्नाळू माणूस म्हणतो' असें मीं त्याना सांगितलें.

क्षणभर नेताजी स्तब्ध राहिले आणि अगदीं सौम्य स्वरात म्हणाले— त्याच्या शब्दात संताप नव्हता. आपल्या शब्दात जणू काहीं ते आपला आत्मा ओतीत आहेत असें मला वाटलें, ते मला म्हणाले, "काय, मला ते स्वप्नाळू म्हणतात ? पण मी कबुली देतों, कीं मी स्वप्नाळू आहेंच. मी नेहमींच स्वप्नाळू आहें. बालपणींहि मी स्वप्नाळूच होतों. स्वप्नात रमून रहाणें हेंच माझें आजवरचें जीवन आहे. पण सर्व स्वप्नापेक्षा श्रेष्ठ, मला अत्यत प्रिय असें माझें स्वप्न म्हणजे माझी स्वातन्त्र्याकांक्षा हें होय. स्वप्नाळू असणे ही कमीपणाची गोष्ट

असें त्यांना वाटतें काय ? मी तर त्यांतच अभिमान बाळगतों. माझीं स्वप्नें ब्रिटिशांना आवडत नाहींत. पण यांत नवीन काय आहे ? जर मी हिंदुस्तानच्या स्वातंत्र्याच्या स्वप्नात रमलों नसतों तर गुलामगिरीच्या बेड्यां हेंच आपलें कायमचें नशीब होय म्हणून मीं तें पत्करलें असतें. सर्व प्रश्नातला मुख्य प्रश्न आहे तो, हा, कीं माझीं हीं स्वप्नें कधींकाळीं खरीं होतील काय ? मी नम्रपणें सांगतों, कीं तीं अधिकाधिक प्रमाणात खरीं होत आहेत. हें आझाद हिंद सैन्य हें एक माझें पहिलें स्वप्न खरें झालें आहे. तूं आणि तुझा पति हेंहि एक असेंच माझें खरें झालेलें स्वप्न आहे. मी स्वप्नाळू आहें याची मला फिकीर वाटत नाहीं. जगाची प्रगति स्वप्नाळू माणसें आणि त्यांचीं स्वप्नें यांनीं झाली आहे. जगाची पिळणूक, जगावर चढाई, अन्याय कायम ठेवण्याचा हट्ट या प्रकारच्या स्वप्नानीं नव्हे तर प्रगति, बहुसंख्य जनतेचें सुख, व्यक्तिस्वातंत्र्य आणि सर्व राष्ट्रांचें संपूर्ण स्वातंत्र्य ह्याबद्दलच्या स्वप्नानीं जगाची प्रगति झालेली आहे."

इतके बोलून ते निघून गेले. केवढा थोर पुरुष हा !

२ ऑक्टोबर, १९४४

आज आम्हीं गांधीजयंति पाळली. प्रत्येक घरावर तिरंगी ध्वज उभारला गेला. फौजेनें आज सकाळीं ध्वजावंदन समारंभ केला. हिंदुस्तान स्वतंत्र करण्याच्या शपथा आम्हीं सर्वांनीं पुन्हा घेतल्या. रंगूनमधील हजारों हिंदी लोकांनीं काँग्रेसच्या स्वातंत्र्यशपथेवर सही केली.

२० ऑक्टोबर, १९४४

टिडिमपासून जपान्यांची पिछेहाट झाली. ब्रिटिशांची चौदावी सेना चांगली कणखर आहे असें ऐकतों. पण आमच्या फौजेची सर तिला येणार नाहीं.

पण आमची फौज सर्व शक्तीनिशीं आघाडीवर कां नाहीं ?

१७ नव्हेंबर, १९४४

आज पंजाबचे क्रांतिकारक लाला लजपतराय यांची पुण्यतिथि आम्हीं साजरी केली.

श्री. एन्—बँकॉकहून आला आहे. मुख्य ठाण्यावरील अधिकाऱ्यांच्या पुढें त्याचें भाषण झाले.

"पूर्व आशियातील आम्हीं तीस लाख नागरिकानीं आमच्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं लढण्याचा निर्धार केला आहे. आम्ही एक जिंकूं' अथवा मरूं. पण आमच्या राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या या लढ्यात आम्ही जर पतन पावलों तर खरे हिंदी नागरिक या नात्यानें कर्तव्य करीत असतानाच आम्ही पतन पावलों या जाणीवेनेंच आम्ही मरूं. पराभवाची आम्हाला भीति वाटत नाहीं. भुईवर पडणाऱ्या आमच्या प्रत्येक रक्तबिंदूपासून सूड घेणारे वीर निर्माण होतील. ब्रिटन कितीहि झगडो, कितीहि यातायात करो पण हिंदुस्तानचें स्वातंत्र्य जिंकलें जाईलच. चाळीस कोटी लोकाना स्वतंत्र होण्याचा पूर्ण हक्क आहे...

"एक मुद्दा मला पूर्णपणें स्पष्ट करावयाचा आहे. सुभाषराबू आणि पूर्व आशियांतील त्याचे तीस लाख अनुयायी हे साम्राज्यवादाचे मित्र नव्हेत. कोणत्याहि साम्राज्यवादाचे ते मित्र नव्हेत. हिंदुस्तानपुरतें बोलायचें तर राजकीय स्वातंत्र्य हें पुढील एका साध्याचें साधन आहे. सगळ्या हिंदी समाजाचें मूलभूत अवस्थातर करणें हें आमचें ध्येय आहे."

श्री. एन्—हा जपानी अधिकाऱ्याना आवडत नाहीं. त्याचीं समाज व समाजवाद यासंबंधींचीं मतें त्याना भीतिप्रद वाटतात. परतु तात्पुरतें सरकार जोंवर त्याला आपला प्रजाजन मानतें तोंवर जपानी त्याला स्पर्शहि करूं शकणार नाहींत. जर तो चिनी असता तर त्याला कधींच वाय्. एम्. सी. ए. च्या इमारतींत नेऊन 'दुरुस्ती'साठीं ठेवण्यात आलें असतें. आम्हा सर्व हिंदी लोकांना नेताजी हे सामर्थ्याचा एक प्रचंड आधार झाले आहेत. ते येथें आल्यानंतरच आम्ही सुरक्षित झालों. इतर शत्रुराष्ट्राच्या नागरिकाची जी दुरवस्था झाली तीच नेताजी येथें नसते तर आमचीहि झाली असती.

श्री. एन्—म्हणाला, 'ऑन् टु दिल्ली' या ग्रंथाच्या त्यानें लिहिलेल्या प्रस्तावनेबद्दल किकान खात्याच्या प्रतिनिधीनें बरीच खळबळ केली. नेताजींच्या सभातील भाषणाचा व रेडिओवरील भाषणाचा तो संग्रह आहे. अखेरीस किकाननें आपल्या हरकती मागें घेतल्या आणि 'ऑन् टु दिल्ली' हें पुस्तक

बाजारात विक्रीस आलें. ८ण 'बँकॉक क्रॉनिकल' या दैनिकाच्या चालकावर जपान्यांनीं दडपण आणलें असून श्री. एन्—च्या पुढील लिखाणावर बहिष्कार घालण्यास त्यांनीं कळविलें आहे. आतापर्यंत तरी जपान्याना या बाबतींत यश आलेलें दिसतें.

श्री. एन्—हा एक शूर, निर्भय योद्धा आहे. सयाममध्यें त्याला मोठी मान्यता आहे आणि तेथील वृत्तपत्रात त्याचे लेख नेहमीं येतात. त्याचे लेख वाचून माझ्या मनाशीं त्याचें मीं जें चित्र काढलें होतें तें त्या सभेंतील त्याचें भाषण ऐकून अगदीं तंतोतंत बरोबर आहे असें मला पटलें. पूर्व आशियातील हिंदी स्त्रिया व पुरुष इतक्या थोर योग्यतेचे आहेत कीं जगाच्या कोणत्याहि भागांत त्यांना मान मिळेलच.

चिनी सैन्यानें भामो घेतलें आणि ब्रिटिश सैन्यानें बुथिडॉंग घेतलें.

पण युद्ध म्हटलें, कीं तेथें चढउतार हे असणारच. नेताजी नेहमीं म्हणत, बंगाल आणि आसाम याच्या सरहद्दीवर ब्रिटिश लढण्याची शिकस्त करतीलच.

पी—नें मला सांगितलें, आमच्या फौजेची हल्लींची मोहीम ही केवळ बचावाची मोहीम आहे. याला दोन कारणें आहेत. ब्रह्मदेश आम्हीं गमावला तर आमच्या हालचालींना अडथळा येईल हें पहिलें कारण. दुसरें कारण म्हणजे जपानी हे पासिफिकमध्यें अडचणींत आहेत. म्हणून एरव्ही त्यांनीं दिली असती ती मदत ते आता देऊं शकणार नाहींत.

२६ जानेवारी, १९४५

आज स्वातंत्र्यदिन! मोठी सभा झाली.

आज पी—फोर्टेतरी अज्ञातस्थळीं निघून गेला. पतिराज, आतां पुन्हा आपली भेट होणार नाहीं काय? माझ्या मनांत जें भीषण भवितव्य उभें राहिलें आहे तें मीं येथें नोंदणेंहि योग्य नाहीं......

मी स्वतःवर अतिशय ताबा ठेवून माझ्या पुढील कार्यात गर्क राहिलें पाहिजे.

ब्रिटिश अक्यावमध्यें आले. आघाडीवर एकदरीत काहीं परिस्थिति ठीक नाहीं. पण युद्ध चालविण्याचा आमचा निर्धार अढळ आहे.

गेल्या दोन आठवड्यात आझाद हिंद सरकारासाठीं स्वातन्त्र्यदिनानिमित्त मलायानें धान्याचा वाटा म्हणून चाळीस लाख रुपये जमविण्यांत आले. ब्रह्मदेशात जमविलेली एकूण रकम आठ कोटी रुपयापर्यंत गेली आहे.

१५ फेब्रुवारी, १९४५

पिछाडीवरील संरक्षक दलाच्या रोजच्या हकिगतींचा ताजवा सोडून धरणारी काहीं स्फूर्तिदायक बातमी आज मिळाली आहे.

कर्नल एल्—च्या हातांखालील सुभाष ब्रिगेडमधील सैनिकांनीं आश्चर्यकारक शौर्य गाजविलें. त्यानीं चौदाव्या पलटणीची चढाई थांबवली.

६ मार्च, १९४५

जनरल मॅकआर्थर एका बेटामागून दुसऱ्या बेटावर अशा रीतीनें उड्या टाकीत येत असून पासिफिकमधील लढ्याचीं चिन्हें जपानच्या दृष्टीनें बरीं दिसत नाहींत. पधराशें अमेरिकन विमानानीं नऊ तासपर्यंत टोकियोवर बॉम्बवर्षाव केला अशी बढाई संयुक्तानीं मारली आहे. ही सगळी बढाई खरी नसेल, तथापि जपानी हे मरणसंकटात सापडले आहेत असें वाटतें. त्याच्या येथल्या वर्तनावरून हेंच अनुमान निघतें. अमेरिकनानीं इवोजिमा बेटावर पाऊल टाकलें असून आतापर्यंत ते तेथें पाय रोवून बसले आहेत. पण त्यांची पिछेहाट होईल यात मुळींच शंका नाहीं.

आमच्या आझाद ब्रिगेडचा सेनापति कर्नल शेट्—हा आहे. त्यानें आतापर्यंत खूप प्रशंसा मिळविली आहे. आमच्या फौजेचे सैनिक तुफान वीरश्रीनें लढत आहेत. मीं ऐकलेली एक कथा येथें नमूद करतें.

सैनिकाना ' माघार घ्या ' अशी एकदां इशारत मिळाली. त्या वेळेला सर्वत्र खळबळ झाली. सैनिकांत बंड माजेल अशीहि भीति वाटू लागली; कारण प्रत्येकानें ' मागें फिरा ' हा हुकूम अमान्य केला.

त्या सैनिकाचें उत्तर असें होतें—" आम्हाला दिल्लीस पोचण्याचा हुकूम आहे. आमचे सेनापति नेताजी यांनीं हीच गोष्ट आम्हास सांगितली आहे. कोणत्याहि परिस्थितींत मागें हटू नये असें त्यांनीं सांगितलें आहे. ब्रिटिश पचमदळी लोकांचा हा कांहीं तरी डाव असावा. दय आणि मदन, रैयाझ आणि गुलाम सरवार या, दुसऱ्या डिव्हिजनच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं असेच पचमरतमी हुकूम पूर्वी काढले होते. "

सेनापति व अधिकारी यांनीं सैनिकाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. आपणास माघार का घ्यावयाची आहे याचा खुलासा त्यांनीं केला. " आमची दारूगोळ्याची परिस्थिति वाईट आहे. मोटारगाड्या अथवा खटारे आमच्याजवळ नाहींत. आपण चिंदविन ओलांडून आल्यानंतर आपले अन्नाचे साठेही संपले. गवत आणि कंदमुळें यांवर आपण राहात आलों. आपणापैकीं अनेकांना आतां ताप येत आहे. मलेरिया आपले बळी घेत आहे. औषधाचे आमचे साठे खलास झाले आहेत. आता माघार घेण्याशिवाय दुसरा इलाज नाहीं. "

पण सैनिकाची एवढ्यानें खात्री होईना. " आम्ही गवत आणि पानें यांवर इतका काळ राहिलों आहोंत. यापुढें आम्ही त्यावर राहू. आमची पुढील चढाई आम्हांस चालूच ठेवायची आहे. औषधावाचून आमचें चालेल, पण शत्रूला आम्ही मागें हटवीतच राहिलें पाहिजे. नेताजींची आज्ञा आम्ही सोडणार नाहीं. "

या सैनिकानीं इरावतीच्या पुलावरून ब्रिटिश सैन्याला दोनदां मागें हटवलें होतें.

जपानी सैन्यानें माघार घेतलीच आहे, आपण आतां मागें हटल्यावांचून आपणाला दुसरें कांहींहि करतां येणार नाहीं असेंहि त्याना सांगण्यात आलें पण त्यांनींहि आपला हट्ट सोडला नाहीं. " संधि थोडीशी आहे तोंवरच शत्रूचा पाठलाग करून आम्हांस त्याचा धुव्वा उडवू द्या " असें उत्तर सैनिकानीं दिलें.

# ओहोटीचा काल

शेवटीं एका खास दूताला पिछाडीस पाठविण्यात येऊन सुभाषबाबूंचा लेखी हुकूम आणविण्यात आला. मग मात्र विरोध थांबला सैनिकांच्या डोळ्यांत अश्रु आले व ते हुदके देऊ लागले. हे बलवान शूर सैनिक लहान मुलाप्रमाणें रडू लागले. त्यांचा मनोभग होऊन रणांगणाकडे त्यांनीं पाठ फिरविली व माघार घेतली. त्या दिवशीं त्यांच्यापैकीं कोणी जेवलेंहि नाहीं. ही अखेराची सुरवात आहे कीं काय ? कोणीच बोलत नव्हतें पण प्रत्येकाच्या चेहेऱ्यावर हाच प्रश्न उमटलेला होता ही अखेर सुरू झाली काय ?

१९ मार्च, १९४५

५ तारखेला मिटकीना पडलें आणि रगूनहि खाली करण्याचा जपान्यांचा आग्रह आहे असें ऐकू येतें.

आमच्या फौजेला लढून रगूनचा बचाव करू द्या अशी मागणी सुभाषबाबू जपान्यांकडे करीत असून आपल्या आर्जव शक्तीची शिकस्त करीत आहेत. ब्रिटिशांच्या हातीं ब्रह्मदेश सोंपविणें म्हणजे दिल्ली आणखीच दूर लोटणें असा त्याचा अर्थ असून आमच्या स्वातंत्र्याच्या आशा त्यामुळें कायमच्या भरमसात होणार आहेत.

गांधी आणि नेहरू या ब्रिगेड्सना फार नुकसान सोसावें लागलें. पण या ब्रिगेड्सची प्रत्येक इंच माघार होत असता ब्रिटिश सैन्याचाहि खुप धुव्वा उडाला आम्ही भिंतीला पाठ लावून लढत आहों आणि इंचा इंचा एवढ्या जागेसाठीं खगराची शर्थ करीत आहों.

ब्रिटिशांच्या १९ व्या पल्टणीच्या हातीं रगून पडलें अशी बातमी आहे. मामिओहि पडलें. हें सर्व घडत आहे तरी काय ! ब्रिटिशांना एवढें सामर्थ्य आलें कोठून ! अमेरिकन्स तर हें सर्व घडवीत नसतील ना ! जपान्यांचा वैमानिक पाठिंबा आम्हाला आता मुळींच मिळत नाहीं .....

५ एप्रिल, १९४५

सोव्हिएट जपान तटस्थतेचा करार आता अस्तित्वात नाहीं असें मॉस्कोनें जाहीर केलें 'संपलें' असा याचा निश्चित अर्थ आहे......

सैनिकाना ' माघार घ्या ' अशी एकदां इशारत मिळाली. त्या वेळेला सर्वत्र खळबळ झाली. सैनिकात बंड माजेल अशीहि भीति वाटू लागली; कारण प्रत्येकानें ' मागें फिरा ' हा हुकूम अमान्य केला.

त्या सैनिकाचें उत्तर असें होतें—" आम्हाला दिल्लीस पोचण्याचा हुकूम आहे. आमचे सेनापति नेताजी यांनीं हीच गोष्ट आम्हास सांगितली आहे. कोणत्याहि परिस्थितींत मागें हटू नये असें त्यांनीं सांगितलें आहे. ब्रिटिश पचमदळी लोकाचा हा काहीं तरी डाव असावा. दय आणि मदन, रैयाझ आणि गुलाम सरवार या, दुसऱ्या डिव्हिजनच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं असेच पचमस्तभी हुकूम पूर्वी काढले होते. "

सेनापति व अधिकारी यांनीं सैनिकाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. आपणास माघार का घ्यावयाची आहे याचा खुलासा त्यांनीं केला. " आमची दारूगोळ्याची परिस्थिति वाईट आहे. मोटारगाड्या अथवा खटारे आमच्याजवळ नाहींत. आपण चिंदविन ओलाडून आल्यानतर आपले अन्नाचे साठेही सपले. गवत आणि फदमुळें यावर आपण राहात आलों. आपणापैकीं अनेकांना आतां ताप येत आहे. मलेरिया आपले बळी घेत आहे. औषधाचे आमचे साठे खलास झाले आहेत. आता माघार घेण्याशिवाय दुसरा इलाज नाहीं. "

पण सैनिकाची एवढ्यानें खात्री होईना. " आम्ही गवत आणि पानें यांवर इतका काळ राहिलों आहोंत. याहि पुढें आम्ही त्यावर राहू आमची पुढील चढाई आम्हांस चालूच ठेवायची आहे. औषधावाचून आमचें चालेल, पण शत्रूला आम्ही मागें हटवीतच राहिलें पाहिजे. नेताजींची आज्ञा आम्ही सोडणार नाहीं "

या सैनिकानीं इरावतीच्या पुलावरून ब्रिटिश सैन्याला दोनदां मागें हटवलें होतें.

जपानी सैन्यानें माघार घेतलीच आहे, आपण आतां मागें हटल्यावांचून आपणाला दुसरें काहींहि करतां येणार नाहीं असेंहि त्याना सांगण्यात आलें पण त्यांनींहि आपला हट्ट सोडला नाहीं. " सधि थोडीशी आहे तोंवरच शत्रूचा पाठलाग करून आम्हांस त्याचा धुव्वा उडवू द्या " असें उत्तर सैनिकानीं दिलें.

# ओहोटीचा काल

शेवटीं एका खास दूताला पिछाडीस पाठविण्यांत येऊन सुभाषबाबूंचा लेखी हुकूम आणविण्यात आला. मग मात्र विरोध थांबला. सैनिकांच्या डोळ्यांत अश्रु आले व ते हुदके देऊं लागले. हे बलवान शूर सैनिक लहान मुलाप्रमाणें रडूं लागले. त्यांचा मनोभंग होऊन रणांगणाकडे त्यांनीं पाठ फिरविली व माघार घेतली. त्या दिवशीं त्यांच्यापैकीं कोणी जेवलेंहि नाहीं. ही अखेरीची सुरवात आहे कीं काय ? कोणीच बोलत नव्हतें पण प्रत्येकाच्या चेहेऱ्यावर हाच प्रश्न उमटलेला होता. ही अखेर सुरू झाली काय ?

१५ मार्च, १९४५

५ तारखेला मिटकीना पडलें आणि रगूनहि खाली करण्याचा जपान्यांचा आग्रह आहे असें ऐकूं येतें.

आमच्या फौजेला लढून रगूनचा बचाव करूं द्या अशी मागणी सुभाषबाबू जपान्याकडे करीत असून आपल्या आर्जव शब्दांची शिकस्त करीत आहेत. ब्रिटिशांच्या हातीं ब्रह्मदेश सोंपविणें म्हणजे दिल्ली आणखीच दूर लोटणें असा त्याचा अर्थ असून आमच्या स्वातन्त्र्याच्या आशा त्यामुळें कायमच्या भस्मसात होणार आहेत.

गांधी आणि नेहरू या ब्रिगेड्सना फार नुकसान सोसावें लागलें. पण या ब्रिगेड्सची प्रत्येक इंच माघार होत असतां ब्रिटिश सैन्याचाहि रक्त धुव्वा उडाला. आम्ही भिंतीला पाठ लावून लढत आहों आणि इंचा इंचा एवढ्या जागेसाठीं सगराची शर्थ करीत आहों.

ब्रिटिशांच्या १९ व्या पल्टणीच्या हातीं रगून पडलें अशी बातमी आहे. मामिओहि पडलें, हें सर्व घडत आहे तरी काय ! ब्रिटिशांना एवढें सामर्थ्य आलें कोठून ! अमेरिकन्स तर हें सर्व घडवीत नसतील ना ! जपान्यांचा वैमानिक पाठिंबा आम्हाला आतां मुळींच मिळत नाहीं......

५ एप्रिल, १९४५

सोव्हिएट-जपान तटस्थतेचा करार आतां अस्तित्वांत नाहीं असें मॉस्कोनें जाहीर केलें. 'संपलें' असा याचा निश्चित अर्थ आहे......

जय हिंद !

२४ एप्रिल, १९४५

आज सुभाषबाबूंनी बँकॉकला जाण्यासाठी रंगून सोडलें. राणी ऑफ झाशी रेजिमेंट व इतर तुकड्या रंगूनमधून काढीपर्यंत आपण रंगून सोडण्याचें त्यांनीं नाकारलें. मी रंगूनच्या जनरल हेडक्वार्टर्समध्यें आहे, म्हणून मी येथून जाणार नाहीं. तशा आशयाची माझी विनती मान्य करण्यात आली आहे.

काल जपानी सरसेनापति येथून गेला.

सगळ्याच्या शेवटीं सुभाषबाबूंनीं रंगून सोडलें. विमानात बसण्यापूर्वी आम्हाकडे त्यांनीं जो दृष्टिक्षेप केला तो मी कधींच विसरणार नाहीं.

फौजेच्या हातीं रंगून देण्यात आलें आहे. जनरल लोकनाथन् हे सेनापति आहेत. फौजेतलें सात हजार सैन्य सुव्यवस्था राखून मालमत्तेचें रक्षण करील. ब्रिटिश आल्यानंतर आम्हीं लढायचें नाहीं असें ठरलें आहे. रंगून हा एक सापळा आहे असें आम्हीं जाणतों पण आता स्वातंत्र्य मिळविण्याची संधि गेली हें कळल्यानंतर रंगून सोडून मलायात जाण्यात काहीं अर्थ नाहीं. शिस्तीनें शत्रूच्या स्वाधीन व्हावें हाच मार्ग चांगला.

आमची आय्. आय्. एल्. श्री. बहादुरी यांच्या स्वाधीन करण्यात आली आहे. ते आमचे उपाध्यक्ष असून सर्वांत सीनियर आहेत.

आमच्या सरकारनें बँकॉकला जाण्यापूर्वी प्रत्येक सावकाराचें शिल्लक देणें देऊन टाकलें आहे.

ब्रिटिश आल्यावरहि आमची बँक खुली राहील. स्वतंत्र ब्रह्मदेश सरकारजवळ सैनिकांना पगार देण्यास पैसा नव्हता म्हणून आमच्या बँकेनें सदर सरकारला पाच लाख रुपये मोफत दिले आहेत. याचवेळीं सॅन् फ्रॅन्सिस्को येथें समारंभ चालू आहेत.. रोमला आग लागली असताना नीरो सारंगी वाजवीत होता त्यातलाच हा प्रकार......

४ मे, १९४५

काल रंगून शत्रूला शरण गेलें. पेगू २ तारखेस पडलें. टोंगू आठवड्यापूर्वी पडलें.

पण आमच्या फौजेनें रंगूनमध्यें जी व्यवस्था राखली तिजबद्दल सर्वत्र प्रशंसा होत आहे. आमच्या हातीं रंगून असण्याच्या काळांत एकहि चोरी झाली नाहीं अथवा दरवडा पडला नाहीं. ब्रिटिशांनीं १९४२ सालीं रंगून सोडलें त्यावेळीं घडलेले प्रकार आणि आजची ही परिस्थिति यांत केवढें हें अंतर !

इरावती नदींत जपान्यांनीं भरपूर सुरुंग पेरले होते. रंगूनमध्यें परोपर शत्रूशीं लढा देणें शक्य होतें पण तरीहि शांतपणें शत्रूच्या हवालीं रंगून करण्याचा निर्णय ठरविण्यात आला. सध्या आपलें ध्येय फसलें आहे. केवळ जपान्याची इभ्रत राखावी यासाठीं आम्ही हिंदी लोकांचें जीवित व मालमत्ता उध्वस्त करू नये अशी आमची भूमिका होती.

आय्. आय्. एल्. च्या शाखाकडून आलेल्या वृत्तावरूनहि असें कळतें, कीं निरनिराळ्या जिल्ह्याच्या ठिकाणीं आमच्या सदस्यांनीं हिंदी व ब्रह्मी लोकांच्या जीवितास व वित्तास धक्का लागूं नये अशी काळजी घेतली.

५ मे, १९४५

चोविसाव्या हिंदी पलटणीचा ब्रिगेडियर लॉडर हा रंगून क्षेत्राचा सध्य मुख्य आहे.

तो आज श्री. बहादुरी याना भेटला आणि आय्. आय्. एल्. च्या हालचाली काय चालतात याची त्यानें माहिती मागितली. लीगनें राजकीय कार्य थांबवावें आणि समाजसेवाविषयक आणि आरोग्यविषयक कार्य चालू ठेवावें असें तो सुचवितो. हिंदुस्तानात चालणाऱ्या कॉंग्रेसच्या कार्याचें त्यानें उदाहरण दिलें, राजकारणात कॉंग्रेस व सरकार याचा लढा चालला असताना लोकसेवाकार्यात दोघांचें सहकार्य होतें असें तो म्हणाला.

रंगूनमधील आमचे दवाखाने चालविण्याचें श्री. बहादुरींनीं कबूल केलें आहे. ब्रिगेडियर लॉडर यानें पैसा व औषधें या स्वरूपाव मदत देऊं केली पण ती घेण्याचें आम्हीं नाकारलें आहे. आझाद हिंदची राष्ट्रीय बँक चालू ठेवण्यास परवानगी मिळेल हें बरें होत आहे; कारण सध्या सर्वत्र जो गोंधळ सुरू आहे त्यामुळें दुकानें व बाजार बंद असून बाजारभाव भडकत आहेत.

अन्नवस्त्र व इतर आवश्यक वस्तु जुन्या किंमतीला देण्याचें काम फक्त बँकच करीत आहे. आजच्या संकटाच्या काळांत बँक हीच सुरक्षिततेची एक आशा आहे.

फौजेसंबंधीं बोलावयाचें म्हणजे ब्रिगेडियर लॉडर लोकनाथनला असें आश्वासन देतो, कीं सर्व सैनिकाना मुक्त करून खुले नागरिक स्त्री पुरुष म्हणून हिंदुस्तानात पाठविण्यात येईल, परतु फौजेंतील अधिकाऱ्यानीं आपले गणवेष उतरले पाहिजेत आणि पूर्वीच्या ब्रिटिश हिंदी सैन्यातील अधिकाऱ्यानीं आपले जुने अधिकार धारण केले पाहिजेत.

त्यानें असेंहि आश्वासन दिलें, कीं या फौजेंतील अधिकाऱ्याना कष्टाचें काम जर देण्यात आलें तर अत्यवश्य असेंच कार्य व तेंहि ब्रिटिश हिंदी सैनिकाच्या तितक्याच सख्येच्या बरोबरच देण्यात येईल.

फौजेच्या छावणीवर फौजेचाच पहारा राहील. तिरगी झेंडा हेंच फौजेचें निशाण राहील आणि फौजेला आपलें राष्ट्रगीत म्हणता येईल असेंहि ब्रिगेडियर लॉडरनें सागितलें.

आज मी एन्—ला भेटलें. तो पी—बरोबर आत्माहुती तुकडींत होता. येनाग यँग येथें पी—शीं त्याचा सबध तुटला. पी—, आता मी तुला कधींच पाहू शकणार नाहीं काय ? तुला जर कैद करण्यात आलें असलें तर रगूनमध्यें आज ना उद्या मी तुला शोधून काढू शकेन. पी—, तुझ्यावाचून जीवन किती अवघड होत आहे !

१९ मे, १९४५

ब्रिगेडियर लॉडरनें आमच्या बँकेवर झडप घातली. बँकेनें बहुतेकाच्या ठेवी परत केल्या होत्या; पण अजून बँकेचे रगत.चे पसतीस लाख रुपये शिल्लक होते. बँकेचीं बुकें व हा पैसा जप्त करण्यात आला.

हळूहळू आणि परिणामकारक रीतीनें आमच्या मानेभोंवतीं हा पाश आवळला जात आहे. ब्रिगेडियर लॉडरनें प्रथम दिलेल्या आश्वासनाच्या हें

अगदीं विरुद्ध होत आहे. ब्रिटिशांना ज्यानें प्रथम विश्वासघातकी म्हटलें त्याचें तें म्हणणें अगदीं बरोबर आहे,.....

ब्रिटिशांची फील्ड सिक्युरिटी सर्व्हिस झपाट्यानें कामें उरकू लागली आहे, आज मला बोलावणें आलें, लष्करी अधिकारी आणि सैनिक कोणाहि समोर येतात आणि म्हणतात, 'दोन मिनिटें तुम्हाला बोलावण्यात येत आहे.' तें तुम्हाला मानावेंच लागतें. मग लष्करी अधिकाऱ्याबरोबर जायचें. तेथून फील्ड इंटरॉगेटिंग युनिटकडे नेण्यात येतें. तेथें कित्येक दिवस तपासणी चालते. तुम्हीं तेथें येता ते फक्त आगावरच्या कपड्यानिशीं आलेले असता आंथरुण नाहीं, बदलण्याचा कपडा नाहीं. अशा स्थितींत रंगूनच्या मध्यवर्ति तुरुंगात चौकशीच्या काळात राहावें लागतें. कित्येक दिवसांनीं सुटका होते अर्थात सुटका होण्याइतकें तुमचें सुदैव असेल तर. पण बहुतेकांची सुटका होतच नाहीं.

अनेक दिवसानंतर ज्याची तुरुंगातून सुटका होते त्याच्या हालचालीवर कडक पाळत ठेवण्यात येते. कित्येकांना चांगल्या वर्तणुकीबद्दल जामीन म्हणून मोठमोठ्या रकमा भराव्या लागल्या, काहींना नियमितपणें पोलिसांत हजेरी द्यावी लागते. आम्ही झांशी राणी रेजिमेंटमधील स्त्रियाहि त्यांच्या नजरेंतून सुटलों नाहीं. माझी सुटका कशीबशीच झाली पी—कुठें आहे याची माहिती मला त्यांनीं विचारली. यावरून तो कैदी नसावा असें दिसतें. नंतर माझ्या हालचाली संबधीं त्यांनीं माहिती विचारली. मी धीटपणें सांगितलें, कीं मी आय्. आय्. एल्. मध्यें होतें, झांशी राणी रेजिमेंट ही माझी लष्करी तुकडी होती, अधिक माहिती हवी असल्यास माझ्या प्रमुखांना विचारा. मीं आपली अधिक काहींहि सांगणार नाहीं.

पण कां कुणास कळे त्यांनीं अधिक चौकशी केलीच नाहीं. मला हें आश्चर्यच वाटत आहे. कदाचित मी दृढनिश्चयानें बोललें यामुळें ते बिचकले असावेत, पण आज मी घरीं आलें त्यावेळीं कोणातरी माणसाची सावली माझ्या आसपास फिरत आहे असें मला आढळून आलें. या वेळीं तो माझ्या घरासमोर बसला आहे. माझ्या भोंवतीं तो कितीहि पाळतीवर राहो, मी त्याची मुळींच फिकीर करणार नाहीं.

पण पी— अचानक आला तर ? मला त्यावर पाळत ठेवली पाहिजे. त्याच्यासाठीं येथें आसपास लपण्याची जागाहि करून ठेवली पाहिजे. तसेंच माझ्या पाळतीवर राहिलेल्या या माणसासबधानें माझ्या मित्रानाहि इषारा देऊन ठेवला पाहिजे. म्हणजे त्याना जर पी—भेटला तर ते त्याला इषारा देतील.

२८ मे, १९४५

श्री. बहादुरींना पकडण्यात अलें व रंगून जेलमध्यें त्याची रवानगी झाली. ब्रिटिशाच्या वचनभगाची शिकस्त झाली म्हणायची......

अफवा अशी आहे, कीं आमच्यापैकीं दोनशें माणसाना खटला न चालवता निरनिराळ्या मुदतीच्या कारावासाच्या शिक्षा देण्यांत आल्या असून ते इन्सीन तुरुगात आहेत.

फौजेचीहि पंसगत करण्यात आली. सर्वांना पूर्णपणें नि:शस्त्र करण्यांत आल्यानतर रंगूनच्या मध्यवर्ती तुरुंगात सर्व सैनिकाना एका अलग भागात गदानें कोंडण्यांत आलें. त्याच्यावर ब्रिटिश पहारेकरी ठेवण्यात आले. ब्रिटिश हिंदी सैनिकाच्या देखरेखीखालीं चालण्याचे श्रम करणें, झाडलोट व साफसफाई करणें याची त्याजवर सक्ती करण्यात आली आहे. त्याना कैदी म्हणून वागविण्यात येत आहे. अशी अफवा आहे, कीं यातील वरिष्ठ अधिकाऱ्यांना हिंदुस्तानांत नेऊन लष्करी कोर्टापुढें त्याच्यावर खटला भरण्यात येईल......

५ जून, १९४५

माझे रोजनिशी, मी तुझ्यापुढें आज कबुलीजबाब देतें. मी सर्वस्वी भग्न झालेली स्त्री आहें. मला एवढा मोठा धक्का बसला आहे, कीं त्यांतून मी आतां निभावणार नाहीं. पी—सबधींचे विचार रात्रदिवस माझ्या मनाभोवतीं घोटाळत आहेत. घरांतील प्रत्येक परिचयाची वस्तु पुन:पुन्हा पी—ची आठवण करून देते. त्याची चिलीम, त्याचे कपडे, जेवणाच्या वेळची त्याची जागा या सगळ्यांनीं त्याची आठवण होते. सर्व घरभर मला त्याचा आवाज ऐकूं येतो...

गेले दोन दिवस व दोन रात्री मी सारखे अश्रु ढाळीत असून माझी उशी अश्रूंनीं भिजून गेली आहे. सांत्वन व आराम यांसाठीं मी आता कोणाकडे पाहावें ? जीवनात जी जी वस्तु महत्त्वाची वाटे त्या प्रत्येक वस्तूतलें सौंदर्य आता नाहींसे झालें आहे. आत्महत्येच्या विचारापासून माझें मन दूर ठेवण्यासाठीं मला झगडले पाहिजे......केवढें दुर्दैव हें ! ईश्वरा, आमच्यासाठीं केवढें दुर्दैव तू वाढून ठेवलें होतेस ! हें माझ्या कृतीचें फळ कसें असेल ? माझ्या प्रीतीची, गौरवाची आणि तृष्णेची प्रत्येक वस्तु एका घावानें माझ्या जवळून तोडून नेण्यात आली आहे. माझ्या पी—वर माझें जिवापलीकडे प्रेम होतें. आता तो गेला. कायमचा गेला ! हिंदी स्वातंत्र्यलढ्याबद्दल मला प्रेम होतें. आम्ही सहकार्यानें लढलों होतों. तोहि आता फसला आहे. माझें रोजचें काम तेंहि आता काढून घेण्यात आलें आहे. माझ्या सहकाऱ्यांचीहि विसकटाविसकट होऊन ते आपापल्या वाटेनें गेले. मी पोरकी झाल्यासारखें मला वाटत आहे. मला येथें आता जागा नाहीं. हिंदुस्तानात असलेला माझा बाळ हाच माझें विश्रांतिस्थान. पण मला हिंदुस्तानात जाण्यास परवानगी नाकारण्यात आली आहे......

माझे रोजनिशी, मी आता करू तरी काय ? मला सल्ला देण्यालाहि कोणी नाहीं. माझ्या 'स्वातंत्र्या'सबधानें मी पी—शीं नेहमीं भांडत असें. नाहीं, पी—, नाहीं. मला तुझा मार्गदर्शक हात हवा आहे. तुझ्यावाचून माझें चालणार नाहीं हें मला कळतें......

मला पहिल्यानें ही हकिगत कळली तेव्हा केवढा धक्का बसला...... श्री. के—ला पुष्कळ काळपर्यंत ही कथा माहीत असली पाहिजे, पण ती सर्व कथा मी आता लक्षात आणते तेव्हा के—किती संयमानें ती मनांत दाबून ठेवून वागला हें मला कळून येतें.

पी—च्या अखेरच्या क्षणाचें दृश्य माझ्या मन:चक्षुपुढें घोटाळत आहे. के—नें जेव्हा मला तें सांगितलें तेव्हां जें तें माझ्या डोळ्यासमोर उभें राहिलें तेव्हापासून तें तेथून हाललेंच नाहीं. कानात त्या शब्दांचे प्रतिध्वनि एकसारखे ऐकू येतात:—

" शत्रूच्या दारूगोळ्याचा एक मोठा साठा उडवून लावण्याचा त्यांनी प्रयत्न केला होता. यात धोका आहे हें पी—ला माहीत होतें. म्हणून हें अखेरचें कृत्य इतर कोणाहि सहकाऱ्यास करू देण्याचें त्यानें नाकारलें. तो त्यावेळीं ब्रह्मदेशाच्या सरहद्दीपलीकडे हिंदुस्तानात होता. हिंदुस्तानच्या भूमीवर त्याला मरण आलें. तू शोक करू नको कारण त्यानें मरताना शोक केला नाहीं. तो दारूगोळ्याचा साठा त्यानें यशस्वीपणें उडवून लावल्यानंतर ज्या वेळीं आमच्या सैनिकांनीं त्याला पाहिलें त्या वेळीं तो एका खाचेंत पडला होता. त्याचा डावा हात तुटून गेला होता. शरीरावर अनेक जखमा झाल्या होत्या. आपण जगणार नाहीं हें त्याने ओळखलें. म्हणून तुला आणि आपल्या सर्व सहकाऱ्याना त्यानें एक संदेश पाठविला आहे, ' शौर्यानें काम पुढे चालू ठेवा. आपलीं पावले पुढें टाकताना अडखळू नका. माझी प्रिय पत्नी एम्—हिला सांगा, कीं मी वीरमरण मिळविलें आहे. भारतमाता आज मला बोलावीत आहे. तिजसंबधींचे माझे कर्तव्य आज मीं पार पाडले आहे हें मी जाणतों. नेताजी, मी माझें रक्त दिलें आहे इतर योद्धयाना या रक्तापासून स्फूर्ति येईल. मित्रहो, आता येथ घोटाळू नका. आपले कर्तव्य उरका. मी लवकरच मरेन. शत्रूच्या हातीं मी जिवत कधींच लागणार नाहीं. ज्या रस्त्यानें आमची फौज विजय आणि स्वातंत्र्य याप्रत जाणार आहे त्या रस्त्यावर मी माझ्या रक्ताचा सडा शिंपला आहे. नेताजींचे शब्द माझ्या मनात येत आहेत—

' हमारे जवान मर्दोंका खून हमारी आझादीकी कीमत होगा. हमारे शहीदोंके खून उनकी बहादुरी और उनकी मर्दुमकीसे हिंदुस्तानकी मॉग पूरी हो सकेगी. हिंदुस्तानियोंपर झुल्मो सितम दौरनेवाले बर्तनवी जन्नोंसे आदले का बदला सिर्फ खूनसेही लिया जा सकेगा. जय हिंद !'

इतके बोलून त्याने पिस्तुल काढले आणि अगदीं अतिमानुष असा प्रयत्न करून पिस्तुलाचे तोंड आपल्या तोंडात घातलें व त्याचा नाल दाबला..."

" जय हिंद.. जय हिंद...जय..."

---

# स्वातंत्र्य-युद्धांतील तारखा—

| | |
|---|---|
| ७ डिसेंबर, १९४१ ... | ... पूर्वआशियात युद्ध सुरू होतें. |
| १५ फेब्रुवारी, १९४२ ... | ... सिंगापूरचा जपानपुढे पाडाव. |
| २४ जून, १९४२ ... | ... इंडियन इंडिपेन्टन्स लीगची स्थापना. |
| नव्हेंबर–डिसेंबर, १९४२ ... | .. पेनँग स्वराज्य इन्स्टिट्यूट आणि आझाद हिंद फौज याजसंबधानें वादंग. |
| १८ एप्रिल, १९४३ ... | ... आय्. आय्. एल्. ची युद्ध-भूमिकेवर उभारणी. |
| ४ जुलै, १९४३ ... | ... सुभाषचंद्र बोस आय्. आय्. एल्. चे अध्यक्ष झाले. |
| ५ जुलै, १९४३ ... | ... आझाद हिंद फौज जगाला जाहीर करण्यात आली. |
| २५ ऑगस्ट, १९४३ ... | ... सुभाषबाबू फौजेचे सरसेनापति झाले. |
| २१ ऑक्टोबर, १९४३ ... | ... आर्झी हुकुमत—ए—आझाद हिंदची स्थापना. |
| २२ ऑक्टोबर, १९४३ ... | ... राणी झाशी रेजिमेंटची छावणी सुरू झाली. |
| २५ ऑक्टोबर, १९४३ ... | ... ब्रिटिश साम्राज्य व अमेरिका याजविरुद्ध युद्ध पुकारण्यात आलें. |
| ८ नव्हेंबर, १९४३ ... | ... अंदमान व निकोबार बेटें आझाद हिंद सरकारकडे देण्यात आलीं. |

| | |
|---|---|
| ३० डिसेंबर, १९४३ ... | ... पोर्ट ब्लेअरवर तिरंगी निशाण फडकलें. |
| ८ जानेवारी, १९४४ ... | ... रंगूनला चढाईचें मुख्य ठाणें. जनरल लोकनाथन् याची शहीद बेटावर चीफ कमिशनर म्हणून नेमणूक. |
| १८ मार्च १९४४ ... | .. फौजेनें ब्रह्मी हिंदी सरहद्द ओलांडून हिंदुस्तानांत प्रवेश केला. |
| २२ मार्च, १९४४ .. | ... हिंदुस्तानच्या स्वतंत्र झालेल्या क्षेत्रावर जनरल चतर्जी याची पहिले गव्हर्नर म्हणून नेमणूक. |
| ४ जुलै, १९४४ . | ... नेताजीसप्ताह सुरू. |
| २१ ऑगस्ट, १९४४ ... | .. पावसाळ्यामुळें लष्करी मोहीम तहकूब. |
| डिसेंबर–जानेवारी, १९४५ | .. फौजेची दुसरी मोहीम. |
| २४ एप्रिल, १९४५ ... | .. आझाद हिंद सरकार रंगून सोडून बँकॉककडे गेलें. |
| ३ मे, १९४५ ... | ... आझाद हिंद फौजेनें रंगून ब्रिटिशांच्या हवालीं केलें. |




पूर्व सरहद्दीकडे जाण्याचा आझाद हिंद सैन्याचा मार्ग.

## बाबू सुभाषचंद्र बोस यांनीं शेवटीं रंगून सोडण्यापूर्वी फौजेला दिलेला त्या दिवशींचा शेवटचा हुकूम

हेड क्वार्टर्स, आझाद हिंद फौज

# स्पेशल ऑर्डर ऑफ् दि डे

आझाद हिंद फौजेचे शूर अधिकारी व सैनिकहो, मी अतिशय जड अंतःकरणानें ब्रह्मदेश सोडून चाललों आहें. फेब्रुवारी १९४४ पासून तुम्ही अनेक शौर्यशाली लढे येथें खेळला आणि अजूनहि खेळत आहां. इंफाळ आणि ब्रह्मदेश येथें आमच्या स्वातंत्र्यलढ्यातील पहिली चकमक आम्ही हरलों. पण ही फक्त पहिली चकमक आहे. अजून पुष्कळ चकमकी लढावयाच्या आहेत. मी जातिवंत आशावादी असून कोणत्याहि परिस्थितींत पराभव पत्करणार नाहीं. इंफाळच्या मैदानावर, आराकानच्या डोंगरात आणि जंगलांत, ब्रह्मदेशांतील तेलखाणींच्या मुलखात व इतरत्र तुम्हीं गाजविलेलीं शूर कृत्यें हीं आमच्या स्वातंत्र्यलढ्याच्या इतिहासात अमर राहतील.

भाईहो, या आणीबाणीच्या प्रसंगीं मी आशेचा एकच शब्द तुम्हांला सांगतों. तुम्हाला तात्पुरता काळ पराभव खावा लागत आहे. तो पराभव वीराप्रमाणें पत्करा. शिस्त आणि स्वाभिमान याचा उत्तम नमुना आपल्या वर्तनात तुम्ही दाखवा. हिंदुस्तानच्या भावी पिढ्या आजच्या सारख्या गुलाम न राहतां तुमच्या या प्रचंड त्यागानें जेव्हा स्वतंत्र होतील तेव्हां त्या तुम्हांला आशीर्वाद देतील आणि जगाला जाहीरपणें सांगतील कीं तुम्ही, त्यांचे वाडवडील, मणिपूर, आसाम आणि ब्रह्मदेश येथें लढलां आणि तुम्हांला जो अल्पकालीन पराभव खावा लागला त्या पराभवानेंहि तुम्हीं अखेरचें यश आणि कीर्ति याचा रस्ता तयार करून ठेवला आहे.

हिंदुस्तान स्वतंत्र होणारच ह्याबद्दलचा माझा अढळ विश्वास तसाच कायम आहे. आमचा तिरंगी राष्ट्रीय झेंडा, आमच्या राष्ट्राची ही इभ्रत आणि हिंदी योद्धयाची सर्वोत्कृष्ट परंपरा या गोष्टी मी तुमच्या हातीं सोंपवीत असून

तुम्ही त्या जतन कराल अशी माझी खात्री आहे. हिंदी स्वातंत्र्यसैन्यांतील तुम्ही आघाडीचे सैनिक हिंदुस्तानची राष्ट्रीय इभ्रत सर्वस्व पणाला लावून आणि जीवितहि अर्पून शाबूत राखाल अशी मला खात्री आहे. तुमचे बांधव दुसरीकडे जेव्हा हा स्वातंत्र्यलढा चालू ठेवतील त्यावेळीं तुमचें तेजस्वी उदाहरण त्यांच्यापुढें सर्वकाळ चमकत राहील.

माझ्या इच्छेप्रमाणें मला वागता आलें असतें तर तुमच्या संकटात यावेळीं येथें राहून तात्पुरत्या पराभवाचें दुःख तुमच्या संगतींत भोगणें मी अधिक पसंत केलें असतें. परंतु माझे मंत्री आणि वरिष्ठ अधिकारी यांच्या सल्ल्यावरून स्वातंत्र्यलढा पुढें चालविण्यासाठीं मी ब्रह्मदेश सोडून जात आहें. पूर्व आशियातील आणि हिंदुस्तानातील माझे बांधव यांना मी ओळखतों. मीं तुम्हास आश्वासन देतों, कीं ते कोणत्याहि परिस्थितींत आपला स्वातंत्र्यलढा पुढें चालू ठेवतीलच आणि तुम्हीं भोगलेल्या यातना आणि त्याग व्यर्थ जाणार नाहींत माझ्यापुरतें बोलावयाचें तर १९४३ च्या २१ ऑक्टोबर रोजीं अडतीस कोटी हिंदी लोकांची सेवा मी यथाशक्ति करीन आणि त्यांच्या स्वातंत्र्यासाठीं लढेन ही जी शपथ मी घेतली त्या शपथेला मीं चिकटून राहीन शेवटीं मी एवढीच विनंति करतों, कीं माझ्यासारखाच दुर्दम आशावाद तुम्हीहि धारण करा आणि माझ्याचसारखी श्रद्धा बाळगा, कीं प्रभातकाळापूर्वी गडद अंधकार नेहमींच येतो हिंदुस्तान स्वतंत्र होणारच—आणि लवकरच स्वतंत्र होणार —

ईश्वर तुमचें भलें करो.

इन्किलाब झिंदाबाद
आझाद हिंद झिंदाबाद
जय हिंद

२४ एप्रिल, १९४५

सुभाषचंद्र बोस
आझाद हिंद सेनेचे
सर सेनापति

"जय-हिंद" एक हिंदी नागरिक दुसऱ्या हिंदी नागरिकाला भेटला असता त्यानें वंदन करावयासाठीं उच्चारण्याचा हा आमचा राष्ट्रीय वंदनशब्द आहे;

चरखा असलेला तिरंगी झेंडा हें आमचें राष्ट्रीय निशाण होय;

टागोरांचें 'जय हो' हें काव्य हें आमचें राष्ट्रगीत होय;

व्याघ्र या चिन्हानीं टिपू सुलतानची आठवण जोडलेली असून असें व्याघ्रचित्र हें आमच्या राष्ट्राचें प्रतीक होय;

'चलो दिल्ली' हा आमचा युद्धघोष,

इन्किलाब झिंदाबाद आणि

आझाद हिंद झिंदाबाद या आमच्या घोषणा;

'विश्वास-एकता-बलिदान' (श्रद्धा, ऐक्य आणि त्याग)

हें आमचें ब्रीदवाक्य

अर्झी हुकुमत-ए-आझाद-हिंद

(स्वतंत्र भारताचें तात्पुरतें सरकार)

# ब्रह्मदेश सोडून जाण्यापूर्वी सुभाषबाबूंनी आपल्या सहकाऱ्यांना दिलेला अखेरचा संदेश

ब्रह्मदेशातील माझ्या हिंदी व ब्रह्मी मित्रांना—

बंधुभगिनींनो, मी अतिशय जड अंतःकरणानें ब्रह्मदेश सोडीत आहें. हिंदी स्वातन्त्र्यलढ्यातील या पहिल्या चकमकींत आपण हरलों आहों; पण ही फक्त पहिली चकमकच आहे. आणखी अनेक चकमकी होतील. हा पराभव झाला तरी निराश होण्याचे कोणतेंच कारण मला दिसत नाहीं. ब्रह्मदेशातील माझे बांधव हो, तुम्ही मातृभूमीसंबंधाचें आपलें कर्तव्य पार पाडलें असून साऱ्या जगाकडून वाहवा मिळविली आहे. माणसें, पैसा व साहित्य तुम्ही उदार हस्तानें आम्हाला दिले. 'सर्वंध जमावट' (टोटल् मोबिलायझेशन्) म्हणजे काय याचें पहिले उदाहरण तुम्हीं घालून दिलें. परंतु आमच्या विरुद्ध असणारीं संकटें अनावर होतीं आणि म्हणून ब्रह्मदेशातील लढाईत आम्ही तूर्त हरलों आहोंत.

तुम्ही जी निःस्वार्थाची व त्यागाची भावना, विशेषतः माझें ठाणें रंगूनला आल्यानंतर, दाखविलीत ती इतकी थोर आहे, कीं मी साऱ्या आयुष्यभर ती कधींच विसरणार नाहीं.

ही भावना कधींच चिरडली जाणार नाहीं असा मला विश्वास आहे. हिंदुस्तानच्या स्वातंत्र्यासाठीं मी तुम्हाला विनंती करतों, कीं ही भावना तुम्ही कायम ठेवा. आपलीं मस्तके ताठ ठेवून पुन्हा एकदा हिंदी स्वातन्त्र्यलढा लढण्याची संधि येईल त्या दिवसाची आपण वाट पाहात राहा.

त्यावेळीं हिंदुस्तानच्या शेवटल्या स्वातन्त्र्ययुद्धाचा इतिहास लिहिला जाईल त्यावेळीं त्या इतिहासात ब्रह्मदेशातील हिंदी लोकांना सन्मान्य असें स्थान मिळेल.

मी स्वेच्छेने ब्रह्मदेश सोडीत नाहीं. तुमच्याबरोबरच येथे राहून या तात्पुरत्या पराभवाचें दुःख तुमच्या संगतींत भोगणें हें मीं अधिक पसंत केलें

असतें पण माझे मंत्री आणि वरिष्ठ अधिकारी यांचा आग्रहाचा सल्ला मिळाल्या-वरून भारतीय स्वातंत्र्यलढा पुढे चालविण्यासाठींच मला ब्रह्मदेश सोडावा लागत आहे. मी जन्मत:च आशावादी असून हिंदुस्तान लवकरच मुक्त होईल ही माझी दुर्दम आशा तशीच कायम आहे. हाच आशावाद तुम्हींहि धारण करा अशी मी तुम्हाला विनंती करतों.

प्रभातकालापूर्वी जास्तींत जास्त गडद अंधकार पडत असतो असें मी नेहमीं म्हणत आलों आहे. आता यावेळीं आपण गडद अंधकारातून चाललों आहोंत म्हणूनच प्रभातकाल आता फार दूर नाहीं.

## हिंदुस्तान स्वतंत्र होणार

ब्रह्मदेशातील स्वतंत्र सरकार आणि येथील जनता यानीं आमचा हा झगडा चालविण्यासाठीं जी सर्व प्रकारची मदत आम्हाला दिली तीबद्दल पुन्हा एकदा अंत:करणापासून जाहीरपणें कृतज्ञता व्यक्त केल्यावाचून हा संदेश मी संपवू शकत नाहीं. हें कृतज्ञतेचें ऋण स्वतंत्र हिंदुस्तान उदारबुद्धीने ज्या दिवशीं परत करील तो दिवस लवकरच उगवणार आहे.

इन्किलाब झिंदाबाद
आझाद हिंद झिंदाबाद
जय हिंद

सुभाषचंद्र बोस